भारत – देश आणि लोक

# भारतीय पक्षी

सालिम अली

आणि

लईक फतेहअली

अनुवाद

रा. वि. सोवनी




नॅशनल बुक ट्रस्ट, इंडिया

रंगीत चित्रे बॉम्बे नॅचरल हिस्ट्री सोसायटी, मुंबई यांच्या सौजन्याने.

ISBN 81-237-2276-1

पहिली आवृत्ती 1969 (*शके* 1891)
दुसरी आवृत्ती 1978 (*शके* 1900)
तिसरी आवृत्ती 1998 (*शके* 1919)
चौथी आवृत्ती 2000 (*शके* 1922)
पाचवी आवृत्ती 2002 (*शके* 1924)

**रु. 35.00**

Common Birds *(Marathi)*

संचालक, नॅशनल बुक ट्रस्ट, इंडिया, ए-5 ग्रीन पार्क
नवी दिल्ली-110 016 यांनी प्रकाशित केले.

# अनुक्रमणिका


| | पृष्ठ | चित्रपत्र |
|---|---|---|
| प्रास्ताविक | 1 | – |
| पक्षीविज्ञान आणि पक्षी निरीक्षण | 5 | – |
| प्रजोत्पादन | 11 | – |
| स्थलांतर | 15 | – |
| पक्ष्यांचे वर्णन | 19 | – |
| **वंजुल गण** | **19** | – |
| पाणडुबी (छोटा ग्रीब किंवा डॅबचिक) | 19 | 3.13 |
| **पाशगल गण** | **20** | – |
| ठिपक्यांच्या चोचीचा किंवा राखी करडा पेलिकन | 20 | – |
| तिरंदाज | 21 | 2.7 |
| पाणकावळा (करढोक) | 22 | 2.8 |
| राखी बगळा | 23 | 2.9 |
| लहान बगळा | 24 | 2.10 |
| गायबगळा | 24 | 2.12 |
| वंचक | 24 | 2.11 |
| रंगीत करकोचा | 26 | 1.4 |
| उघड्या चोचीचा करकोचा | 26 | 1.3 |
| क्षत्र बलाक | 27 | 1.5 |
| काळा शराटी | 28 | 6.33 |
| दर्वीमुख | 29 | 1.6 |
| रोहित | 29 | 1.1 |
| **हंस गण** | **30** | – |
| पट्टयांचा हंस | 31 | 3.17 |
| ठिपक्यांचे किंवा राखी बदक | 32 | 3.16 |
| मराल | 32 | 3.15 |
| काणूक | 33 | 3.14 |

| | पृष्ठ | चित्रपत्र |
|---|---|---|
| **ससाणा गण** | **34** | – |
| घार | 34 | 4.18 |
| ब्राह्मणी घार | 34 | 4.19 |
| शिक्रा | 35 | 4.20 |
| पांढऱ्या पाठीचे किंवा बंगाली गिधाड | 35 | 6.32 |
| पांढरे किंवा सर्वाशनी गिधाड | 36 | 4.23 |
| ससाणा | 36 | 4.21 |
| तुरुमती ससाणा | 37 | 4.22 |
| **कुक्कुट गण** | **38** | – |
| काळे तित्तर | 38 | 5.25 |
| चितूर | 39 | 5.26 |
| काळ्या छातीचा किंवा पावसाळी दुर्लाव | 39 | 5.27 |
| जंगली दुर्लाव | 40 | 5.28 |
| राखी जंगली कोंबडी | 41 | 5.24 |
| मोर | 42 | 6.30 |
| **क्रौंच गण** | **43** | – |
| सारस | 43 | 6.31 |
| पांढऱ्या छातीची पाणकोंबडी | 44 | 7.36 |
| जांभळी पाणकोंबडी | 44 | 7.38 |
| मोठा भारतीय सारंग (माळढोक) | 45 | 5.29 |
| **टिट्टिभ गण** | **46** | – |
| ब्राँझ पंखाचा जलकपोत | 46 | 7.37 |
| टिटवी | 47 | 7.39 |
| तुतवार | 48 | 7.34 |
| लिटल रिंग्ड प्लवर | 48 | 7.35 |
| चष्मेवाला प्लवर | 49 | 8.43 |
| तपकिरी डोक्याचा कुरव | 50 | 8.41 |
| भारतीय नदीसुरय | 51 | 8.40 |
| **कपोत गण** | **52** | – |
| भाटतीतर | 52 | 8.44 |
| हरितालक | 53 | 9.46 |
| पारवा | 54 | 9.48 |
| ठिपक्यांचे कबुतर | 54 | 9.47 |
| तांबडा होला | 55 | 9.47 (अ) |

| | पृष्ठ | चित्रपत्र |
|---|---|---|
| **शुक गण** | **55** | – |
| पोपट | 55 | 9.49 |
| **कोकिल (परभृत गण)** | **56** | – |
| कोकिळ | 56 | 10.51 |
| भारद्वाज | 57 | 10.53 |
| **उलूक गण** | **58** | – |
| पिंगळा | 58 | 10.50 |
| शृंगी उलूक (शिंगवाले घुबड) | 59 | 10.52 |
| **छिप्पिका गण** | **60** | – |
| भारतीय रात्रिंचर (रातवा) | 60 | 10.54 |
| **दुर्बल गण** | **60** | – |
| दुर्बल | 61 | 11.55 |
| **नीलकंठ गण** | **61** | – |
| खंड्या | 61 | 11.57 |
| शबल मीनरंक | 62 | 11.60 |
| छोटा हिरवा वेडा राघू | 63 | 11.58 |
| चाष (नीलकंठ) | 64 | 9.45 |
| सुतार (हुप्पो) | 64 | 11.61 |
| मलबारी धनेश | 65 | 8.42 |
| **काष्ठकूट गण** | **66** | – |
| तांबट | 66 | 11.56 |
| मराठा सुतार (काष्टकूट) | 67 | 11.59 |
| **कुलिंग गण** | **68** | – |
| पद्मपुष्प किंवा कस्तूर (नवरंग) | 68 | 12.67 |
| तुरेबाज चंडोल | 69 | 12.66 |
| लालबुड्या भांडिक | 70 | 12.62 |
| राखी खाटीक | 71 | 12.63 |
| कालशीर्ष कांचन | 72 | 14.83 |
| कोतवाल | 73 | 12.64 |
| साळुंकी (मैना) | 74 | 14.85 |
| रंगीत साळुंकी | 75 | 14.86 |
| कावळा | 76 | 12.65 |
| टकाचोर (भेरा) | 76 | 12.65 |
| विष्फुलिंग (शेंदरी मिनिव्हेट) | 77 | 14.84 |

| | पृष्ठ | चित्रपत्र |
|---|---|---|
| सुभग | 78 | 14.82 |
| जेरडॉनचा क्लोरोप्सिस | 78 | 14.81 |
| लालगाल्या बुलबुल | 79 | 14.80 |
| लालबुड्या बुलबुल | 80 | 14.79 |
| पांढऱ्या ठिपक्यांचा नर्तक (नाचरा) | 81 | 15.89 |
| स्वर्गीय नर्तक (सुरंगी) | 82 | 15.87 |
| पिवळ्या डोळ्यांचा सातभाई | 82 | 15.92 |
| बडा सातभाई (बैरागी) | 83 | 15.88 |
| छोटा सातभाई | 84 | 15.90 |
| राखी वटवट्या | 84 | 13.70 |
| शिंपी | 85 | 13.69 |
| दयाळ | 86 | 15.94 |
| शमा | 86 | 15.91 |
| गप्पीदास | 87 | 13.71 |
| चीरक | 87 | 15.93 |
| पर्वत कस्तूर | 88 | 15.95 |
| राखी टिट | 89 | 13.74 |
| चेस्टनट पोटाचा नटहॅच | 89 | 13.76 |
| करडा धोबी | 91 | 13.77 |
| मोठा ठिपक्यांचा धोबी | 91 | 13.77 (अ) |
| झाडावरील पिपिट | 92 | 13.78 |
| टिकेलचा फुलटोच्या | 92 | 13.73 |
| जांभळा शिंजीर | 93 | 13.75 |
| चष्मेवाला | 94 | 13.72 |
| चिमणी | 95 | 16.101 |
| सुगरण | 95 | 16.97 |
| लाल मुनिआ | 96 | 16.98 (अ) |
| ठिपक्यांचा मुनिआ | 96 | 16.98 |
| गुलाबी फिंच | 97 | 16.96 |
| कालशीर्ष भारीट | 98 | 16.100 |
| रक्तशीर्ष भारीट | 98 | 16.99 |

*पारिभाषिक शब्दसंग्रह* 99

# प्रास्ताविक

ह्या पृथ्वीवरील सर्व पृष्ठवंशीय किंवा पाठीचा कणा असलेल्या प्राण्यांचे दोन वर्ग पडतात : उष्ण रक्ताचे प्राणी व शीत रक्ताचे प्राणी. उष्ण रक्ताच्या प्राण्यांच्या शरीराचे तपमान कायम असते. सभोवतालच्या वातावरणाचा त्यांच्या तपमानावर काहीही परिणाम होत नाही. ह्या प्राण्यांचे सस्तन प्राणी व पक्षी असे आणखी उपवर्ग पडतात. **सस्तन प्राणी** (मानवासहित) म्हणजे ज्यांच्या शरीरावर केस असतात, आणि जे आपल्या पिलांना जन्म देतात व त्यांना दूध पाजतात; तर पक्ष्यांच्या अंगावर पिसे असतात, ते अंडी घालतात व त्या अंड्यांना आपल्या शरीराच्या उष्णतेने उबवितात. आपला ह्या पक्ष्यांशी संबंध असून आपण त्यांचे वर्गीकरण कसे करतात हे मुख्यत: पाहणार आहोत.

पक्ष्यांची व्याख्या करणे सोपे आहे. साऱ्या जगात पिसे असलेले प्राणी असे फक्त तेच आहेत. सर्व पक्षी साधारणपणे उडताना, घरटी बांधताना व अंडी घालताना दिसत असल्यामुळे प्रथमदर्शनी ते सर्व सारखेच असावेत असे वाटते. पण जरा बारकाईने निरीक्षण केले तर ह्या पक्ष्यांमध्ये इतक्या विविध प्रकारचे भिन्न भिन्न आकार दिसतात की त्यांचा एकमेकाशी जवळचा संबंध सुद्धा नसावा असे दिसते. पक्ष्यांमध्ये आपल्या हाताच्या अंगठ्याएवढ्या आकाराचा इवलासा (हमिंग बर्ड) गुणगुणणारा पक्षी एका टोकाला तर घोड्याच्या तट्टाएवढा उंच व मोठा शहामृग दुसऱ्या टोकाला आढळतो. हजारो मैल उड्डाण करणारे पक्षी आहेत तसेच जमिनीला कधीही न सोडणारे पेंग्विनसारखे पक्षीही आहेत. गुंतागुंतीची पण सुरेख रचनेची घरटी बांधणारे विणकर पक्षी एका बाजूला तर उघड्या जमिनीवर अंडी घालणारे पक्षी दुसऱ्या बाजूला आहेत. खास प्रकारचे अन्न लागणारे पक्षी आहेत, मृत शरीरावर ताव मारणारी गिधाडे आहेत, आणि धातूशिवाय काहीही खाणारे कावळे पण पक्ष्यांत आहेत. वर्षात दोनदा लांब अंतरावर स्थलांतर करणारे पक्षी आहेत, तर जन्मल्यानंतर कित्येक आठवडे घरट्यातून बाहेर न पडणारी पिले जन्माला घालणारे गरुड आणि पोपट (पॅरॅकीट) हे ही पक्षीच आहेत. शेवटी माणसाच्या सहवासाखेरीज जगू न शकणारे पक्षी आहेत व माणसाचा संबंध आल्याबरोबर नाहीसे होणारेही पक्षी आहेत. पक्ष्यांचा असा हा विचित्र समूह आहे, त्याचे वर्गीकरण तरी कसे करावे ?

प्राण्यांच्या वर्गीकरणात सूत्रबद्धता आणण्याचा पहिला प्रयत्न ॲरिस्टॉटलने केला. अठराव्या शतकातील निसर्गतज्ज्ञ लिनिअस ह्या स्विस शास्त्रज्ञाने वर्गीकरणाची पद्धत घालून

पुढचा महत्त्वाचा टप्पा गाठला. थोड्याफार फरकाने लिनिअसची पद्धत आजही प्रचलित आहे.

वाढ आणि रचना ह्यांमधील मूलभूत फरकावर आधारित अशा 27 **गणांमध्ये** (Order) पक्षीवर्गाचे वर्गीकरण केले जाते. उदा. कुलिंग गणातील पक्षी (Order Passeriformes) म्हणजे झाडावर राहणारे पक्षी, आणि हेच पक्षी आपल्या जास्त परिचयाचे असण्याचा संभव आहे. पाण्याजवळ आपले जीवन व्यतीत करणारे बगळ्यासारखे प्राणी बक गणात (Order Ciconiiformes) अंतर्भूत होतात तर बदके, हंस ह्यांसारख्या पाण्यात राहणाऱ्या पक्ष्यांचा वर्ग म्हणजे हंस गण (Order Anseriformes).

**गणांचे** आणखी **कुलांमध्ये** (Families) पृथक्करण करण्यात येते. एका कुलामधील पक्ष्यांचे महत्त्वाचे गुण सारखेच असतात. कुलिंग गणातील पक्षी म्हणजेच फांदीवर बसणारे पक्षी. ह्या गणात एकूण 40 कुले आहेत. त्यांत नाचरे (फ्लायकॅचर्स) (Muscicapidae), कावळे (Corvidae), फुलचुब (Nectariniidae) ह्यांसारखे पक्षी आहेत. ही कुले म्हणजे खरोखरीचीच कुटुंबे आहेत कारण प्रत्येक कुलात अनेक **प्रजाती** (स्पीसीज) असतात. प्रजातींमध्ये विकास पावलेले पुष्कळच गुण सारखे असतात आणि त्यामुळे ते दिसण्यात आणि आचरणात (सवयींत) सारखेच दिसतात. ह्या सवयींचे प्रत्यंतर चोच आणि पंजा ह्यांचे आकार, काही वेळा पंख, आणि साधारण आकार व हालचाल ह्यांत दिसते. अन्नसाधनांच्या पद्धतीवर चोच आणि पाय ह्यांची रचना अवलंबून असते. परंतु त्यासंबंधीचा स्वतंत्र विचार पुढे करणार आहोत. पुष्कळ वेळा एखाद्या नव्या किंवा अनोळखी पक्ष्याची जात जरी सांगता आली नाही तरी त्याचे कुल लगेच सांगता येते. आता बहिरी ससाण्याची आकडीसारखी वाकलेली वरची चोच, सपाट शीर्ष, भेदक डोळे आणि सुदृढ शरीर हे गुण कोणाला दिसणार नाहीत ? ह्या पक्ष्याची नक्की प्रजाती कोणती हे एक वेळ सांगता येणार नाही. पण हा पक्षी ससाण्यांपैकी असावा हे सहज ओळखता येते. त्याचप्रमाणे फुलचुब (सनबर्ड) पक्ष्याची चोच लांब, बारीक आणि वाकलेली असते. ही चोच फुलांच्या पुष्पमुकुटांमधून आत घालून त्यांतील मध हे पक्षी गोळा करतात तेव्हा पक्ष्याची चोच, त्याचा साधारण आकार आणि स्वभाव एवढ्यावरून त्याचे कुल सहज ठरविता येते. काही वेळा अन्नसाधनांच्या सारख्या सवयींमुळे आणि बाह्य सादृश्यामुळे फसगत होण्याचा संभव असतो. उदा. पावशा आणि पोपट ह्या दोन्ही पक्ष्यांच्या चोचींचा आकार व रचना आकडीसारखीच आहेत परंतु हे दोन्ही पक्षी अगदी वेगळ्या कुलाचे प्रतिनिधी आहेत. त्याचप्रमाणे नव्या जगातील हमिंग बर्ड आणि जुन्या जगातील फुलचुब हे पक्षी संपूर्ण वेगळे आहेत. परंतु प्रथमदर्शनी त्यांचा आकार आणि मध गोळा करण्याची पद्धत ह्यांमुळे हे दोन्ही सारखेच वाटतात.

बऱ्याचशा सारख्या गुणांच्या प्रजातीच्या समूहाला **गोत्र** (Genus) म्हणतात. गोत्र कुलापेक्षा खालच्या वर्गाचे असते किंवा दुसऱ्या शब्दांत कुलाचे गोत्रात वर्गीकरण केले जाते. गोत्राची कल्पना संपूर्णपणे मानवनिर्मित आहे. केवळ सोईसाठी सारख्या गुणांच्या प्रजाती एकत्र करून गोत्राची निर्मिती केली आहे. लिनिअसचा नेहमी गोत्रांवर विशेष भर असे; परंतु अलीकडे गोत्रांना फारसे महत्त्व दिले जात नाही. गोत्रांमध्ये कोणत्या प्रजाती एकत्र करावयाच्या

ह्यासंबंधीचे वाद तज्ज्ञांमध्ये होत आले आहेत आणि अजून होत आहेत. शास्त्रीय नावामधील पहिले नाव गोत्राचे असते एवढ्यापुरताच आपला गोत्राशी संबंध येणार आहे. गोत्रामधील सर्व पक्ष्यांचे पहिले नाव एकच असते. उदा. कावळ्यांच्या अनेक जाती आहेत परंतु त्यांच्यामध्येही काही समान गुण असल्यामुळे त्यांना कॉरव्हस (Corvus) ह्या एकाच गोत्रात गोवले आहे.

गोत्राची विभागणी निरनिराळ्या जातींमध्ये करणे (Species) ही वर्गीकरणाची शेवटची पायरी. **जात** एक नैसर्गिक घटक आहे. आंतर निपज करून जातीची कसोटी ठरविण्यात येते. एका जातीत सारख्या गुणधर्माचे वेगवेगळे पक्षी असतात. त्यांचा एकमेकांशी समागम होऊन पुनरुत्पादन होऊ शकते. ह्या नियमानुसार सर्व कुंचीवाले बुलबुल पक्षी, त्यांच्या एकमेकांतील सूक्ष्म फरकासुद्धा, एकाच जातीचे धरले जातात. शेंडीवाल्या बुलबुलांची दुसरी जात, तर श्वेतकपोल बुलबुलांची तिसरी जात ह्याप्रमाणे जातिभेद केले जातात. सभोवतालच्या प्रदेशाची रचना व हवामान ह्यामुळे काही वेळा एकाच जातीच्या पक्ष्यांमध्ये आकार आणि पिसांचे रंग ह्यांत फरक आढळून येतात. उत्तर भागात राहणारे पक्षी दक्षिणेकडे राहणाऱ्या पक्ष्यांपेक्षा साधारणपणे आकाराने मोठे असतात. किंवा दमट हवेत राहणाऱ्या पक्ष्यांचे रंग कोरड्या हवेत राहणाऱ्या पक्ष्यांपेक्षा जरा जास्त गडद असतात. जात्यंतर्गत असे अनेक सूक्ष्म भेद असू शकतात. हे फरक जर अधिक स्पष्ट व कायमचे असतील तर वर्गीकरणशास्त्रज्ञ त्या जातीच्या **उपजाती** आणि **वंश** (Races or Subspecies) ह्यांत आणखी भेद करतात. परंतु निरनिराळ्या वंशांमधील पक्ष्यांची आंतरनिपज होऊन सुद्धा जात तीच राहिल्यामुळे जात ही वर्गीकरणाचा घटक म्हणून राहतेच.

प्रत्येक पक्ष्याचे गोत्र ठरवून त्याचे कुल आणि जात निश्चित करता येते. सध्या पृथ्वीवर पक्ष्यांच्या 8650 जाती आहेत. हे पक्षी ज्या 27 गणांमध्ये विभागले आहेत त्या गणांचा अनुक्रम सर्वात कमी प्रगत अशा वंजुल (grebe) आणि मंजूक (divers) पक्ष्यांपासून सुरू होऊन अतिशय प्रगत अशा फांदीधारी (perching) पक्ष्यांपर्यंत शेवट होतो. ह्या कुलिंग गणातील कोणते पक्षी अधिक प्रगत आहेत ह्यासंबंधी वाद आहेत. काहीजण म्हणतात की कावळा हा सर्वात प्रगत आहे तर दुसरे म्हणतात की फिंच हा सर्वात प्रगत आहे.

भारतामधील 1200 पक्ष्यांच्या जाती 75 कुलांचे आणि 20 गणांचे प्रतिनिधित्व करतात. पक्ष्यांची ही संख्या मोठी आहे. आणि एकाच देशात सापडणाऱ्या, पक्ष्यांचे विविध प्रकार ह्यांत आढळतात. ह्याचे खरे कारण म्हणजे आपल्या देशात आढळणारे हवामानाचे विविध प्रकार, उष्ण व दमट हवामान, तसेच हिमालयात आढळणारे आर्क्टिक थंड हवामान, राजस्थानमधील कोरडे वाळवंटी हवामान आणि डोंगराळ भागातील थंड हवामान, असे विविध प्रकारचे हवामान येथे आहे. आपल्या देशात दाट जंगले, विरळ जंगले, मोकळी मैदाने, शेते, समुद्रकिनारपट्टी, नद्यांची पात्रे, खडकाळ डोंगर, आणि उंच पर्वत असे नाना प्रकार आढळतात. हजारो जातींच्या जीवमात्रांना अनुकूल असे विविध प्रकारचे वातावरण ह्या देशात मिळते. जगामध्ये आढळणाऱ्या पक्ष्यांच्या विविध जातींचे अनेक प्रकार भारतात आहेत. काही जातींचे

पक्षी वर्षभर येथे राहतात; तर काही जातींचे पक्षी हिवाळ्यातच येथे राहतात; तर काही जातींचे पक्षी हिवाळ्यातच येथे स्थलांतर करून येतात. नव्या जगात आणि ऑस्ट्रेलियात किनाऱ्यावर आढळणारे अनेक गणांचे पक्षी मात्र येथे दिसत नाहीत. त्याचप्रमाणे अँटार्क्टिक प्रदेशात राहणारे पेंग्विनसारखे पक्षीही येथे आढळत नाहीत.

# पक्षीविज्ञान आणि पक्षीनिरीक्षण

ब्रिटिश लोकांचे ह्या देशात आगमन होण्यापूर्वी आज जे *पक्षीविज्ञान* म्हणून समजले जाते त्याचा मागमूसही नव्हता. टी.सी. जेरडॉन ह्यांनी 1862-64 ह्या कालात 'भारतीय पक्षी' हे पुस्तक प्रसिद्ध केले त्या वेळेपासून पक्षीविज्ञानाचा पाया आपल्या देशात घातला गेला. त्यापूर्वीच्या काळात एकोणिसाव्या शतकाच्या सुरवातीच्या काळात ईस्ट इंडिया कंपनीचे जे मुलकी आणि सैनिकी ब्रिटिश अधिकारी येथे होते त्यांनी वेळोवेळी जमविलेली फुटकळ माहितीच उपलब्ध होती. डॉ. जेरडॉन हे सैन्यातील शस्त्रवैद्य होते. त्यांनी नोकरीच्या निमित्ताने भारताच्या वेगवेगळ्या भागांत वास्तव्य केले होते. ह्या वास्तव्यात त्यांनी पक्षी गोळा करून त्यांचा विशेष अभ्यास केला होता. जेरडॉन ह्यांच्या पुस्तकात त्यांच्याशिवाय ब्रायन हॉजसन आणि एडवर्ड ब्लिथ ह्या दोन मान्यवर व्यक्तींनी गोळा केलेली माहिती एकत्रित करण्यात आली आहे. जेरडॉनपूर्वी (आणि अगदी अलीकडेपर्यंत) पक्षीतज्ज्ञ पक्ष्यांची शिकार करून किंवा त्यांना पकडून आणणे हेच मुख्य काम करीत असत. ह्या कामात ते स्थानिक शिकाऱ्यांची व पारध्यांची मदत घेत असत. हे करणे फार महत्त्वाचे होते, कारण त्यावेळी बहुतांश पक्षी अज्ञात होते व म्हणून त्यासाठी त्यांना पकडून अगर मारून व संग्रहालयात जमा करून त्याचे वर्गीकरण करणे आवश्यक होते. त्या काळात पक्षीनिरीक्षणाचा छंद विशेष प्रचलित नव्हता. उत्तम दुर्बीण व पक्ष्यांची रंगीत चित्रे उपलब्ध नसल्यामुळे पक्षी हातात आल्याखेरीज त्यांची माहिती होणे शक्य नव्हते. शिवाय त्या काळात संग्रहालयामधील प्राणीशास्त्रज्ञ पक्षीनिरीक्षण ही एक क्षुल्लक बाब असून ती फक्त लहान पोरांनीच करावयाची गोष्ट आहे असे मानीत असत. हा छंद फक्त रिकामे श्रीमंत लोक करू शकतात व त्याला काहीही शास्त्रीय मूल्य नाही अशी त्यांची समजूत होती. त्यामुळे पक्षी मारणे व त्यांची अंडी गोळा करणे हा एकच 'प्रतिष्ठित' व्यवसाय पक्षीतज्ज्ञ त्या काळात करीत असत. जेरडॉनच्या 'भारतीय पक्षी' ह्या पुस्तकामुळे ह्या व्यवसायाला एक तजेला व नावीन्य प्राप्त झाले. पक्ष्यांची पिसे आणि बाह्यवर्णन यांखेरीज ह्या पुस्तकात पक्ष्यांचे जीवन दर्शविणारी छोटी पण वाचनीय माहिती सर्वसामान्य वाचकांसाठी देण्यात आली होती. पक्षीप्रेमी लोकांमध्ये ह्या पुस्तकामुळे एक वेगळीच उत्साहाची लहर आली व त्यामुळे शिकाऊ निसर्गतज्ज्ञांचे क्षेत्र वाढले.

नॅशनल काँग्रेसचे संस्थापक ॲलन ऑक्टेव्हियन ह्यूम ह्या ब्रिटिश अधिकाऱ्याने भारतीय पक्ष्यांच्या अभ्यासविकासातील दुसरा महत्त्वाचा टप्पा निर्माण केला. स्वतः ह्यूम हे जरी ब्रिटिश

अधिकारी होते तरी ते एक फार श्रेष्ठ प्रतीचे पक्षीतज्ज्ञ होते. बरीच वर्षे ह्यूम ह्यांनी ह्या क्षेत्रात आपला अधिकार गाजविला. ते स्वतः एक अतिशय उत्साही व कष्टाळू गृहस्थ असल्यामुळे त्यांनी आपल्याभोवती लवकरच पक्षीप्रेमी लोकांचा समूह जमविला. ते ह्या लोकांना पक्षी गोळा करण्यास प्रोत्साहन देत, आणि पक्ष्यांचे सांगाडे कसे जमवावे, पक्ष्यांबद्दलची माहिती कशी गोळा करावी, तिची नोंद कशी करावी ह्यासंबंधीचे अर्थपूर्ण मार्गदर्शन करीत असत. ह्या कार्यात त्यांनी इतर लोकांच्या संग्रहांमधील पक्ष्यांचा अभ्यास करून त्यांची नावे ओळखून काढली व त्यासंबंधीची माहितीही प्रसिद्ध केली. 'स्ट्रे फेदर्स' नावाचे एक नियतकालिक ह्यूम ह्यांनी प्रसिद्ध करण्यास सुरवात केली. ते पक्षीप्रेमी लोकांनी जमविलेली वर्णने व माहिती संपादित करून ह्या नियतकालिकात प्रसिद्ध करीत होते. 1872-88 ह्या सोळा वर्षांच्या कालात 'स्ट्रे फेदर्स'चे अकरा भाग प्रसिद्ध झाले. त्यामुळे आपल्या भारतीय पक्षीविज्ञानाचा पाया घातला गेला. ह्या खंडांचा संदर्भ घेतल्याखेरीज भारतीय पक्षीविज्ञानाचे कार्य आजही पुरे होत नाही, ह्यातच त्यांचे खरे मूल्य आहे.

1889 आणि 1898 च्या दरम्यान इंडिया ऑफिसने ई. डब्ल्यू. ओट्स आणि डब्ल्यू.टी. ब्लॅनफोर्ड ह्यांनी संपादित केलेल्या 'फॉना ऑफ ब्रिटिश इंडिया' ह्या ग्रंथाचे चार भाग प्रसिद्ध केले. त्यामुळे पक्षीनिरीक्षणाला भारतात आणखी उठाव मिळाला. दोघेही वास्तविक पक्षीतज्ज्ञच होते, परंतु त्यांचा मुख्य व्यवसाय वेगळा असल्यामुळे त्यांना हौशी तज्ज्ञच म्हणतात. ओट्स पब्लिक वर्क्स डिपार्टमेंटमधील अभियंत्याचे काम करीत तर ब्लॅनफोर्ड हे सरकारी भूस्तरशास्त्रज्ञ होते. ह्यूम आणि त्यांचे सहकारी ह्यांनी कष्टाने जमविलेल्या माहितीचा ह्या पुस्तकात उपयोग करण्यात आला होता. या पुस्तकामुळे भारतीय पक्ष्यांचे वर्गीकरण व नामकरण त्या काळात प्रचलित असलेल्या शास्त्रीय पातळीवर आणले गेले. त्याशिवाय सिंध, काश्मीर, आसाम, बंगाल (आताच्या बांगलादेशसकट), ब्रह्मदेश, अंदमान व निकोबार बेटे आणि श्रीलंका ह्या भागांतील पक्ष्यांची माहिती एकत्रित केली गेली हे विशेष. जेरडॉनच्या काळात हे भाग पक्ष्यांच्या बाबतीत अज्ञातच राहिले होते. पक्षीविज्ञानाच्या विद्यार्थ्यांना 'दि फॉना' म्हणून परिचित असलेल्या ह्या पुस्तकाच्या पहिल्या आवृत्तीत त्यावेळच्या भारतीय ब्रिटिश साम्राज्यामधील सर्व भाग अंतर्भूत केलेले आहेत. त्यामुळे पक्षीवैज्ञानिकांना फार मोठ्या खंडातील पक्ष्यांचा अभ्यास व टापू ह्यांचा लाभ झाला. प्रामुख्याने ब्रिटिश मळेवाले, मुलकी व सैनिकी अधिकारी यांनी व इतर पक्षीप्रेमी लोकांनी ह्या पुस्तकाच्या मार्गदर्शनाचा लाभ घेतला. 'दि फॉना' ह्या पुस्तकामुळे भारतामधील पक्षीविज्ञानाच्या वाढीला एक वेगळाच वेग निर्माण झाला. 'स्ट्रे फेदर्स' ह्या मासिकाचे प्रकाशन थांबल्यावर त्या सुमारास प्रसिद्ध होऊ लागलेल्या 'जर्नल ऑफ दि बॉम्बे नॅचरल हिस्टरी सोसायटी' ह्या नियतकालिकात पक्ष्यांविषयीची पाहणी, वर्णन इत्यादी मजकूर जास्त प्रमाणात प्रसिद्ध होऊ लागला. तेव्हापासून आजपर्यंत 'जर्नल' मध्येच पक्षीप्रेमी लोकांचे वाढत्या संख्येने पक्षीविषयक लेख प्रसिद्ध होत आहेत.

1920 च्या सुमारास पक्ष्यांचे भौगोलिक वितरण आणि त्यांच्या सवयी ह्यासंबंधीच्या

ज्ञानात इतकी भर पडलेली होती की 'दि फॉना' ह्या मालिकेची सुधारून वाढविलेली आवृत्ती प्रसिद्ध करण्याची जरुरी भासू लागली.1921 ते 1930 च्या दरम्यान हे काम पुरे करण्यात आले त्यावेळी मूळच्या चार खंडांचे आठ खंडांच्या व्यापक स्वरूपात रूपांतर झाले. ई.सी. स्ट्युअर्ट बेकर ह्या भारतीय रक्षक (पोलिस) दलामधील एका अधिकाऱ्याने हे खंड संपादित केले. स्ट्युअर्ट बेकर हेसुद्धा हौशी तज्ज्ञ होते; कारण त्यांचा मुख्य व्यवसाय वेगळाच होता. आसाममध्ये ते नोकरीला होते त्यावेळी त्यांनी पक्ष्यांचा संग्रह केला, त्यांचा अभ्यास केला व त्यांच्या घरटीबांधणीबद्दलची माहिती गोळा केली होती. 'न्यू फॉना' ही नवी आवृत्ती पूर्वीच्या आवृत्तीपेक्षा केवळ मोठी होती असे नव्हे तर त्यात पक्ष्यांचे वर्गीकरण, नामाभिधान आणि सर्वसाधारण माहिती अद्ययावत होती. ह्या आवृत्तीमध्ये अगदी अलिकडील वर्गीकरणपद्धती होती, आणि पाश्चात्य राष्ट्रांमधील आधुनिक पक्षीविज्ञानाच्या पातळीची माहिती देण्यात आल्यामुळे पक्षीविज्ञानामधील अज्ञात जागा ह्या आवृत्तीमध्ये भरल्या गेल्या होत्या. त्याशिवाय पक्ष्यांसंबंधीच्या कोणत्या बाबतीत अधिक संशोधनाची गरज आहे त्याचेही मार्गदर्शन ह्यात होते. त्यामुळे पक्षीप्रेमी लोकांना हे पुस्तक म्हणजे एक आव्हानच होते आणि त्यांनी ते स्वीकारण्यात यत्किंचितही कसूर केली नाही.

'न्यू फॉना' प्रसिद्ध होऊन आज चाळीस वर्षांहून अधिक काळ लोटला आहे. ह्या काळात प्रामुख्याने ब्रिटिश व्यक्तींनी व 1947 नंतर स्वातंत्र्याच्या काळात भारतीय व्यक्तींनी भारतामधील अनेक अपरिचित भागांमधील पक्षीनिरीक्षण करून अभ्यासात खूपच भर टाकली आहे. ह्या काळातील ह्यू व्हिस्टलर आणि क्लॉड बी. टिसेहर्स्ट ह्या दोन व्यक्तींची नावे इतरांपेक्षा अधिक महत्त्वाची आहेत. स्ट्युअर्ट बेकरप्रमाणेच व्हिस्टलर भारतीय रक्षक दलात होते तर टिसेहर्स्ट सैन्यातील डॉक्टर होते. टिसेहर्स्ट ह्यांचे पक्षीप्रेम पहिल्या महायुद्धाच्या काळात ते पश्चिम पाकिस्तानात असताना निर्माण झाले. रॉयल मेडिकल कोअरबरोबर ते ह्या भागात ठिकठिकाणी हिंडले व त्यावेळी त्यांनी तेथील पक्ष्यांची माहिती गोळा केली. व्हिस्टलर आणि टिसेहर्स्ट ह्यांनी भारतीय पक्षीविज्ञानात 'न्यू फॉना'च्या प्रकाशनानंतरच्या काळात विशेष उल्लेखनीय भर घातली. ह्याचा परिणाम असा झाला आहे की आता भारतीय पक्ष्यांचा संग्रह करण्याचे कारण राहिले नाही. फक्त जे अज्ञात भाग आहेत किंवा क्वचित दिसणारे पक्षी आहेत त्यांचाच मागोवा घेणे जरूर आहे. जगभर विखुरलेल्या मोठमोठ्या व महत्त्वाच्या संग्रहालयांमधून पक्ष्यांचा अमाप संग्रह आता उपलब्ध आहे. जरूर पडल्यास हे पक्षी त्या संग्रहालयातून केव्हाही उधार-उसनवार तत्त्वावर अभ्यासासाठी आणता येतात. आता खरी गरज आहे ती संग्रहालयातून बाहेर पडून प्रत्यक्ष पक्षीजीवन पाहण्याची. त्यांच्या जीवनाच्या विविध पैलूंची अचूक माहिती मिळविणे आवश्यक आहे. उदा., पक्षी कसे आणि कोठे राहतात, सभोवतालच्या परिस्थितीशी ते कसे जुळवून घेतात, त्यांची समाजरचना कशी आहे व त्यांच्या संख्येची गतिशीलता (डायनॅमिक्स) कशी आहे. पक्ष्यांचे अन्न व अन्नसाधनाचे प्रकार जाणून घेऊन ते आपल्या आर्थिक व्यवस्थेचे मित्र आहेत की शत्रू आहेत हे पाहावयास पाहिजे. आपल्या शेतकीप्रधान जंगलांच्या व दाट लोकवस्तीच्या देशात वारंवार अन्नाचा तुटवडा

पडतो, म्हणून हा प्रश्न तातडीचा आणि विशेष महत्त्वाचा आहे. ह्या प्रश्नातील पक्ष्यांचा वाटा समजण्यासाठी संग्रहालयातील शुष्क व मृत पक्ष्यांची कलेवरे अभ्यासून चालणार नाही.

निरनिराळ्या जातींची जीवनकथा कशी आहे व ह्या जातींचे इतर सजीवांबरोबर कसे जीवन व्यतीत होते ह्या दोन्ही गोष्टींचा अभ्यास फार संथ तर असतोच पण त्यासाठी चिकाटी व चिवटपणाही तितकाच भरपूर असावा लागतो. पक्ष्यांच्या सवयी व स्वभाव ह्यांसबंधीचे आपले ज्ञान अद्याप प्राथमिक व विखुरलेले आहे. हौशी पक्षीनिरीक्षकांनी पाठविलेली माहिती पक्षीजीवनामधील महत्त्वाचे दुवे सांधण्याचे कार्य करते.

पक्षीनिरीक्षणामधील पहिली पायरी म्हणजे कोणत्याही प्रदेशातील नित्याचे पक्षी खात्रीपूर्वक ओळखता आले पाहिजेत. ज्याप्रमाणे मूळाक्षरे माहीत असल्याखेरीज वाचता येत नाही त्याचप्रमाणे ही खात्री असल्याखेरीज पुढे प्रगती करता येणार नाही. पक्षीनिरीक्षणाचा श्रीगणेशा शिकण्यासाठी दुर्बीण, नोंदवही व संदर्भग्रंथ ह्या तीन गोष्टींची आवश्यकता आहे.

8x30 किंवा 7x50 ची दुर्बीण ह्या कामासाठी अतिशय योग्य आहे. दुर्बीण अतिशय बोजड असता कामा नये पण त्याचबरोबर तिची वर्धनशीलता (मॅग्निफिकेशन) भरपूर असली पाहिजे व तिच्यामध्ये जवळच्या पल्ल्याचे योग्य केन्द्रीकरण करण्याची क्षमता असली पाहिजे. पक्षीनिरीक्षणाच्या छंदात पाऊल टाकणाऱ्या व्यक्तीने शेतात अगर मैदानात दिसणारे पक्षी संदर्भग्रंथांच्या साहाय्याने ओळखण्यास शिकले पाहिजे. प्रस्तुत पुस्तक त्या बाबतीत बरीच मदत करील अशी अपेक्षा आहे. त्याशिवाय व्हिस्टलरचे 'पॉप्युलर हँडबुक ऑफ इंडियन बर्ड्स' व सालिम अलींचे 'द बुक ऑफ इंडियन बर्ड्स' ही दोन अतिशय उपयोगी पुस्तके आहेत. सालिम अलींच्या पुस्तकात पक्ष्यांचे आकार, मुख्य रंग व शरीररचना (उदाहरणार्थ, लांब चोच, पाय वगैरे) ह्याचे तक्ते असून शिवाय प्रत्येक जातीच्या पक्ष्याचे रंगीत चित्र आहे. त्यामुळे पक्षी ओळखण्याचे काम सोपे होते.

ओळखण्यासाठी सर्वप्रथम व महत्त्वाची गोष्ट म्हणजे एखाद्याने नक्की 'काय' पाहिले आहे. उदाहरणार्थ, एखाद्याने एक छोटा काळा व पांढरा पक्षी पाहिला. त्या पक्ष्याच्या शरीराचे कोणते भाग पांढरे होते हे पाहणे महत्त्वाचे आहे. पांढरा भाग डोक्याचा होता का शेपटीचा होता का खालचा भाग होता हे महत्त्वाचे आहे. त्याशिवाय पक्ष्याच्या आणखी एकदोन गोष्टी पाहणे जरुरीचे असते. चोचीचा आकार व रंग, पायाचा आकार व रंग, शेपटीचा आकार व रंग आणि त्याशिवाय दिसणारे एखादे खास (तुऱ्यासारखे) वैशिष्ट्य. प्रथमच ज्यावेळी पक्षी पाहिला जातो त्यावेळी पक्ष्याचे वर सांगितलेले गुण एकाच वेळी पाहणे जमत नाही; कारण तो पक्षी फारच थोडा वेळ दिसतो. म्हणून एका वेळी फक्त काही (एक किंवा दोन) गोष्टींचीच नोंद करण्याचा दृष्टीने तो पक्षी टिपावा. दुसऱ्या शब्दात, एखादा पक्षी मैनेच्या आकाराचा होता आणि त्याचे पाय तांबड्या रंगाचे होते हे पाहणे, तो पक्षी तपकिरी व तांबडा असून काही ठिकाणी काळा व राखी होता हे पाहण्यापेक्षा पक्षी ओळखण्याच्या दृष्टीने अधिक उपयुक्त असते. अडचण अशी की आपली स्मृती आपल्याला वाटते इतकी तल्लख नसल्यामुळे पक्षी ओळखण्याच्या कामात घोटाळे निर्माण होतात. पक्ष्याचा रंग व इतर गुण काय होते हे आपण काही तासांत विसरण्याची

नुसती शक्यताच नव्हे तर खात्री असते. म्हणूनच आपण काय पाहिले ह्याची ताबडतोब नोंद करणे अतिशय महत्त्वाचे आहे. त्यासाठीच आपल्याजवळ वही-पेन्सिल असणे आवश्यक असते.

क्वचित-प्रसंगी एखाद्याला पक्षीनिरीक्षण करताना अशी काही मोक्याची जागा मिळते की तेथून तो पक्षी बराच वेळ पाहता येतो. अशा वेळी त्या पक्ष्याबद्दल जेवढे समजेल वा दिसेल ते लिहून ठेवणे योग्य होय. ह्या नोंदीचे वेळी त्यात पक्ष्याचा आकार (एखाद्या परिचित पक्ष्याच्या तुलनेने), सर्वसाधारण रंग, अंगावरील खास खुणा व त्यांच्या जागा, चोच, पाय, पंख, शेपूट, मान व शक्य असल्यास डोळे ह्या अवयवांचा आकार, रचना व रंग ह्यांची माहिती द्यावी, जागच्या जागी रेखाटलेले त्याचे चित्र मग ते किती ढोबळ असले तरी फार उपयोगी पडते. हा पक्षी कोणत्या जागी दिसला — उदा., जमिनीवर, झाडावर, जुनाट खोडावर, पाण्यावर इत्यादी — आणि त्याची त्यावेळी होणारी हालचाल यांची नोंद करणे हेसुद्धा महत्त्वाचे असते. काही पक्ष्यांच्या हालचाली विशिष्ट पद्धतीच्या असतात — उदा., उड्या मारणे, उडण्याची खास लकब. त्यामुळे त्यांना ओळखणे सोपे जाते आणि म्हणूनच ही नोंद जरूर आहे. पक्ष्याचे गाणे किंवा आवाज त्याला ओळखण्यास फारच उपयोगी पडतात. पण हे आवाज शब्दात लिहिणे फार कठीण असते. तरी सुद्धा हा आवाज कशा प्रकारचा होता (उदा., एकच स्वर, शीळ किंवा उडण्याचे वेळी केलेला किर्र आवाज किंवा तीव्र वटवट) ह्याचे पुसट निदान जरी देता आले तरी तो ओळखण्यासाठी फार उपयोगी पडते. पक्षी कोणत्या दिवशी (दिनांक, वार, वगैरे) व कोणत्या परिस्थितीत होता हे सुद्धा अर्थातच महत्त्वाचे आहे. तारखांमुळे स्थलांतर करणाऱ्या पक्ष्यांचा सुगावा लागतो किंवा विणीच्या हंगामात दिसणारा विशिष्ट पिसारा कळू शकतो. परिस्थितीच्या वर्णनामुळे त्या पक्ष्याचा प्रदेश कोणता असावा हे निश्चित करता येते.

पुस्तकांमधील रंगीत चित्रांमुळे पक्ष्यांच्या रंगाचे जरी अगदी बारीक वर्णन मिळत असले तरी पहिल्याच वेळी निरीक्षकाला हे सर्व रंग एकदम दिसत नाहीत हे समजून येईल. हा प्रकार विशेषतः उडत असलेल्या पक्ष्यामध्ये किंवा झाडाच्या गर्द पानात वावरणाऱ्या पक्ष्यांमध्ये नेहमी अनुभवास येतो. मोकळा सूर्यप्रकाशही पुष्कळ वेळा फसवितो. कारण एखाद्या विशिष्ट कोनामधून दिसलेले रंग नुसत्या डोळ्यांनी पाहिले तर प्रत्यक्षात ते वेगळेच दिसतात. म्हणून पक्षी ओळखण्यासाठी केवळ त्याच्या रंगाची नोंद न घेता, चोच, पाय, डोके व शेपूट ह्यांची नोंद घेणेही जरुरीचे आहे.

थोडासा धीर धरल्यास अपरिचित पक्ष्यांचे कुल ठरविणे सोपे असते हे लक्ष्यात येईल. कारण माणसाच्या घराण्यातील चालीरीती व चेहरे जसे सारखे असतात त्याचप्रमाणे पक्षीकुलांच्या चालीरीती व मुखडे सारखेच असतात. पक्षी पाहिल्याबरोबर जरी त्याची नक्की प्रजाती ठरविता आली नाही तरी त्याचे कुल सहज ओळखता येते, कारण काही पक्ष्यांच्या विशिष्ट पद्धती चटकन ध्यानात येतात. उदा., बगळ्याच्या कुलातील पक्ष्यांचे उडताना मान मागे वळवणे, खंड्या पक्ष्याची चोच, ससाण्याचे शीर्ष व चोच, इत्यादी गुण त्या पक्ष्याचे कुल ताबडतोब सांगू शकतात. जसाजसा पक्ष्यांचा परिचय वाढत जातो तसातसा त्यांच्या

**हालचालीचा** गुण विशेष लक्ष्यात येऊ लागतो. काही जाती आणि त्यांच्यासारख्या आणखी काही जातींमधील पक्ष्यांची हालचाल सारखीच असते. नाचरा पक्षी (Flycatcher) कीटकांप्रमाणे उडत असतो. त्यामुळे त्याला नीट न पाहता सुद्धा सहज ओळखता येते. बडबड्या (Wren-warbler) ची चालही विशिष्ट प्रकारे उडती असते. पक्षीतज्ज्ञ व्यक्तीला मात्र एखाद्या क्वचित दिसणाऱ्या किंवा अनोळखी पक्ष्याची ओळख पटवून घेण्यासाठी बॉम्बे नॅचरल हिस्टरी सोसायटी किंवा झूलॉजिकल सर्व्हे ऑफ इंडिया ह्यांच्या संग्रहालयातच यावे लागते.

घरटे सापडले तर ते एक वरदानच समजावे, कारण त्यामुळे पक्ष्याचा अधिक जवळून अभ्यास करता येतो. घरट्याचे निरीक्षण करताना कावळे किंवा तत्सम शत्रू पक्ष्यांना त्या घरट्याचा सुगावा लागणार नाही अशी काळजी घ्यावी लागते आणि ह्या घरट्यामधील अंडी किंवा पिले हाताळण्याचा मोह निग्रहाने टाळला पाहिजे. माणसांनी हाताळलेल्या पिलांना त्याचे पालक खाऊ घालणार नाहीत अशी मात्र समजूत करून घेऊ नका; पण पिले अतिशय नाजूक असतात म्हणून त्यांना स्पर्श करू नये किंवा भिववू नये. पक्षी जखमी झाला असताना जी विचित्र परिस्थिती निर्माण होते त्यावेळी मात्र तो हातात घ्यावा लागतो. अशा वेळी त्याला हलके पण पक्के पकडून पंज्यांनी त्याचे पंख मिटवावे व पहिल्या आणि मधल्या बोटांनी त्याच्या मानेभोवती कडे घालावे. काही पक्षी इतके नाजूक असतात की त्यांच्या छातीवर जरी थोडासा भार पडला तरी तो त्यांना मारक ठरण्याचा संभव असतो. पक्षी हातात घेतल्यावर त्याची पाठ तळहातावर टेकवून ठेवावी. ह्या परिस्थितीत पक्षी बहुशा स्थिर राहतो व त्यामुळे त्याचे बारकाईने निरीक्षण करता येते. त्याला सोडण्याचे वेळी उलटा करून हातातून हवेत सोडावे.

पक्षीनिरीक्षण करणाऱ्या प्रत्येक व्यक्तीला पक्ष्यांसंबंधी नवा किंवा आश्चर्यकारक शोध लावता येणे शक्य नाही. पण एखाद्या पक्ष्याशी चांगली ओळख झाली की मग हा छंद आयुष्यभर टिकतो आणि तो कोणत्याही परिस्थितीत चालू ठेवता येतो.

# प्रजोत्पादन

पिलांचे पोषण करणे हा सर्व पक्ष्यांचा एक मोठा जिकिरीचा व धडपडीचा वार्षिक व्यवसाय असतो. लांब अंतरावर स्थलांतर करणाऱ्या पक्ष्यांना तर घरटी बांधण्यापूर्वी अनेक अडचणींना व संकटांना तोंड द्यावे लागते. घरटी बांधणाऱ्या पक्ष्यांच्या कुटुंबाची परिस्थिती तर आक्रम्य (vulnerable) असते व त्यामुळेच त्यांना सभोवतालच्या परिस्थितीपासून शक्य तेवढे जास्त संरक्षण घ्यावे लागते. घरटे लपवू शकेल असा आसरा असावा लागतो; घरटे तयार करण्यासाठी सामान असावे लागते; त्यांना प्रथम अंड्यांसाठी व नंतर पिलांसाठी ऊबदार हवा लागते; पिलांसाठी भरपूर अन्नसाठा लागतो; आणि अन्न शोधण्यासाठी दीर्घकाल प्रकाश देणारे दिवस असावे लागतात. सर्वात महत्त्वाची गोष्ट म्हणजे अन्नपुरवठा. पक्षी अन्नपुरवठा भरपूर असेल अशाच वेळी आपली घरटी बांधण्याचा काल निवडतात; मग त्यावेळी इतर काही अडचणी असल्या तरी त्याची ते पर्वा करीत नाहीत. मुंबईच्या आसपास पावसाळ्यात घरटी बांधणाऱ्या छोट्या पक्ष्यांमध्ये हा प्रकार दिसून येतो. जोराचे वारे आणि पाऊस असतानासुद्धा त्यांनी आपले तकलादू घरटे बांधावे हे एक आश्चर्यच आहे. परंतु त्या सुमारास अळ्यांचे आणि कीटकांचे जे अमाप पीक येते त्यापुढे ह्या पक्ष्यांना जोराच्या पावसाची तमा नसते. थंड प्रदेशातील पक्षी वसंत ऋतूत आणि उन्हाळ्यात पुनरुत्पादनाचे कार्य करतात, कारण त्या मोसमातील हवा सुखकारक असते. आपल्या येथेही निरनिराळ्या जातीचे पक्षी निरनिराळ्या वेळी घरटी बांधतात. ही वेळ त्यांच्या आवडीचे किडे किंवा अळ्या जेव्हा भरपूर असतात त्या सुमाराची असते.

अन्नाचा साठा भरपूर आहे व सभोवतालची परिस्थितीही प्रतिकूल नाही अशा वेळीच प्रत्येक प्रजाती आपली वीण घालत असते. पुनरुत्पादनासाठी लागणारी शारीरिक तयारी ह्या हंगामाच्या सुमारास पूर्ण होत असते. त्यांना न आवडणारी परिस्थिती असेल तर पुनरुत्पादन न करणारे पक्षी पुष्कळ आहेत. कच्छच्या रणात पावसाळ्यानंतर वीण घालणारा रोहित पक्षी (Flamingo) योग्य परिस्थिती येण्याची वाट पाहात असतो. काही वर्षी पाऊस अतिशय झाला किंवा अवर्षण झाले तर हा पक्षी घरटे बांधत नाही.

विणीचा हंगाम येऊ घातला म्हणजे नरांच्या शरीरावर विणीच्या हंगामी पिसांचा साज चढतो. काही वेळा ही पिसे संपूर्ण नवीन असतात तर काही वेळा जुन्याच पिसांवर जादा रंगांचे भाग तयार होतात. गायबगळ्याच्या (Cattle Egret) बाबतीत त्याच्या डोक्यावर आणि

मानेवर नारिंगी छटा निर्माण होते. किंवा काही वेळा जुन्याच पिसांची नवी रचना करून अंगावर पिवळसर रंग निर्माण केला जातो. ह्याच सुमारास नरांना कंठ फुटतो किंवा निदान त्यांच्या स्वरमंडळात अधिक स्वरांची भर पडते. वर्षात इतर वेळी एकमेकांशी संबंध ठेवण्यासाठी ते त्यांचे हाकारे (calls) किंवा आवाज असतात त्यांच्याशी ह्या हंगामातील गाण्यांचा किंवा स्वरांचा घोटाळा करू नये. विणीच्या हंगामात निर्माण होणारे गाणे हे केवळ विणीसाठीच उपयोगात आणले जाते. पक्ष्यांचे गाणे हे केवळ मादीला आकर्षित करण्यासाठी असते असा आजपर्यंत समज होता. परंतु उत्कृष्ट गाणाऱ्या पक्ष्यांचा आवाज स्वतःचे स्वामित्व सिद्ध करण्यासाठी व इतर स्पर्धकांनी आपल्या घरट्याच्या प्रदेशापासून दूर राहावे असा इशारा देण्यासाठीही असतो. अन्नाचा साठा मर्यादित असल्यामुळे एका वेळी एका कुटुंबापेक्षा अधिक पक्ष्यांची उपजीविका होऊ शकणार नाही हे काही छोट्या गाणाऱ्या पक्ष्यांना समजते. म्हणून नर स्वतःसाठी एखादी जागा किंवा प्रदेश निवडतो आणि मग आक्रमण करणाऱ्या इतरांशी युद्ध करून त्यांना हाकलून देतो. मोठ्या आवाजाचे गाणे हे त्याच्या शस्त्रसंभारातील एक जबरदस्त शस्त्र आहे. जे पक्षी अजिबात गाऊ शकत नाहीत तेसुद्धा विणीच्या हंगामात वेगवेगळे आवाज काढतात. उदा., करकोच्यांना आवाज निर्माण करणारे स्नायू नसतात पण ते विणीच्या हंगामात आपल्या चोचीच्या साहाय्याने किटकिट असा काही तरी वेगळाच आवाज काढतात.

आपल्या प्रेयसीचे हृदय जिंकून घेण्यासाठी बहुतेक पक्ष्यांचे नर प्रियाराधनाचा खेळ करतात. मोराचा नाच तर सुप्रसिद्धच आहे. आपल्या नाचाने तो मादीचे अगर सहज पाहात असलेल्या किंवा इतरत्र पाहात असलेल्या माणसाचे लक्ष वेधण्याचा प्रयत्न करतो. चाष (Roller) पक्षी तर मादीसमोर हवेत नाना प्रकारच्या कोलांट्या घेतो, तर पोपट (Parakeet) पक्षी एकदा एका व नंतर दुसऱ्या पायावर मोठ्या डौलात उभा राहतो. काही पक्षी आपले विविध रंगांचे पिसारे नाना प्रकारांनी मादीसमोर खेळवितात; तर काही पक्षी आपले प्रियाराधन शांतपणाने करतात. सुगरण (Baya) पक्ष्यांतील नर उत्कृष्ट घरटे बांधून प्रियेला आकर्षित करतो. ज्या नराचे घरटे मादीला आवडते किंवा आकर्षित करते त्या नराला ती आपला सहचर निवडते. काही पक्षी एखाद्या अळीचा किंवा इतर काही खाद्य पदार्थाचा नजराणा देऊन प्रियेला वश करून घेतात. अशा वेळी आपली हौस पुरवून घेण्याची संधी मादी सहसा सोडीत नाही.

प्रियाराधनानंतरच्या अवस्थेत ते युगल, किंवा एकटाच नर अगर मादी, घरटे बांधण्याच्या कार्याला सुरवात करते. आपल्या नेहमीच्या वास्तव्याच्या ठिकाणात पक्षी साधारणपणे आपली घरटी बांधतात. उदा., गरुडपक्षी नेहमीच अतिशय उंच ठिकाणी वास्तव्य करतात म्हणून ते आपली घरटी एखाद्या उंच कड्यावर किंवा खडकावर बांधतात. झाडांवर राहणारे पक्षी घरटी नेहमी झाडांवरच बांधतात. चितूर (Partridge) आणि लाहुरी (Quail) ह्यांसारखे जमिनीवर राहणारे पक्षी आपली अंडी जमिनीवर घालतात. पाण्यात राहणारे करढोक (Cormomant) व क्वाक (बक–Heron) हे पक्षी पाण्याजवळ आपले घरटे तयार करतात, इत्यादी. घरटी करण्याचा प्रकार हा सर्वसाधारणपणे असा असतो. पण त्यासही बरेच वेळा असंख्य अपवाद आढळतात. त्यांपैकी दोहोंचा निर्देश करतो. पुष्कळशी बदके पाण्यात राहून सुद्धा झाडांवर

घरटी बांधतात हे एक उदाहरण. तर दुसरा म्हणजे वेडा राघू (Bee-eater) हा पक्षी जमिनीवर राहणारा नसून सुद्धा आपले घरटे मातीच्या आडव्या बोगद्यांमधून बांधतो.

घरट्यांच्या आकारात व रचनेत विलक्षण वैचित्र्य आढळते. काही जमिनीवर राहणारे पक्षी पाण्याने जमीन खरडवून खड्डा करतात व त्यात अंडी घालतात तर दुसऱ्या टोकाला सुगरण पक्षी आपले घरटे इतके उत्कृष्ट बांधतात की ते काही जणू एखाद्या विणकऱ्याने विणलेले सुबक टोपले आहे असे वाटते. ह्या घरट्यात आतल्या बाजूला अंडी ठेवण्यासाठी खास जागा किंवा खोली तयार केलेली असते. काही जण जुनाट फांदीत किंवा पडक्या भिंतीमधील भोकात अंडी घालतात. ह्या भोकाला ते मऊ वस्तूंनी आतून अस्तर लावतात. काही जण बोगदे खणतात, तर काही जण फांद्यांमधून गवताच्या वाट्या तयार करतात. पाण्यात राहणारे जलकपोत (Jacana) पक्षी पाणवनस्पतींच्या तरंगणाऱ्या पानांचे ओबडधोबड घरटे तयार करतात. मागे सांगितल्याप्रमाणे काही पक्षी, इतर सजातीय पक्षी आपल्या आसपास घरटे बांधत नाहीत ह्याची काळजी घेतात; तर इतर काही पक्षी कळप करून घरटी बांधतात. समूहात राहणे अर्थातच सुरक्षित असते. पण आश्चर्य असे की, करकोचा (Stork), क्वाक (Heron) आणि बगळा (Egret) ह्यांसारखे आक्रमक पक्षी समूहाने घरटी बांधतात, तर विणकर (Tailor), राखी वटवट्या (Wren-warbler) व चीरक (Robin) ह्यांसारखे फांदीधारी (passerine) नाजूक पक्षी स्वतंत्रपणे घरटे बांधतात. ही घरटी सभोवतालच्या परिस्थितीशी अतिशय जुळणारी असल्यामुळे सहज लक्षात येत नाहीत. हा फरक असण्याचे एक कारण संभवते. लहान पक्ष्यांना लांब अंतरावर जाऊन अन्नशोधन करणे शक्य नसावे आणि त्याचप्रमाणे ह्या अन्नात आणखी कोणी वाटेकरी जवळपास नसावा. उलट मोठाले पक्षी लांब अंतरावर जाऊन अन्न गोळा करण्याइतपत सशक्त असतात आणि त्यांना स्पर्धक पक्ष्याची विशेष काळजी नसते.

निरनिराळ्या जातींच्या पक्ष्यांमधील अंडी उबविणे व पिलांचे पोषण करणे ही कामे आईबापांकडे वेगवेगळ्या प्रमाणात वाटलेली असतात. काही पक्ष्यांत ह्या कामाची समान वाटणी असते, काही पक्ष्यांमध्ये हे काम बऱ्याच अंशी मादीकडे असते तर पाणलाव (Snipe) आणि जलकपोत (Jacana) ह्या पक्ष्यांमधील नराकडेच सर्व गृहकृत्ये सोपविलेली असतात. कोणत्याही प्रकारात पिलांच्या जनकांना खूपच कष्ट करावे लागतात हे मात्र खरे. आपल्या जीवनाच्या पहिल्या काही दिवसात पिले रोज आपल्या वजनाच्या दुप्पट भाराचे अन्न खातात असा अंदाज करण्यात आला आहे. वास्तविक त्यांची वाढ फार झपाट्याने होत असते; परंतु त्यांच्या सुरवातीच्या दिवसांत मात्र त्यांना फार मोठ्या प्रमाणात अन्न पुरवावे लागते. दिवस उजाडल्यापासून मावळेपर्यंत अन्नासाठी अनंत फेऱ्या मारून आईबाप पिलांना भरवीत असतात. तरीसुद्धा अंड्यातून बाहेर पडल्यानंतरच्या पहिल्या आठवड्याच्या काळात ह्या पिलांची तृप्ती मात्र कधीच होत नाही.

शत्रूंपासून अगर अपघातातून ही पिले जरी वाचत असली तरी त्यांचे घरट्यामधील जीवन नेहमीच धोक्याचे असते. सगळ्यांच्या शेवटी अंड्यातून बाहेर पडलेले पिलू किंवा एखादे अशक्त व नाजूक पिलू मात्र इतर भावंडांपेक्षा दुर्लक्षित राहते. कारण मोठ्या भावंडांच्या चोची

अन्नाकरता कायमच उघडलेल्या असतात व साहजिकच त्यांच्या मुखांत जास्त अन्न पडते. काही वेळा अशा ह्या अपंग पिलाला त्याच्या भावंडांकडून तुडविले जाण्याचा अगर घरट्याबाहेर ढकलून दिल्यामुळे पडण्याचा धोका असतो. ही झाली अंतर्गत संकटे. पण त्याशिवाय मांजर, सरडा, उंदीर, साप, कावळे आणि इतर पक्षी व वादळे, वारा आणि इतर नैसर्गिक आपत्ती ह्या बाह्य आपत्तींचा धोकाही पुष्कळच असतो. हा धोका पिले स्वतंत्रपणे घरट्याबाहेर पडू लागली तरी संपत नाही. ह्या सर्व संकटांमधून वाचणाऱ्या प्रजेची संख्या खूपच कमी असल्यामुळे पक्षी एकामागोमाग एक अशा पिढ्या तयार करतात आणि खूप संख्येने अंडी घालतात. त्यामुळे त्यांची प्रजा कशीबशी टिकते. समजा एखादे वेळी दुर्दैवाने घरट्यामधील सर्व अंडी अगर पिले नाश पावली तर आईबाप दुःख करीत वेळ फुकट घालवीत नाहीत. ते ताबडतोब दुसरे घरटे बांधण्याच्या उद्योगास लागतात. पुनरुत्पादन करण्याची ओढ सर्व प्राण्यांप्रमाणेच पक्ष्यांमध्ये जबरदस्त असते आणि म्हणूनच ते सर्व प्रकारच्या अडचणींवर मात करू शकतात.

# स्थलांतर

पक्षीविज्ञानामधील आजपर्यंत न सुटलेला आणि अतिशय वैशिष्ट्यपूर्ण प्रकार म्हणजे स्थलांतर (migration). वर्षातून दोनदा शरद आणि वसंत ह्या दोन ऋतूंमध्ये लक्षावधी पक्षी एका विशिष्ट स्थली जाण्यासाठी हवाई प्रवासाचे प्रस्थान ठेवतात. हा प्रवास काही वेळा प्रचंड महासागरावरून अगर खंडप्राय भूमीवरून होत असतो. त्यांच्यावर ही सक्ती का केली जाते ? इतक्या लांब प्रवासाचा धोका ते का स्वीकारतात ? त्यांना आपला मार्ग कसा सापडतो ? ह्या मूलभूत प्रश्नांची समाधानकारक उत्तरे अजून मिळालेली नाहीत. पक्ष्यांच्या पायांना कडी बांधून व इतर काही प्रयोगांमुळे ह्या संबंधीच्या **सत्य गोष्टी** पूर्वापेक्षा आता जास्त समजल्या आहेत.

दोन टोकांच्या स्थळांमधील उलटसुलट प्रवासाचा नियमितपणा पक्षीस्थलांतराचा एक खास गुण आहे. त्यांच्या हालचालीचा अंदाज एका आठवड्याच्या किंवा काही दिवसांच्या मर्यादेत सांगता येतो. हजारो मैल अंतरावर असणाऱ्या त्यांच्या स्थळांवर — पुष्कळ वेळा तीच बाग अगर तेच शेत — हे पक्षी हिवाळ्यात आणि उन्हाळ्यात परत येतात.

काही पक्षीच का स्थलांतर करतात ? हा पहिला प्रश्न मनात येतो. ह्याचे साधे उत्तर असे की काही जातींनाच स्थलांतराचे अस्तित्वमूल्य (survival value) जाणवते. काही पक्ष्यांच्या बाबतीत हे मूल्य काठापुरतेच स्थलांतर करणाऱ्या क्षुल्लक (marginal) मर्यादेत असते. कारण ह्या जातीमधील काही पक्षी स्थलांतर करतात तर काही आपली जागा सोडत नाहीत. अशा प्रकारच्या अशाश्वत पक्ष्यांचे उदाहरण म्हणजे करंडक (Coot) व दर्वीमुख (Spoonbill) पक्षी. ह्या पक्ष्यांपैकी काहीजण स्थलांतर करतात व उरलेले आपल्याच प्रदेशात राहतात आणि त्यामुळे त्यांचे फारसे नुकसान होताना दिसत नाही.

उत्तर गोलार्धात शरद ऋतूमधील स्थलांतर उत्तरेकडून दक्षिणेकडे व उंच भागातून सखल भागाकडे होते. दक्षिण गोलार्धात अर्थातच ह्या दिशा विरुद्ध असतात. दक्षिणेतील हिवाळ्यापासून सुटण्यासाठी ते उत्तरेकडे जातात. हा प्रकार आपण समजू शकतो. कारण कडक थंडीचा मोसम टाळण्यासाठी ते थंडी सुरू होण्यापूर्वीच ऊबदार प्रदेशाकडे जातात व त्यांच्या मूळच्या वसतिस्थानातील हवा ऊबदार होऊ लागली की ते आपल्या घराकडे परतात. आपल्या घराच्या प्रदेशात जेव्हा झाडांना पाने-फुले येतात आणि जेव्हा अळ्याकीटकांचे प्रमाण भरपूर होते तेव्हा हे पक्षी परत येतात. उन्हाळ्याच्या शेवटी पिलांची वाढ पूर्ण होऊन ती स्वतंत्र झालेली असतात अशा वेळी ते दक्षिण प्रवासाची वाट धरतात. काही पक्षी स्थलांतरित प्रदेशात शक्य

तितका कमी वेळ राहतात. उदा., भोरडा (Rosy Pastor) हा पक्षी मध्य आशियात अंडी घालण्यासाठी भारतातून मे महिन्यात जातो व ऑगस्टच्या सुमारास परत येतो. बहुतांश पक्ष्यांना मात्र ह्यापेक्षा अधिक काल लागतो कारण ते मार्चमध्ये येथून जातात व सप्टेंबरमध्ये परत येतात.

इतक्या विलक्षण कष्टाचा स्थलांतरप्रवास पक्ष्यांना मौल्यवान आणि जरुरीचा असतो. पण पूर्व-पश्चिम स्थलांतर करणारे पक्षी म्हणजे एक कोडेच आहे. कारण हा प्रवास त्याच अक्षांशावर व सारख्याच हवामानाच्या प्रदेशात होत असतो. काही पक्षी अगदी थोड्या मैलांचा प्रवास करून जवळजवळ स्थानिकच स्थलांतर करतात. हे छोटे स्थलांतर कितपत फायद्याचे आहे, का ते जरूरच आहे, हे मात्र समजत नाही. उदाहरणार्थ, मुंबईमधले वेडा राघू (Bee-eater) आणि कांचन (Oriole) हे पक्षी दक्षिण पठाराच्या अंतर्भागात काही मैल जातात. पावसाळ्याच्या सुमारास हे पक्षी मुंबईतून बाहेर जातात व नियमितपणे सप्टेंबरच्या सुरवातीला परत येतात. ही स्थानिक स्थलांतरे बऱ्याच प्रमाणात होतात. ह्यापेक्षा आम्हाला त्यांच्यासंबंधी अधिक माहिती नाही. कारण ह्या अशा बहुसंख्य पक्ष्यांना जेव्हा कडी घालून त्यांच्या हालचालींचा निश्चित मागोवा घेता येईल तेव्हाच ह्या स्थलांतरांचे खरे मूल्य समजून येईल.

बहुतांश पक्ष्यांमध्ये स्थलांतर म्हणजे अंडी घालण्याचे जागेपर्यंत जाऊन व तेथे राहून सरळ परत येणे (काही वेळा वेगळ्या मार्गाने) इतका साधा प्रकार असतो. परंतु हा प्रकार सुद्धा काही पक्ष्यांच्या बाबतीत वाटतो इतका एकमार्गी नसतो आणि म्हणूनच त्याच्या मागोव्यात क्लिष्टता येते. काही पक्षी नव्या पिढीची निर्मिती करण्यासाठी ठराविक ठिकाणी जातात. पिले मोठी होऊन स्वतंत्र झाली की खरे म्हणजे ह्या पक्ष्यांनी आपल्या मूळच्या निवासस्थानाकडे परत यावयाचे, परंतु हे पक्षी जणू काही सुटी घेण्यासाठी घराकडे यावयाचे ऐवजी दुसरीकडेच जातात. शिवाय हिवाळी निवासस्थानाकडे परत येण्याचे मार्गावर ते आपल्या पुनरुत्पत्ति-स्थानाच्या ठिकाणी थोडा वेळ थांबून मग परत येतात. म्हणजे पक्षीस्थलांतर नाना प्रकारच्या हालचालींनी अगम्य करण्यात आले आहे. त्याचा हेतू अर्थातच स्वच्छ आहे. अंडी घालण्यासाठी ऋतुमानाप्रमाणे नियमितपणे जाऊन येण्याचा प्रवास करणे.

प्रत्यक्ष स्थलांतराचे प्रस्थान ठेवण्यापूर्वी किती तरी आधी हे स्थलांतरे (migrants) तयारी करावयास लागतात. प्रवासात जी अधिक शक्ती लागते त्यासाठी लागणारे इंधन चरबीच्या स्वरूपात साठविण्यासाठी हे पक्षी विलक्षण खादाड होतात. काही जण तर समूह करून वेगवेगळ्या रचनांमध्ये उडण्याच्या सरावाला सुरवात करतात. सूर्याच्या उगवण्याच्या आणि अस्ताला जाण्याच्या वेळांवरून स्थलांतराचा नक्की दिवस ठरविला जातो असे प्रयोगाअंती आढळून आले आहे. सूर्य हाच त्यांचा प्रवासामधील मार्गदर्शक असतो; कारण सूर्याच्या निरनिराळ्या कोनावरच ते आपल्या प्रवासाचा मार्ग शोधत जातात. धुक्यामुळे किंवा धूसर वातावरणामुळे जर सूर्य झाकला गेला तर बरेच वेळा त्यांचा मार्ग चुकतो, परंतु एकदा का वातावरण स्वच्छ झाले व सूर्य दिसू लागला की ते लगेच योग्य मार्गावर येतात. मार्गावरील काही विशिष्ट खुणांचा त्यांना उपयोग होत असला तरी दिवसा सूर्य व रात्री तारे हेच त्यांचे खरे मार्गदर्शक आहेत. 600 ते 1300 मीटर्स ऊंचीवरून प्रवास करणाऱ्या त्या पक्ष्यांना

खालच्या जमिनीवरील स्थलनिर्देश,(landmark) खुणा दिसत नाहीत. ह्या स्थलनिर्देशांना पक्ष्यांच्या प्रवासात फारसे महत्त्व नाही हे आश्चर्यकारक रीतीने नव्या पिढीमधील पक्षी दाखवितात. कारण हे नवजात पक्षी आपल्या जनकांच्याही आधी स्वतंत्रपणे योग्य मार्गाने स्थलांतर करतात. सूर्यामुळे त्यांना योग्य मार्ग कसा सापडतो ह्याचे विश्लेषण आज तरी देता येत नसल्यामुळे हे कार्य पक्षी केवळ स्वतःच्या अंतःप्रवृत्तीच्या (instinct) जोरावरच करतात हे आपल्याला नाइलाजाने मान्य करावेच लागते.

बहुतांश पक्षी थव्याने एकत्र प्रवास करतात पण त्याचबरोबर एकट्याने प्रवास करणाऱ्या पक्ष्यांच्याही थोड्याफार जाती आहेत. पुष्कळसे लहान पक्षी इतर वेळी दिवाचर (diurnal) असूनदेखील स्थलांतराचा प्रवास रात्रीचा करतात. बहुधा शत्रूपासूनच्या बचावाचा उद्देश त्यात असावा छोट्या पक्ष्यांचा उडण्याचा वेग तासाला 30 कि.मी. च्या आसपास असतो, व साधारणपणे त्यांचा कामाचा (उडण्याचा) वेळ जर आठ तासाचा धरला तर दिवसाला हे पक्षी 250 कि.मी. अंतर काटतात. मोठे पक्षी तासाला 80 कि.मी. वेगाने उडू शकत असल्यामुळे ते एका दिवसात साहजिकच लहान पक्ष्यापेक्षा अधिक अंतर पार करतात. सागरावरून प्रवास करणाऱ्या पक्ष्यांना जास्त अंतर व दीर्घकाल प्रवासाची सक्ती असल्यामुळे काही थवे 36 तास न थांबता प्रवास करतात. जमिनीवर उतरण्याचे वेळी पुष्कळदा वाईट हवा व जोराचे वारे ह्या संकटांना तोंड द्यावे लागते. अशा वेळी अनेक पक्षी मृत्युमुखी पडतात. एकूण काय, स्थलांतराचा प्रवास हा कष्टदायक व दुर्घट असतो आणि तो धोक्याचाही असू शकतो.

स्थलांतरप्रवासाचा व्याप किती आहे ह्याची कल्पना करणे कठीण आहे. असे सांगतात की युरोप आणि उत्तर आशियामधील पक्ष्यांपैकी चाळीस टक्के जातीचे पक्षी स्थलांतर करतात, म्हणजे निम्म्याहून कमी. ब्रिटनमधील गाणाऱ्या पक्ष्यांच्या 68 जातींपैकी 22 जाती स्थलांतर करतात आणि भारतात सापडणाऱ्या 1200 जातींपैकी जवळ जवळ 300 जाती हिवाळ्यात येथे स्थलांतर करून येतात. दुसऱ्या शब्दांत, ह्या स्थलांतराचा व्याप आश्चर्यकारक आहे ह्यात शंका नाही. आर्क्टिक टर्न (सुरय) हा पक्षी उत्तर ध्रुवापासून दक्षिण ध्रुवापर्यंत प्रवास करतो आणि पुन्हा उत्तर ध्रुवाकडे परततो. म्हणजे त्याचा एकूण प्रवास 35,000 कि.मी. लांबीचा होतो. हजारो किलोमीटरचा प्रवास पक्ष्यांमध्ये विशेष आहे असे नाही. युरोपमध्ये वीण घालणारे पक्षी हिवाळ्यात दक्षिण आफ्रिकेत जातात; पुष्कळसे युरोपीय पक्षी भूमध्यसमुद्राच्या आसपासच्या देशात जाऊन राहतात हेही खरे आहे.

आपल्याकडे येणारे बहुतांश पक्षी बहुधा हिवाळ्यासाठी येतात, ते अंडी घालण्यासाठी येत नाहीत. पूर्व युरोपातील, उत्तर आणि मध्य आशियातील, आणि हिमालयातील पक्ष्यांच्या अनेक जाती दक्षिण पठारावर केवळ हिवाळ्यात येतात. बदके आणि जलपक्षी हेच बहुसंख्येने समुद्रकिनारी किंवा नदी, कालवे, तळी ह्यांच्या काठावर स्थलांतर करून येतात. हेच आपल्या देशाचे स्थलांतरे पक्षी (migrants).

ह्यापेक्षा आम्हांला भारतामधील स्थलांतर करणाऱ्या पक्ष्यांविषयी फारसे ज्ञान नाही. त्यांची अचूक वसतिस्थाने, कोणत्या पक्षीसमूहातून ते येतात, येण्याजाण्याचे त्यांचे निश्चित मार्ग, आणि

इतर मोसमी हालचाली ह्यासंबंधीची माहिती कमी आहे. पक्ष्यांच्या स्थलांतरासंबंधीची अचूक माहिती मिळविण्याच्या दृष्टीने ह्या शतकाच्या सुरुवातीपासून एक पद्धत सर्वत्र उपयोगात आणली जाते. ह्या पद्धतीप्रमाणे पक्ष्यांना जाळ्यात पकडून त्यांच्या पायाला ॲल्युमिनियमची कडी बांधून, त्यांची नोंद करून मग ते मोकळे सोडले जातात. कड्यांचे आकार विविध पण योग्य असतात. कड्यांवर क्रमांकाचा शिक्का व ज्याने कडे बांधले त्याचे नाव व पत्ता उमटविलेला असतो. असा पक्षी ज्याला सापडेल त्याने कड्यावरील पत्त्यावर तो पक्षी कोठे, केव्हा आणि कसा सापडला हे कळवावयाचे असते. बॉम्बे नॅचरल हिस्टरी सोसायटीने गेली पाच वर्षे भारतामधील स्थलांतरित पक्ष्यांच्या बाबतीत कडी घालण्याची एक योजना अमलात आणली आहे. त्यामुळे पुष्कळच अज्ञात माहिती हाती मिळाली आहे. आपल्याकडील काही जंगली बदके 4800 कि.मी. अंतरावरील सैबेरियात सापडली आहेत. आणखी इतर पक्ष्यांबद्दलची अशीच माहिती गोळा होत आहे. ह्या पक्ष्यांना बांधलेल्या कड्यांवर क्रमांक व "इन्फॉर्म बॉम्बे. नॅच. हिस्ट. सोसायटी" असा संदेश छापला आहे. वाचकांनी ही माहिती प्रसृत करावी अशी विनंती आहे. त्यामुळे एखाद्या मृत पक्ष्याच्या पायावरील कडे पाहून ते त्याची माहिती फुकट जाऊ न देता आम्हांला कळवतील. परदेशांतील कडी धारण करणारे अनेक पक्षी भारतात सापडले आहेत. अशा प्रकारची कोणतीही कडी — भारतीय अगर परदेशीय — सापडल्यास ती सोसायटीकडे पाठवावीत. ते शक्य नसल्यास निदान कड्यांवरील क्रमांक, तारीख, स्थान व पक्ष्याची परिस्थिती जरूर कळवावी. अशा प्रकारच्या सहकार्यानेच भारतामधील पक्ष्यांच्या हालचालीचे योग्य ज्ञान एकत्र करता येईल.

# पक्ष्यांचे वर्णन

**वंजुल गण** (Order PODICIPEDIFORMES) : ग्रीबा. ह्या गणातील पक्षी छोट्या पंखाचे जलपक्षी असून त्यांचे पाय खूपच मागच्या बाजूस असतात. पायाच्या बोटांजवळ कातडीची झालर असल्यामुळे बोटे पानाच्या मुख्य शिरेसारखी दिसतात.

**पाणडुबी (little Grebe or Dabchick)** *(Podiceps ruficollis)* –चित्रपत्र–3.13–हा पक्षी वंजुल गणाचा आपल्याकडील खरा प्रतिनिधी आहे. हिंदीमध्ये ह्या पक्ष्याला *पानडुबी, डुबडुबी* व *लाओन्री* असे म्हणतात. भुऱ्या रंगाचा हा पोहणारा पक्षी असून त्याचा पोटाचा भाग रेशमासारखा असतो. लहान टोकदार चोच असलेला आणि शेपटी नसलेला हा पक्षी आहे. विणीच्या हंगामात डोके आणि मान गर्द तपकिरी व तांबूस पिंगट रंगाची दिसते व मोठी झालेली पिवळी चोच स्पष्ट दिसते. जवळजवळ प्रत्येक तळ्यात, गावातील पाणवठ्यावर हा पक्षी एखाद्या छोट्या बदकासारखा पोहताना दिसतो व जराशा इतर हालचालीचा जरी त्याला संशय आला तरी तो चटकन डुबी घेतो. छोट्या तळ्यात किंवा डबक्यात राहणारे पक्षी जोडीने किंवा तिघेजण एकत्र असतात तर मोठ्या जलाशयात ते काही वेळा पन्नास किंवा त्याहून अधिक संख्येचा कळप (थवा) करून राहतात. पाण्यात सूर मारण्यात ते विलक्षण पटाईत आहेत. ज्या सराईतपणे ते सूर मारतात ती पद्धत वाखाणण्याजोगी आहे कारण डुबी घेतल्याच्या जागी पाण्याची सूक्ष्म लहरसुद्धा दिसत नाही. बंदुकीने जर ह्या पक्ष्याला गोळी मारली तर ती गोळी त्याला लागण्यापूर्वीच तो पाण्याखाली गेलेला असतो. पाणी सोडण्यास ते सहसा खूष नसतात, पण वेळ आली तर ते थोडा वेळ उडतात आणि काही अंतर जाऊन पुन्हा पाण्यावर उतरतात. त्यांचे पंख जरी आकाराने लहान असले तरी ते उत्तम उडू शकतात. एका तळ्यातून दुसऱ्या तळ्यात जाताना ते नेहमीच उडून जातात. मग ती दोन्ही तळी एकमेकांपासून लांब अंतरावर असली तरी हरकत नाही. संध्याकाळी जेव्हा ते एकमेकांशी क्रीडा करून करमणूक करीत असतात त्यावेळी त्यांचा कर्कश गालातल्या गालात काढलेला स्वरबद्ध आवाज ऐकू येतो. छोट्या पंखांच्या हालचालीने अर्धवट उडणे, अर्धवट पळणे असे प्रकार करून ते एकमेकांचा पाठलाग करीत असतात. त्यांचे अन्न म्हणजे जलकीटक, अळ्या, बेडकांची छोटी पिले, गोगलगाई, आणि छोटे छोटे मासे होत. पाण्यावर तरंगणाऱ्या वनस्पतींमधून अगर पाण्याखाली जाऊन ते हे प्राणी पकडतात. डॅबचिकचे घरटे निरुपयोगी पाणवनस्पतींच्या भिजलेल्या खोडांचे केलेले जाड अस्तर. हे घरटे पाण्यावर तरंगणाऱ्या

वनस्पतींवर घातले जाते. वेळेला हे पक्षी 3 ते 5 शुभ्र अंडी घालतात. सभोवतालच्या दमट वनस्पतींमुळे पुढे ती खराब दिसू लागतात,कारण अंड्यांचे संरक्षण करण्यासाठी हा पक्षी नेहमी घरट्यापासून दूर जाताना अंडी वनस्पतींनी झाकून ठेवतो. पिलांच्या अंगावर पट्टे दिसतात आणि बहुधा आपल्या आईबापांच्या पाठीवर बसून हिंडताना ती दिसतात.

**पाशगल गण** (Order PELECANIFORMES). ह्या वर्गामधील आपल्याकडील पक्षी म्हणजे **पाशगल** कुलातील (Family PELECANIDAE) पेलिकन आणि तिरंदाज (डार्टर) पक्षी आणि **फॅलॅक्रोकोरॅसिडी** कुलातील (Family PHALACROCORACIDAE) करढोक किंवा पाणकावळा हे पक्षी होत.

पेलिकन हे पक्षी आकाराने मोठे व बोजड दिसतात. त्यांचे पाय जाड व बुटके असतात. पायाची बोटे पडद्यांनी जोडलेली असतात,आणि भल्या-मोठ्या लांब चपट्या चोचीला खाली एक मोठी लवचिक पिशवी जोडलेली असते.ह्या पिशवीत त्यांचे मुख्य अन्न – मासे – पकडून साठवून ठेवले जाते. दिसावयास जरी हे पक्षी बोजड असले तरी त्यांची हाडे पोकळ असतात व ते लांब अंतरापर्यंत उत्तम उडू शकतात. त्यांचे इतर भाईबंद व गिधाडे आणि बगळे ह्यांच्याबरोबर हवेतील प्रवाहांवर आरूढ होऊन पंख व हलविता शांतपणे उंच आकाशात विहार करताना हे नेहमी आढळतात.

**ठिपक्याच्या चोचीचा** किंवा **राखी करडा पेलिकन (Spotted-billed or Grey Pelican)** *(Pelecanus philippensis)* हा भारतात सापडणाऱ्या तीन जातींपैकी स्थायिक (resident) जातीचा पक्षी आहे. – चित्रपत्र 1.2 – हिंदी : *हॉवासिल* किंवा *कुरीर*. दुसऱ्या दोन जातीचे पक्षी हिवाळ्यात येणारे पाहुणे आहेत. ह्या जातीच्या पक्ष्यांच्या चोचीच्या वरच्या भागावर काळपट निळ्या रंगांचे मोठे ठिपके असतात तर त्यांच्या चोचीखालची पिशवी जांभळट किंवा अंजिरी रंगाची असते. प्रौढ पक्षी राखट पांढऱ्या रंगाचे असतात तर बाल पक्षी तपकिरी असतात. उडताना दिसणारी पंखांवरची काळपट पिसे आणि राखट तपकिरी रंगाची शेपटी यांवरून त्यांना सहज ओळखता येते. हे पक्षी छोट्या समूहांमध्ये किंवा मोठ्या थव्यांमध्ये नदीवर किंवा तलावाच्या पाण्यावर पोहताना,मासे पकडताना, आरामशीर तरंगताना किंवा अन्नाची वाट पाहात असताना,पिसांची निगा राखताना आढळतात. ते अतिशय खादाड आहेत आणि खूप मासे गट्ट करीत असतात. कावळ्यांप्रमाणेच ते सहकारी तत्त्वावर आपली शिकार करतात, पण सावजाच्या मागे ते सूर मारून लागतीलच असे नाही. अनेक पक्षी अर्धवर्तुळाकार रचना करून पंखांच्या फडफडाटाने पाणी उडवीत माशांच्या कळपाला उथळ जागी एकत्र करतात व मग आपल्या चोची उघडून त्या खालच्या पिशवीत ते दुर्दैवी मासे समूहाने गोळा करतात. पाण्यावरून उडून जाताना त्यांना फारसे श्रम करावे लागत नाहीत. उडताना ते आपली मान खाली खेचतात त्यामुळे मानेचा आकार चपटक्या S (एस)

अक्षरासारखा दिसतो. पंखांच्या संथ हालचालीने शिटीसारखा आवाज होतो व छाती पसरट असल्यामुळे ते एखाद्या उडणाऱ्या नौकेसारखे दिसतात. राखी पेलिकन पक्षी आपली वीण आंध्र राज्यातील पूर्व गोदावरी जिल्ह्यात घालतात. ह्यांतले काही थोडे पक्षी दक्षिणेत जातात. ह्या पक्ष्यांचे कळप विस्तीर्ण प्रदेशातील उंच झाडांवर किंवा माडांवर घरटी बांधतात. एकाच झाडावर पुष्कळ वेळा अनेक घरटी एकमेकांना चिकटून असतात. त्यांचे घरटे म्हणजे काटक्यांनी ओबडधोबड बांधलेले माचण असते. एका वेळी हे पक्षी तीन खडूसारख्या पांढऱ्या रंगाची अंडी घालतात. उबविण्यामुळे पुढे त्यांचा रंग मातकट होतो.

**जलकाक (फॅलॅक्रोकोरॅसिडी)** कुलात तिरंदाज (Darter) किंवा सर्पपक्षी (Snakebird) व पाणकावळे ह्या पक्ष्यांचा समावेश होतो. **तिरंदाज (Darter)** *(Anhinga rufa)* – चित्रपत्र 2.7– हिंदी : *बॅम्बे* – हा काळा जलपक्षी आहे. त्याची मान सापासारखी, मखमली तपकिरी आहे. अरुंद शीर्ष आणि टोकदार खंजिरी चोच, पाठीवरील रुपेरी राखी रंगाच्या रेघा व लांब, कडक आणि गोलाकार शेपटी ह्या गुणांमुळे हा पक्षी सहज ओळखता येतो. पाण्याचे कालवे, नद्या, तळी ह्यांच्या आसपास हे पक्षी एकट्याने किंवा छोट्या विखुरलेल्या थव्यांनी आढळतात, काही वेळा खाडीवर पण दिसतात. पाण्याच्या पृष्ठभागावर पोहताना ह्या पक्ष्यांचे अर्धे किंवा काही वेळा जवळ जवळ संबंध शरीर पाण्याखाली असते. त्यामुळे त्यांचे सापासारखे डोके आणि मान फक्त नागमोडी इकडे तिकडे वळताना दिसते. मुख्य अन्न मासे. हा पक्षी सूर मारण्यात पटाईत आहे. सूर मारून पाण्याखाली माशांचा पाठलाग करताना त्याचे पंख अर्धवट पसरलेले असतात व मानेची हालचाल एखाद्या भालाफेक करणाऱ्या खेळाडूप्रमाणे मागे पुढे होताना दिसते. मानेच्या मणक्यांच्या खास रचनेमुळे एखाद्या स्प्रिंगसारखी मान ताणकन पुढे टाकता येते त्यामुळे खंजिरासारख्या खालच्या चोचीने माशांना अचूक पकडता येते. मासा पकडल्यावर तिरंदाज आपली सापासारखी मान पाण्याबाहेर काढतो आणि चोचीतला मासा एकदम हवेत उडवून परत माशाच्या तोंडाकडून त्याला चोचीत पकडून गट्ट करतो. त्याचे डोके आणि घसा एवढा बारीक असून देखील काही वेळा तो मोठ्या आकाराचे मासे कसा पकडतो आणि गिळतो हे एक आश्चर्यच आहे. भूक तृप्त झाल्यावर हा पक्षी एखाद्या झाडाच्या शेंड्यावर बसतो किंवा पंख आणि शेपूट पिसारून ते वाळवीत खुंटासारखा बसतो. त्याचे आयुष्य जरी बरेचसे पाण्यातच जात असले तरी त्याची पिसे बदकांच्या पिसांएवढी जलविरोधी (waterproof) नाहीत. त्याची पिसे पाण्यात भिजून ओलसर व मळकट होतात आणि ती पिसे चांगली राहावी म्हणून त्याला ती वारंवार कोरडी करावी लागतात. हे पक्षी 'छी-गी, छी-गी' ह्यासारखा कर्कश दोन शब्दांचा आवाज काढतात. त्यांची उडण्याची पद्धत व एकूण स्वभाव नेहमी बरोबरीने असणाऱ्या पाणकावळ्यासारखेच आहेत. बगळे, करकोचे आणि त्यांच्यासारख्या इतर पक्ष्यांबरोबरीने मिसळून तिरंदाज पक्षी अंडी घालतात. पाण्यात किंवा काठावर असलेल्या झाडांवर अव्यवस्थित रचलेल्या

काटक्यांनी हे पक्षी घरटी बांधतात. वेळेला –3 किंवा 4– अंडी घालतात. अंडी अरुंद व लांबट असून फिक्कया हिरवट निळया रंगावर खडूसारखे पांढरे आवरण असलेला रंग असतो.

**पाणकावळा** किंवा **करढोक (Little Cormorant)** *(Phalacrocorax niger)* – चित्रपत्र 2.8 – हिंदी : *पान कव्वा* किंवा *छोटा गॅनहिल*. डोमकावळ्यापेक्षा (Jungle Crow) हा पक्षी थोडा मोठा असतो. बदकाप्रमाणेच असणाऱ्या ह्या जलपक्ष्यांची पाठ काळी चकाकित पण भोंगळ असते. शेपूट लांबटसर व कडक असून त्याची चोच बारीक व चपटी असते. चोचीचे टोक वळून आकडी किंवा हुकासारखे असते. गळ्यावर एक पांढरा डाग असतो, आणि पाठीवर तुऱ्यासारखा भाग असल्याची पुसट जाणीव होते.

ह्या पक्ष्यांची वसतिस्थाने म्हणजे पाणवठे, तलाव, जलाशय हे असून क्वचित्-प्रसंगी खाऱ्या पाण्याची सरोवरे व खाडी ही होत. साधारणपणे हे पक्षी एकटे असतात, किंवा लहान समूहात किंवा मोठ्या सुबद्ध कळपातही राहतात. हे पक्षी पाण्यावर ओळंबलेल्या झाडांच्या फांद्यांवर, खडकांवर किंवा कोळी लोकांच्या जाळ्यांच्या खुंटांवर पंख पसरून उन्हे अंगावर घेत बसलेले आढळतात. मुख्य अन्न म्हणजे मासे. ते उत्कृष्ट पोहणारे व सूर मारणारे असून आपले भक्ष्य बहुधा पाण्याखाली जाऊन पकडतात. काही वेळा ते सामूहिक शिकार करतात. माशांच्या थव्याला वेढून त्यांचा पाठलाग करतात, वारंवार डुब्या मारतात आणि त्यावेळी एकमेकाला धक्के मारणे, अंगावरून उड्या मारणे इत्यादी प्रकार मोठ्या उत्साहाने चालू असतात. माशाला चोचीत आडवा पकडून ते पाण्याबाहेर येतात व त्याला हवेत उडवून त्याच्या तोंडाच्या बाजूने गिळून टाकतात. लगेच ते दुसरा मासा पकडण्यासाठी पुन्हा सूर मारतात, आणि हा प्रकार सारखाच चालू राहतो. चांगल्या मोठ्या आकाराचे मासेही पकडून खाण्यात ते पटाईत आहेत; आणि त्यांची भूक कधी शमतच नाही असे वाटते.

काळ्या पाणकावळ्यांच्या आणखी दोन जाती नेहमी दिसून येतात. ते म्हणजे **मोठा पाणकावळा (Large Cormorant)** *(P. carbo)* आणि **तुरेबाज पाणकावळा (Indian Shag)** *(P. Fuscicollis)*. मोठा पाणकावळा नेहमीच्या बदकाएवढाच मोठा असतो. पांढरट राखाडी रंगाची पाठ व मान (विशेषत: विणीच्या हंगामात), आणि मांडीवर मोठा लांब गोल पांढरा भाग (विशेषत: उडताना दिसतो) ह्या त्याच्या विशिष्ट खुणा. तुरेबाज पाणकावळा मध्यम आकाराचा असतो परंतु पुष्कळ वेळा त्याचा मोठ्या पाणकावळ्याबरोबर घोटाळा होतो. फक्त विणीच्या हंगामात मात्र तो मोठ्या पाणकावळ्यापेक्षा वेगळा ओळखता येतो; कारण त्या दिवसांत डोळ्यांच्या मागच्या बाजूला पांढऱ्या पिसांचे झुपके असतात आणि डोक्यावर व मानेवर पांढरे ठिपके असतात. पाण्यात किंवा पाण्याजवळ असलेल्या झाडांवर सर्व प्रकारचे पाणकावळे, बगळे आणि करकोचे ह्यांच्या बरोबरीने, छोट्या फांद्यांची उथळ घरटी बांधतात. एका वेळेला – 4 किंवा 5– अंडी घालतात. त्यांचा रंग फिकट निळसर हिरवा असून पृष्ठभाग खडूसारखा असतो. अंड्यांच्या आकारावरून त्यांची अंडी इतर पक्ष्यांच्या अंड्यांपासून वेगळी ओळखता येतात.

**बक गण** (Order CICONIIFORMES) ह्या गणातील भारतामधील पक्षीकुले म्हणजे **आरडिडी** (Family ARDEIDAE) (क्वाक, बगळा वगैरे), **सिकोनिडी** (CICONIIDAE) (करकोचा), **थ्रेस्किऑरनिथिडी** (THRESKIORNITHIDAE) अवाक (Ibis) आणि **फीनिकॉप्टेरिडी** (PHOENICOPTERIDAE) रोहित (Flamingo).

क्वाक आणि बगळा (Herons and Egrets) हे लांब पायाचे पक्षी असून पायावर (गुडघ्याखाली) पिसे नसतात व त्यांच्या पायांची बोटे सुटी असतात. लांब, बारीक आणि लवचिक मानेच्या ह्या पक्ष्यांची चोच भाल्यासारखी असते.

**राखी बगळा (Grey Heron)** *(Ardea cinerea)* – चित्रपत्र 2.9 – हिंदी : *नारी, कैबुड, ऐजॅन* – हा करकोच्याप्रमाणे हडकुळया लांब व उघड्या (पिसे नसलेल्या) पायाचा पक्षी पाणथळ जागेत आढळतो. वरून राखी रंगाचा असून डोके व मान पांढऱ्या रंगाची असतात. शरीराची खालची बाजू राखट पांढरी असते. लांबट मान इंग्रजी S आकाराची असून डोके अरुंद असते व जाड निमुळती खंजिरासारखी चोच असते. डोक्यावर लांब काळा तुरा असतो. मानेच्या मध्यावर खालच्या बाजूला काळ्या ठिपक्यांची ओळ असते, छातीवर लांब काळ्या रेघा असलेली पांढरी पिसे असतात; ह्या विशिष्ट खुणांनी तो सहज ओळखता येतो. मादी नरासारखीच असते. फक्त तिच्या डोक्यावरचा तुरा व छातीवरील पिसे उठावदार नसतात. बगळा साधारण एकटाच सापडतो. तो नेहमी गुडघ्याइतक्या पाण्यात निश्चल उभा राहतो आणि त्याचे डोके खांद्यामध्ये बुडलेले असून तो जणू काही गाढ झोपेत आहे असे वाटते, परंतु त्याच्या आसपास माशाची अगर बेडकाची हालचाल झाली तर मात्र तो लगेच हुशारीने हालचाल करतो, भक्ष्य दिसले की तो आपली लांब वाकलेली मान सरळ करून पुढे झुकवितो आणि चोच भक्ष्य पकडण्यासाठी तयार करून निश्चल राहतो. लवकरच तो आपली चोच झपाट्याने फिरवून भक्ष्य पकडतो. भक्ष्याला ढकलून त्याचे तोंड आपल्याकडे करून गिळून टाकतो. उडत जाताना हे पक्षी आपली मान आत खांद्यांत ओढून घेतात (सगळ्याच बगळ्यांचे हे वैशिष्ट्य आहे), पाय मागच्या बाजूला शेपटीखाली खेचून ताठ पसरतात व पंख फडफडावीत उडतात. फक्त उडत असतानाच खोल कर्कश आवाज ऐकू येतो. घरटे माचासारखे असून काटक्यांचे बनविलेले असते. माचाच्या मध्यभागी उथळ खळगा असून त्यात थोडे गवत असते. घरटे पाण्यालगतच्या झाडावर बांधतात. त्यांच्याचबरोबर इतर प्रकारच्या बकांची व बगळ्यांची घरटी मिसळलेली असतात. वेळेला – 3 ते 6 – अंडी घालतात. अंडी गडद निळसर हिरव्या रंगाची असतात.

पाणथळ जागेत राखी बगळ्यासारखाच दिसणारा पण जरा लहान आकाराचा पक्षी म्हणजे **जांभळा बगळा (Purple Heron)** *(A. purpurea)*. त्याचे वरचे अंग निळसर किंवा जांभळट राखाडी रंगाचे असते. मान व डोके तांबूस असते आणि तो खालच्या बाजूने काळा व तांबूस पिंगट असतो.

मोठा बगळा, मध्यम बगळा आणि लहान बगळा ह्या पांढऱ्या बगळ्यांच्या तीन जाती आहेत. हेसुद्धा इतर बगळ्यांच्या बरोबरीने पाणथळ जागेत आढळतात. **मोठा बगळा (Large**

**egret)** *(Egretta alba)* जांभळ्या बगळ्याच्या आकाराचा असतो. संपूर्ण रंग बर्फासारखा पांढरा असतो. हा पक्षी एकटाच आढळतो. **मध्यम बगळा (The median)** *(E. intermedia)* थोडासा लहान असतो तर **लहान बगळा (Small Egret)** *(E. garzetta)* चित्रपत्र 2.10 – हिंदी : *करचिआ बगळा* – कोंबडीच्या आकाराचा असतो, किंवा पुढे वर्णन केलेल्या गायबगळ्याएवढा (Cattle Egret) असतो. विणीच्या हंगामात त्यांच्या अंगावर झालरी (लेस) सारखी पिसे पाठीवर येतात. ह्या शतकाच्या सुरुवातीच्या दिवसांत युरोप आणि अमेरिकेत स्त्रियांचे पोशाख सजविण्यासाठी ह्या पिसांना विलक्षण मागणी होती पिसांचा धंदा त्यावेळी अतिशय तेजीत असल्यामुळे ह्या पक्ष्यांचा भयानक संहार होऊन ते नामशेष होतात की काय अशी भीती वाटत होती. पिसांच्या व्यापारावरील आंतरराष्ट्रीय बंधनामुळे, निरनिराळ्या देशांत ह्या पक्ष्याला वाचविण्यासाठी केलेल्या कायद्यांमुळे आणि 'फॅशन्स' योग्य मार्गाने बदलल्यामुळे हे पक्षी संपूर्ण नाहीसे होण्याचे संकट टळले आहे.

**गायबगळा (Cattle Egret)** *(Bubulcus ibis)* – चित्रपत्र 2.12 – हिंदी : *सुन्हिका बगुला* किंवा *गायबगळा*. हा लहान बगळ्यासारखाच दिसणारा पक्षी त्या बगळ्यापासून विणीच्या हंगामाखेरीज इतर दिवसांत त्याच्या जाड *पिवळ्या* (काळ्या नव्हे) चोचीमुळे ओळखता येतो. विणीच्या हंगामात त्याच्या डोक्यावर, मानेवर आणि पाठीवर नारिंगी-बदामी किंवा सोनेरी पिसे असल्यामुळे त्याला सहज ओळखता येतो. तो इतर बगळ्यांसारखा किंवा छोट्या (लहान) बगळ्यांसारखा पाण्यावर अवलंबून नसतो. चरणाऱ्या गुरांबरोबर एकटा अगर मोठ्या कळपाने हा पक्षी नेहमी सापडतो. जमिनीवरचे किडे हे त्याचे मुख्य अन्न. हे पक्षी गुरांच्या कळपात मौजेने सहल करीत असतात, त्यांच्या पायातून आत-बाहेर उड्या मारीत किंवा त्यांच्या पाठीवर बसून सभोवतालचे निरीक्षण करताना आढळतात. मधूनच ते किडे पकडण्यासाठी उडतात. टोळ, नाकतोडे व तत्सम कीटकांवर ते लक्ष ठेवून असतात. गुरांच्या हालचालीमुळे हे किडे गवतातून बाहेर पडले की गायबगळे आपली मान व चोच पुढे करून त्यांच्यावर झडप घालून त्यांना पकडतात. गुरांच्या पाठीवर बसून त्यांच्या पोटावरील, कानामागील अगर प्रत्यक्ष पाठीवरील रक्त शोषून घेणाऱ्या गोचिड्या व इतर कीटक शोधून काढून पकडतात. झाडांवर कावळे, तळ्यातील बगळे आणि इतर पक्षी ह्यांच्या बरोबरीने गायबगळ्यांची सारंगागारे– (roosts) असतात. सूर्यास्तानंतर हे पक्षी रोज तिरप्या ओळी करून किंवा घोळके करून परत येतात. खांद्यांमध्ये खेचलेली मान मागे टाकून आणि पाय व शेपटी खाली मागे खेचून ते उडत असतात. ते स्वतःचेच कळप करून अंडी घालतात किंवा तलावातील बदकाबरोबरही अंडी घालतात. काही वेळा तिरंदाज, पाणकावळे आणि पांढरे बगळेही त्यांच्याबरोबर असतात. घरटी कावळ्याच्या घरट्यांप्रमाणेच काटक्यांनी कशीबशी बांधलेली असतात. घरट्यासाठी लागणारे झाड पाण्याजवळच असावे लागते असे नाही. गावातल्या झाडांवर हे पक्षी घरटी बांधतात. मादी – 3 ते 5 – अंडी घालते. अंड्यांचा रंग साय काढलेल्या दुधासारखा पांढरट निळा असतो.

**क्वाक** कुलातील (Family HERON) आणखी एक परिचित पक्षी म्हणजे **वंचक (Pond**

**Heron or paddy Bird)** *(Ardeola grayii)* – चित्रपत्र 2.11 – काही भागात हिंदीमध्ये ह्याला अंधा बगुला म्हणतात. कोंबडीच्या आकाराच्या ह्या पक्ष्याचा रंग मातट तपकिरी असून त्यावर बदामी रंगाच्या रेषा असतात. हा रंग पक्षी जेव्हा स्वस्थ बसलेला असतो तेव्हा दिसतो पण तो ज्यावेळी हवेत उडतो त्यावेळी त्याचे खालून तकतकीत पांढरे पंख आणि शेपटी प्रामुख्याने दिसून येते. विणीच्या हंगामात त्याच्या पाठीवर सुबक पिंगट किरमिजी रंगाची केसासारखी पिसे असतात, डोक्यावर लांब पांढऱ्या पिसांचा तुरा उगवतो व त्यामुळे इतर वेळी फिक्कट रंगाचा दिसणारा हा पक्षी त्यावेळी विलक्षण सुंदर दिसतो. वंचक पक्षी पाणथळ जागा, डबकी आणि जेथे बेडूक, मासे, खेकडे हे प्राणी भरपूर प्रमाणात असतात अशा जागी एकटा, दुकटा किंवा तिघे असा आढळतो. गावातल्या गजबजलेल्या भागामधील कच्च्या विहिरी किंवा देवळातील कुंडे येथे पण तो आकर्षित होतो. एखाद्या तळ्यातले पाणी आटून थोडे उरले म्हणजे अशा ठिकाणी या पक्ष्यांचे थवे जमतात. कारण या ठिकाणी त्यांना निर्वासित बेडकांची मेजवानीच मिळते पाण्याच्या काठाशी हा पक्षी डोके खांद्यात ओढून डोळे मिटून शांतपणे निश्चल उभा असतो. खरे म्हणजे तो जागा असतो, पण तो आपल्या लांब मानेच्या भाल्यासारख्या चोचीच्या सपाट्यात अनवधानाने येणाऱ्या बेडकाकडे किंवा माशाकडे लक्ष ठेवून असतो. काही वेळा तो पाण्यातून चोरून चालत जातो. चालताना तो प्रत्येक वेळी पाऊल पाण्याबाहेर संपूर्ण उचलून काळजीपूर्वक परत टेकतो. अशा वेळी मान पुढे करून चोच भक्ष्य पकडण्यासाठी सदैव तयार असते. काही वेळा घाटावरील धोब्यांचा किंवा पाणी भरावयास आलेल्या स्त्रियांचा जो कलकलाट चालू असतो त्या वातावरणातही तो कोणाशीही संबंध नसल्यासारखा शांतपणे उभा असतो. धोक्याचा क्षुल्लक इशारा मिळाला तरी तो क्षणात कर्कश आवाज करीत पांढऱ्या स्वच्छ पंखावर आरूढ होऊन बगळ्यांच्या नमुनेदार पद्धतीने पंखांचे संथ झटके मारीत निघून जातो. त्यांच्या आवडत्या वृक्षांच्या निवासस्थानात ह्या पक्ष्यांचे घोळकेच्या घोळके सूर्यास्तानंतर परत येतात. मोठाल्या झाडांवर, मग ती शहरात असोत अगर नसोत, किंवा पाण्याजवळच हवीत असेही नाही. हे पक्षी कावळ्यांसारखीच काटक्यांची घरटी बांधतात. पांढरे बगळे, रात्रीचे बगळे (Night Herons) इत्यादी पक्ष्यांसमवेत ह्यांची घरटी असतात. ते एकाच झाडावर वर्षानुवर्षे घरटी बांधतात. वेळेला –3 ते – 5 घातलेली अंडी फिक्कट हिरवट निळ्या रंगाची असतात.

**करकोचा** (Stork) (Family CICONIDAE) हे पक्षी वरवर दिसावयास बगळ्यासारखेच भासतात. त्यांचे पाय लांब असतात व पायाचा बराचसा भाग उघडा पिसांविरहित असतो. पायाप्रमाणेच लांब मान व टोकदार बोजड चोच ही त्यांची लक्षणे. बगळ्यांमधून ह्या पक्ष्यांना उडताना सहज ओळखता येते. कारण त्यांची मान लांब व ताणलेली असते, तर बगळे आपल्या माना खांद्यांत खेचून घेऊन सपाट S च्या आकाराच्या करतात. करकोच्यांना स्वरतंतू नसल्यामुळे ते आवाज काढीत नाहीत, परंतु विणीच्या हंगामात नर व

मादी कधी कधी प्रणयक्रीडा करतेवेळी घशातून गुरगुर आवाज काढतात व चोचीच्या उघडझापीने कट्‌कट्‌ असा ध्वनी काढतात.

भारतात सर्वत्र व प्रामुख्याने सापडणारी जात म्हणजे **रंगीत करकोचा (Painted Stork)** *(Ibis leucocephalus)*– चित्रपत्र 1.4 – हिंदी : जांघील, डोख, कंकरी. गिधाडाएवढ्या आकाराच्या ह्या पक्ष्याची उंची (3.11 फूट) जवळ जवळ 1 मीटर असते. साऱ्या शरीरावर पांढरी पिसे असतात पण बाजूच्या पिसांवर हिरवट काळ्या रंगाच्या चकाकणाऱ्या खुणा असतात. छातीवर एक आडवा काळा पट्टा असतो. शेपटीजवळच्या गुलाबी किंवा गुलबस रंगाच्या मोहक पिसांमुळे त्याला रंगीत करकोचा हे नाव पडले आहे. फिकट पिवळ्या चेहऱ्यावर पिसे नसतात. टोकाला थोडीशी बाक आलेली चोच स्पष्ट पिवळ्या रंगाची असते. पाणथळ जागा किंवा जलाशय यांच्या आसपास छोट्या किंवा मोठ्या समूहात हे पक्षी आढळतात. त्यांचे मुख्य अन्न म्हणजे मासे व बेडूक; पण पाण्यातले किडे, खेकडे, गोगलगाई इत्यादी प्राणीसुद्धा ते पकडतात. इतर जातीच्या करकोच्यांसमवेत हे पक्षी चिखलात अगर उथळ पाण्यात दिवसभर ध्यान लावून उभे असतात. कधीकधी गंभीरपणे इकडेतिकडे रमत गमत फिरताना दिसतात. अन्नशोधन करताना ते पाण्यातून हळू हळू चालतात. मान सरळ करून, चोच उघडून व अर्धवट बुडवून अन्नाचा शोध करतात. चोच उघडून कोयंड्यासारखी आडवी ठेवून एका पायाच्या मागेपुढे हालचालीने ते माशांना चोचीकडे ढकलतात. काही वेळा ज्या बाजूचा पाय उचललेला असतो त्या बाजूचा पंख एकदम पसरून त्याची छाया पाडतात व त्यामुळे भक्ष्यांच्या हालचालीचा वेग वाढतो. पाण्यात अगर काठावर असलेल्या झाडांवर त्यांचे निवासस्थान असते. उडताना पंखांचे एकसारखे झटके मारून नंतर नुसतेच तरंगत राहणे ही त्यांची सवय आहे. मध्यान्हीच्या वेळी खूप उंचीवर जाऊन घिरट्या घालीत राहण्याची त्यांची सवय प्रसिद्धच आहे. काटक्यांचे माचासारखे बनविलेल्या घरट्याला मध्यभागी एक उथळ खळगा असतो. त्यात पाणवनस्पतींची पाने व फांद्या लावून ठेवतात. एकाच झाडावर दहाबारा घरटी असू शकतात. पाणकावळे, बगळे इत्यादी प्राण्यांच्या बरोबरीनेच ह्यांची घरटी असतात. अंडी वेळेला – 3 ते 5 – मळकट पांढऱ्या रंगाची, व यांवर कधीकधी ठिपके किंवा रेघा असतात.

भारतात सर्वात जास्त सापडणारा व परिचयाचा करकोचा म्हणजे लहान **उघड्या चोचीचा करकोचा (Open-billed Stork)** *(Anastomus oscitans)* – चित्रपत्र 1.3 – हिंदी : *गंगुला* किंवा *घुंगिल*– हा अडीच फूट (75 सें.मी.) उंच असतो. त्याचा रंग पांढरा किंवा राखट पांढरा असतो. पंख काळे असतात. लांबून हे पक्षी स्थलांतर करणाऱ्या पांढऱ्या करकोच्यांसारखे दिसतात, व त्यामुळे घोटाळा होण्याचा संभव असतो. तांबूस काळ्या रंगाच्या चोचीचे दोन्ही भाग वाकलेले असल्यामुळे त्यांच्यात नेहमी फट राहते (म्हणून 'उघड्या चोचीचे' हे नाव) हे त्यांचे वैशिष्ट्यपूर्ण लक्षण त्यांची ओळख ताबडतोब पटवून देते. तळी, पाणवठे, पाणथळ जागा ह्यांच्या आसपास दोन, तीन किंवा अधिक संख्येच्या थव्यांनी हे पक्षी सापडतात. ह्या पक्ष्याच्या सवयी आणि वागणूक इतर करकोच्यांप्रमाणेच असते. परंतु त्याच्या चोचीचा वैशिष्ट्यपूर्ण आकार का आणि कशाकरता आहे ह्याची माहिती नाही. मुख्यत: ही चोच त्याचे प्रमुख अन्न

ज्या गोगलगाई, त्यांना पकडण्यासाठी आहे. चोचीमधल्या फटीमुळे त्याला गोगलगाईच्या भोवती जे कवच असते त्याचे तोंड फोडता येत असावे. शंखाच्या आतला मांसल प्राणी नीट बाहेर काढून खाल्ला जातो. बेडूक, मासे, खेकडे, मोठाले किडे, आणि इतर लहान प्राणीसुद्धा अन्नासाठी पकडले जातात. पाणकावळे, बगळे, इतर प्रकारचे करकोचे ह्या पक्ष्यांच्या संगतीत हे करकोचे मोठाल्या कळपात अंडी घालतात. गोलसर आकाराचे माचासारखे काटक्यांचे बनविलेले घरटे असते. घरट्याच्या मध्यभागी एक खोलगट भाग करून त्यात झाडांची व पाणवनस्पतींची पाने लावलेली असतात. कधी कधी गावाजवळच्या ओढ्यालगतच्या किंवा पाण्यातल्या झाडांवर बरीच घरटी एकत्र घातलेली असतात. अंडी – वेळेला 3 किंवा 4 – मळकट पांढऱ्या रंगाची असतात.

आपल्याकडील सर्वांत मोठा करकोचा म्हणजे **क्षत्र बलाक (Adjutant Stork)** *(Leptoptilos dubius)* – चित्रपत्र 1.5 – हिंदी : *हरगिला, गुरुर* किंवा *ढेंक*, ह्याची उंची चार फूट (1.20 मीटर) असते. काळा, राखी व मळकट पांढऱ्या रंगाचा हा प्रचंड पक्षी असून त्याची वजनदार, चौकोनी पिवळी चोच पाचरीसारखी दिसते. छातीवरून लोंबणारी बारा इंच (30 सें.मी.) लांबीची, लांबलचक, पिसे नसलेली, तांबूस पिशवी ह्या पक्ष्याची ओळख ताबडतोब पटवून देते. वाळत चाललेल्या पाणथळ जागा, किंवा काही वेळा नगरपालिकांच्या केराचा अड्डा, ह्यांच्या भोवती हा प्राणी एकटा अगर छोट्या कळपात आढळतो. पाऊल उंच उचलून सैनिकी पद्धतीने टाकण्याच्या त्याच्या रुबाबदार चालीमुळे त्याला ॲडज्यटण्ट हे इंग्रजी नाव शोभून दिसते. त्याच्या छातीवरील पिशवीचे खास वैशिष्ट्य काय हे समजलेले नाही. पण ही पिशवी नाकाच्या पोकळीशी जोडलेला वायुकोश आहे. ही पिशवी त्याच्या घशाला जोडलेली नाही आणि म्हणूनच तो ह्या पिशवीत अन्न ठेवतो आणि साठवितो ही जी एक समजूत आहे ती चुकीची आहे. घाणीच्या व टाकाऊ पदार्थांच्या साठ्यांच्या आसपास राहणारा हा पक्षी गिधाडांबरोबरीनेच शिळ्या मांसावर उपजीविका करतो. असहाय किंवा मृत मासे, बेडूक, सरडे, छोटे प्राणी आणि कधी कधी टोळ व इतर कीटक हे सर्व प्राणी तो खातो. हवेत उडण्यापूर्वी तो जमिनीवर पंख फडफडावीत थोडे अंतर पळत जाऊन वेग घेतो व मग हवेत उडतो. त्याचे उडणे जड आणि आवाज करीत होत असते. आपल्या इतर बांधवांप्रमाणेच हा दिवसा मध्यान्हीचे वेळी हवेत उंचावर घिरट्या घालताना आढळतो. ह्या पक्ष्याच्या चित्रात पाठीमागच्या बाजूला त्याची बसण्याची ढब दाखविली आहे. गुडघ्यापासूनचे खालचे पाय पुढे आडवे करून हा बसतो. मान खांद्यामध्ये ओढलेली असते. त्यामुळे तो केविलवाणा करुणाजनक दिसतो. काटक्यांचे खूप मोठे घरटे खडकांच्या सुळक्यांवर किंवा उंच वृक्षांवर बांधलेले असते. घरटी विस्कळीत समूहात काही वेळा बांधतात. – 3 ते 4 – पांढरी पण खूपच मळलेली अंडी ते घालतात.

ह्याचाच एक छोटा भाऊ म्हणजे **लहान क्षत्र बलाक (Lesser Adjutant)** *(L. javanicus)*. केरळ आणि सिलोन ह्यांच्या दरम्यानच्या विस्तृत क्षेत्रात हा आढळतो. त्याला लोंबणारी पिशवी नसते व त्याचा रंग वरून चकाकित धातूसारखा काळा व खालून पांढरा असतो.

**शराटी** कुळाचे (Family THRESKIORNITHIDAE) येथील प्रतिनिधी म्हणजे अवाक (Ibis) व दर्वीमुख (Spoon bill) पक्षी.

**पांढरा अवाक** (शराटी) **(White Ibis)** *(Threskiornis melanocephala)* – हिंदी: *मुंडा, मुंडुख* किंवा *सफेद बाझ* – हा एखाद्या मोठ्या कोंबडीच्या आकाराचा पांढरा पक्षी असून, काळ्या डोक्यावर व मानेवर पिसे नसतात. त्याची चोच लांब, काळी आणि खाली वळलेली असते. विणीच्या हंगामात पाठीवर आणि पंखावर काळपट राखी रंग दिसतो आणि मानेच्या बुडाशी लांब अलंकारिक पिसे असतात. जलाशयांच्या काठाने अगर पाणथळ प्रदेशात छोट्या किंवा खूप मोठ्या कळपाने हा प्राणी राहतो. दर्वीमुख, करकोचा आणि तत्सम पक्ष्यांशी भागीदारी करीत हा पक्षी चिखलाच्या गवताळ प्रदेशात आणि तांदळाच्या खुंटांवरून आपली चिमट्यासारखी चोच चिखलात खुपसून अन्नाचा शोध करताना आढळतो. अशा प्रसंगी बरेच वेळा त्याचे डोके उथळ पाण्यात संपूर्ण बुडून जाते. त्याचे अन्न म्हणजे शिंपले, शंख, खेकडे, अळ्या, कीटक, बेडूक आणि मधून मधून मासे हे प्राणी, त्यांना त्रास दिला तर किंवा निवास स्थानासाठी ते झाडांवर मोकळेपणे बसतात. मान पुढे उंचावून, पाय मागे खेचून हे पक्षी एकदम आणि जोराने उडतात. पंखांची नियमित हालचाल करीत व मधूनच तरंगत हे पक्षी आपले उड्डाण साधतात. बदकाप्रमाणेच ते आकाराच्या रचनेत एकत्र उडत, अन्नशोधार्थ फेऱ्या मारतात. करकोचे आणि दर्वीमुख ह्या प्रक्ष्यांप्रमाणेच ह्यांना नैसर्गिक आवाज नाही. विणीच्या हंगामात मात्र नकली रे रे आवाज काढतात. हा आवाज फारसा मोठा नसतो पण कापरा असतो. लांबवरून जर ह्या पक्ष्यांच्या घोळक्याचा आवाज ऐकला तर पुष्कळ माणसांच्या बोलण्याचा (गोंगाटाचा) जसा आवाज येतो तसा आवाज वाटतो.

माचासारखे काटक्यांचे घरटे झाडांवर बांधलेले असते. आपले इतर भाईबंद, पाणकावळे आणि तिरंदाज ह्या पक्ष्यांबरोबर हा प्राणी आपले घरटे पाण्यात उभ्या असलेल्या किंवा किनाऱ्यावरच्या व गावालगतच्या झाडांवर बांधतो. वेळेला – 2 ते 4 – अंडी घातली जातात. अंड्यांचा रंग स्वच्छ निळसर किंवा हिरवट पांढरा असतो व काही वेळा त्यावर पिवळट तपकिरी रंगाचे नाजूक ठिपके असतात.

**काळा शराटी – (Black Ibis)** *(Pseudibis papillosa)* – चित्रपत्र 6.33 – हिंदी : *काला बाझ* किंवा *करांकुल* - हा पक्षी पांढऱ्या शराटीसारखाच आहे. खांद्यावर मोठा पांढरा डाग असतो. पाय विटकरी तांबड्या रंगाचे असतात. पिसांविरहित काळ्या डोक्यावर तिकोनी आकाराचा किरमिजी रंगाचा मोठा चामखिळवजा तुरा त्याची ओळख ताबडतोब पटवितो. शेतांच्या पलीकडे असलेल्या सपाट माळरानावर हे पक्षी तीनचार जणांच्या घोळक्यात आढळतात. त्यांच्या आठ किंवा दहाच्या तुकड्याही असतात. पांढऱ्या शराटींप्रमाणे हा पाण्याच्या आसपास नसतो तर उलट जलाशयापासून दूर असतो. धान्याचे दाणे आणि किडे हे त्याचे मुख्य अन्न. पण त्याचबरोबर सरडे, लहान साप आणि पैसा (Centipede) हे प्राणीही आवडीने खातो. दिवसभर ते आवडीच्या प्रदेशात फिरतात व रात्री वस्तीला झाडांवर येतात. संथपणे पंख हलवीत, तरंगत हे पक्षी व्ही (V) रचनेत उडत असतात. साधारणपणे हे पक्षी

आवाज करीत नाहीत पण काढलाच तर उडताना नाकातून बाहेर पडणारा दोनतीन स्वरांचा चीत्कार ऐकू येतो. ब्राह्मणी बदकाच्या आवाजासारखा हा आवाज वाटतो. इतर पक्ष्यांबरोबर मिसळून काळे शराटी घरटी बांधत नाहीत परंतु एकाच झाडावर दोनतीन शराटी पक्ष्यांची घरटी मात्र आढळतात. काटक्यांचे वाटीच्या किंवा कपाच्या आकाराचे घरटे बांधून त्याला आतून गवत आणि पिसे लावतात. एखाद्या वृक्षाच्या उंच फांदीवर किंवा पामिटा पामच्या शेंड्यावर पाण्यापासून लांब हे घरटे बांधले जाते. वेळेला – 2 ते 4 – अंडी घालतात. अंडी तजेलदार फिक्कट हिरव्या रंगाची स्वच्छ किंवा तपकिरी ठिपके व रेघांची असतात.

**दर्वीमुख (Spoon bill)** *(Platalea leucorodia)* – चित्रपत्र 1.6 – हिंदी : *चमचा बाझ* किंवा *डाबिल*. शराटींच्याच नात्यामधला हा पक्षी असला तरी त्याची चोच त्यांच्यापेक्षा वेगळ्या आकाराची आणि वैशिष्ट्यपूर्ण आहे. चोच काळ्या व पिवळ्या रंगाची, रुंद व चपटी आणि टोकाला पसरट अशी आहे. बर्फासारख्या पांढऱ्या शुभ्र रंगाचा हा पक्षी बदकापेक्षा मोठा, (4.5 सें.मी.) उंच असतो. त्याचे पाय व मान लांबलचक असतात. विणीच्या हंगामात लांब व संपूर्ण फिकट पिवळ्या रंगाचा शेंडीवजा तुरा आणि गळ्यावर पिवळा डाग दिसतो. हे पक्षी कधी एकटे, कधी 10 ते 20 किंवा आणखी मोठ्या संख्येचा गट करून, तर कधी करकोचे आणि इतर पाणथळ पक्षी ह्यांच्या समवेत आढळतात. हे जरी भारतीय पक्षी असले तरी इतर ठिकाणांहून स्थलांतर करून येणाऱ्या पक्ष्यांमुळे त्यांची संख्या वाढते. दर्वीमुख पाणथळ प्रदेशांत, पाणवठ्यांजवळ, नदीकिनारी आणि खाडीत सापडतात. किनाऱ्यावरच्या उथळ पाण्यात हे अन्न शोधतात. विशेषतः सकाळी व संध्याकाळी ते जास्त तत्पर असतात तर दुपारच्या वेळी वालुकामय किनाऱ्यावर स्वस्थ विश्रांती घेतात. खूप उंचीवरून-मान व पाय ताणून - पंख संथ हलवीत हे पक्षी तिरप्या ओळीत किंवा V आकारात उडत घरापासून पाण्याकडे व परत घराकडे उडत असतात. त्यांचे अन्न म्हणजे बेडकांची पिले, बेडूक, शंख, शिंपले, जलकीटक हे प्राणी आणि वनस्पती हे होय. जलाशयाच्या कडेपासून आत पाण्यात हे चालत येतात. अर्धवट उघडलेल्या चोचीने मान लांब करून पाणी खालपासून ढवळतात. दर्वीमुख पक्ष्यांचा थवाच्या थवा ढकलाढकली करीत जवळ जवळ पळतच पुढे सरकतो, आणि नियमितपणे चिखल उपसून काढतो. क्वचित ते खालच्या सुरातला रे रे असा आवाज काढतात. बगळे, करकोचे, पाणकावळे, शराटी ह्यांच्या बरोबरीने किंवा स्वतःच्या कळपाने घरटी बांधतात. घरटे म्हणजे जाडसर माचण असते. गवाच्या वेशीवर असलेल्या पाणवठ्याच्या आसपास अगर इतर जलाशयाजवळच्या झाडांवर घरटी बांधली जातात. नेहमी 4 अंडी घालतात. रंग मळकट पांढरा व त्यावर गर्द तांबूस तपकिरी रंगाचे तुरळक ठिपके असतात.

**बलाक** कुलाचे (Family PHOENICOPTERIDAE) भारतामधील पक्षी म्हणजे **रोहित (Flamingo)** *(Phoenicopterus roseus)* – चित्रपत्र 1.1 – हिंदी : *बोग हंस, चराज*

*बग्गो*. आणि **लेसर फ्लेमिंगो (Lesser Flamingo)** *(Phoeniconaias minor)* हंसाच्या आकाराच्या ह्या पक्ष्यांचे अंग फिक्कट गुलबस पांढरे असते. उघडे, लांब गुलाबी पाय आणि लांब नागमोडी मानेमुळे त्याची उंची चार फूट (1.20 मीटर) असते. त्याची जड गुलाबी चोच मध्यावर वाकलेली ('मोडलेली') अशी खास प्रकारची असते. बदकाच्या पायाप्रमाणे त्याची बोटे पडद्यांनी जोडलेली असतात. ह्या पक्ष्यांचा थवा जेव्हा उडत असतो तेव्हा काळ्या कडांच्या पंखांवरील भडक शेंदरी रंगाच्या पिसांमुळे एक अविस्मरणीय दृश्य दिसते. खाडी, खाऱ्या पाण्याची सरोवरे आणि जलाशय यांत हे पक्षी कळपाने राहतात. संबंध भारत, पाकिस्तान व श्रीलंका येथील हे रहिवासी असून स्थानिक किंवा तुरळक स्थलांतर करतात. साधारणपणे ह्यांचे लहान कळप असतात, तर काही कळप हजारो पक्ष्यांचेही असतात. पाण्यातून चालत जाताना डोके पाण्याखाली बुडवून ते अन्न गोळा करतात. चोच वळवलेली असल्यामुळे तिच्या टोकाने ते चिखलाचा तळ खरवडून काढतात. ह्याच परिस्थितीत चोचीचा वरचा भाग पाण्यातून गाळ व मासे ओढून गोळा करतो. जिभेने हे पाणी गाळून बाहेर टाकले जाते; कारण जिभेच्या कडेला झालर असते व साहजिक अन्न फक्त तोंडात राहते. वेळ आली तर ते उत्तम पोहतात. खोल पाण्यात पोहताना ते बदकांसारखी संपूर्ण उलटी डुबी मारून फक्त शेपटी पाण्याबाहेर ठेवून तळ गाठण्याचा प्रयत्न करतात. छोटे खेकडे, जलकीटक, कीटकांच्या अळ्या, किडे, पाणवनस्पतींच्या बिया, सेंद्रिय कण हे त्यांचे अन्न. रोहित पक्षी हंसांप्रमाणे व्ही (V) च्या आकारात किंवा सैलसर तिरप्या फितींच्या आकारात पंखांची झटपट हालचाल करून उडतात. त्यावेळी बारीक मान पुढे ताणलेली व पाय शेपटीखाली पसरलेले असतात. हे पक्षी बरेचसे शांत आहेत. हंसांप्रमाणेच ते 'हॉंक' आवाज कधीतरी काढतात व अन्नसाधनेच्या वेळी तर कलकलाटच चालू असतो. भारतामधील त्यांचे अंडी घालण्याचे एकमेव स्थान म्हणजे कच्छचे रण. ऑक्टोबर ते मार्च ह्या काळात त्या ठिकाणी पाण्याची अनुकूल परिस्थिती असल्यामुळे रोहित पक्ष्यांचे प्रचंड जमाव येतात. एका वेळी पाच ते दहा लाख पक्षी येत असावेत असा अंदाज आहे. म्हणून कच्छच्या रणाला रोहित शहर (फ्लेमिंगो सिटी) असे म्हणतात. त्यांचे जगामधील सर्वांत मोठे असे हे वसतिस्थान समजले जाते. चोचींनी खरवडून गोळा केलेल्या ओल्या चिखलाचे कोनाकृती घरटे हे पक्षी बांधतात. उन्हात ते वाळून चांगले मजबूत होते. घरट्याची उंची एक फूट (30 सें.मी.) असते. शेंड्यावर तव्यासारखा खोलगट भाग असतो. त्यात वेळेला – 2 किंवा 1 – अंडी घातली जातात. पक्षी त्या अंड्यांवर पाय मुडपून बसतो व ती उबवितो. घरट्यावर दोन्ही बाजूंना पाय टाकून तो अंडी उबवितो अशी जी वर्णने जुन्या पुस्तकात आहेत ती अर्थातच चुकीची आहेत.

**हंस गण** (Order ANSERIFORMES) : अन्न आणि क्रीडासाधन म्हणून हा गण विशेष लोकप्रिय आहे. ह्या गणात हंस (Swan), हंसी (Geese) आणि बदक (Ducks)

ह्यांचा समावेश होतो. पाणकोंबडा (Teal) म्हणजे छोटे बदकच. (ज्याप्रमाणे पारवा म्हणजे छोटे कबुतर त्याप्रमाणे.) ह्या दोघांत नावाखेरीज दुसरा फरक नाही.

आर्क्टिक युरोप व आशिया ह्या प्रदेशातील थंडी विलक्षण वाढली तरच इकडे येणारे पक्षी म्हणजे हंस. त्यांचा येथे विचार करण्याचे कारण नाही. हंसांच्या काही जातींपैकी जे आपल्याकडे नियमितपणे हिवाळ्यात येतात त्यांच्यापैकी एक म्हणजे **पट्टयाचा हंस (Bar-headed Goose** *(Anser indicus)* – चित्रपत्र – 3.17 – हिंदी : *हंस, सवान, बिर्वा. परिचित हंसाच्या* आकाराच्या ह्या पक्ष्याचा रंग मुख्यतः राखी, तपकिरी व पांढरा असतो. डोके आणि मानेच्या दोन्ही बाजू पांढऱ्या असतात. पिवळी चोच व मानेवरील दोन मोठे आडवे काळे पट्टे ह्यांमुळे तो सहज ओळखता येतो. हरभरे आणि गव्हाची शेते ह्यांच्या आसपास, किंवा नद्या आणि इतर जलाशय ह्यांच्या सान्निध्यात ह्या पक्ष्यांची टोळकी आढळतात. साधारणपणे एका टोळक्यात 15 ते 20 पक्षी असतात. काही वेळा मात्र मोठाली टोळकी कोवळे हरभरे आणि गहू खाताना किंवा दुपारच्या उन्हात किनाऱ्यावर विश्रांती घेताना दिसतात. शिकाऱ्यांच्या सतत पाठलागामुळे किंवा त्रासामुळे हे पक्षी रात्री किंवा संधिप्रकाशात उदरभरण करतात. त्यांच्या नेहमीच्या स्थलाकडे संध्याकाळच्या वेळी व्ही (V) रचनेत किंवा लांब रेघांच्या रचनेत उडत जाताना ह्या पक्ष्यांचे थवेच्या थवे दिसतात. इतर हंस पक्ष्यांप्रमाणेच हे पक्षी शेतात चरतात किंवा पाण्यात उलटा सूर मारून अन्न पकडतात. त्यांचे अन्न म्हणजे हिवाळी पिकांची कोवळी धाटे, धान्य इत्यादी.

निरनिराळ्या स्वरात 'आंग, आंग' असा आवाज काढीत हे पक्षी गातात. रानकोंबड्यांना त्या पक्ष्यांच्या गाण्यामुळे उत्साह येतो. हा पक्षी अतिशय सावध किंवा दक्ष असल्यामुळे त्याला आपल्या कह्यात आणून पकडणे फार त्रासाचे काम असते. बौद्ध तिबेटसारख्या ठिकाणी त्यांना कोणताच धोका पोहोचत नाही हे त्यांना समजते. मग अशा ठिकाणी ते धीटपणाने याक लोकांच्या तंबूंच्या आसपास फिरतात आणि पाळीव बनतात.

त्या पक्ष्यांचे अंडी घालण्याचे जवळचे स्थान म्हणजे लडाख. समुद्रसपाटीपासून खूप उंचीवर असलेल्या तळ्यांच्या किंवा सरोवरांच्या किनाऱ्यावरच्या झाडीत हे पक्षी पानांचे खोलगट घरटे बांधतात. घरट्याच्या आतल्या बाजूने पिसांची लावणी केलेली असते. हस्तिदंतासारखी पांढरी – 3 किंवा 4 – अंडी घातली जातात.

स्थलांतर करणारा आणखी एक हंस म्हणजे **कलहंस (Greylag)** *(Anser anser)* – हिंदी : *काज*. हा बहुतेक हंसांचा मूळ पुरुष (पक्षी) समजला जातो. नेहमी आढळून येणाऱ्या तपकिरी हंसाप्रमाणेच ह्याचा आकार व दर्शन असते. शेपटीकडील भाग राखी रंगाचा असतो व त्याची चोच मांसल गुलाबी रंगाची असते. नदी, तळी व सरोवरे ह्यांच्या आसपास हा पक्षी राहतो.

रानटी बदकांच्या भारतात ज्या 20 जाती हिवाळ्यात सापडतात त्यांपैकी फक्त 5 किंवा 6 जाती येथेच राहून प्रजोत्पादन करतात, बाकीच्या सर्व जाती सैबेरियामधून स्थलांतर करून

येतात. ह्या पाचसहा जातींपैकी सर्वत्र सापडणारी जात म्हणजे **ठिपक्याचे** किंवा **राखी बदक (Spot bill or Grey Duck)** *(Anas poecilorhyncha)* – चित्रपत्र 3.16 – हिंदी : *गर्मपाय, गुम्रल, लड्डिम.* ह्याचा नेहमीच्या बदकाएवढाच आकार असतो. पिसांवर खवल्याखवल्यांचा फिकट व दाट तपकिरी रंग असतो. पंखांची बाजू पांढऱ्या, काळ्या, मळकट धातूसहश्य हिरव्या रंगाच्या तीन पट्ट्यांनी उठून दिसत असल्यामुळे त्याला ओळखणे कठीण जात नाही. त्याशिवाय भडक नारिंगी-तांबड्या रंगाचे पाय व पिवळ्या टोकाच्या चोचीच्या बुडाशी कपाळाच्या दोन्ही बाजूला असलेले दोन नारिंगी तांबडे डाग खात्री पटवितात. हे पक्षी जोडीने किंवा लहान टोळक्यांनी वेतांनी भरलेल्या उथळ तळ्यात राहतात. ह्यांची संख्या मात्र स्थलांतर करणाऱ्या बदकांएवढी मोठी कधीच नसते. पृष्ठभागावर किंवा वरवरच्या भागात चालत हे संचार करून अन्नसाधन करतात. काही वेळा उथळ पाण्यात उलटी डुबी मारून खालचा तळ गाठताना ते शेपटी व पाय झटकून आपला तोल संभाळताना दिसतात. हे प्राणी बहुतांशी शाकाहारी आहेत. जलवनस्पतींची देठे, बिया, शेतामधील बी हेच त्यांचे अन्न. काही वेळा बरोबरीने शंख, शिंपले, पाणकिडे व अळ्या हे प्राणी पण चवीने खातात. हा पक्षी उडण्यात जबरदस्त असल्यामुळे त्याला मारण्याच्या अगर पकडण्याच्या क्रीडेसाठी तो लोकांचा आवडता असला तरी त्याची ख्याती रुचकर पक्षी म्हणूनही आहे. सहसा हे पक्षी आवाज करीत नाहीत. कलहंसाचा *(Drake)* आवाज म्हणजे कर्कश घरघर असते, तर बदके मोठ्यांदा क्वाक, क्वाक करीत धोक्याचे वेळी आवाज काढतात. भरपूर पाण्याचे सन्निध हे राखी बदक पक्षी जवळ जवळ वर्षभर अंडी घालतात. गवत आणि पाणवनस्पतींचे माचे म्हणजे त्यांचे घरटे. हे तलावाच्या कडेला झुडपांमध्ये लपविलेले असून त्याला कधी कधी आतून पिसे लावलेली असतात. – 7 ते 9 किंवा 12 – पर्यंतही अंडी घातली जातात. अंड्यांचा रंग स्वच्छ राखी पिवळा किंवा हिरवट पांढरा असतो.

**मराल (Lesser Whistling Teal)** *(Dendrocygna javanica)* – चित्रपत्र 3.15 – हिंदी : *सिल्हि* किंवा *सिल्काही.* राखी बदकापेक्षा लहान असा हा पक्षी काळसर लाल (चेस्टनट) रंगाचा असल्यामुळे त्याच्याच आकाराच्या इतर पक्ष्यांमध्ये सहज ओळखता येतो. सरळ रेघेत उडताना त्या पक्ष्याची कर्कश शीळ वैशिष्ट्यपूर्ण असते. वेताच्या बेटांनी अगर पाणवनस्पतींनी भरलेल्या तलावात किंवा दलदलीच्या शेतांमधून हा पक्षी दहा किंवा पंधरांच्या समूहाने राहतो. ज्या तलावांजवळ झाडे असतील ते तलाव हा जास्त पसंत करतो. त्यामुळे त्याला झाडांवर राहता येते. म्हणूनच काही वेळा त्याला 'फल्व्हस ट्री डक' असेही म्हणतात. तलाव आटू लागल्यास हे पक्षी खूप भटकतात. जलकपोत (Jacana) पक्ष्यांप्रमाणे त्याचे उडणे क्षीण व पंख हलवीत होते. उडताना तो शबल धोबी (Large Pied Wagtail) पक्ष्याप्रमाणे एकसारखी कर्कश घरघर करणारी 'सी-सिक, सी-सिक' अशी शीळ वाजवितो. हे पक्षी उत्तम चालतात आणि उत्कृष्ट सूर मारतात. अन्नात गोगलगाई, किडे, बेडूक, मासे हे प्राणी व कोवळ्या वनस्पतींचे हिरवे देठ आणि दाणे ह्यांचा समावेश होतो. पाने, गवत ह्यांचे

अस्तरासारखे घरटे तलावाच्या काठी जमिनीवर काटेरी झुडपात घालतात; किंवा पाण्यापासून दूर झाडांवरच्या डोलीत अगर फांद्यांच्या दुबेळक्यात काटक्यांचे घरटे तयार करतात. घारीची किंवा कावळ्यांची जुनी घरटीही काही वेळा वापरतात. – 7 ते 12 – पण बहुधा 10 अंडी घातली जातात. ताज्या अंड्यांचा रंग दुधासारखा पांढरा असतो पण उबविल्यामुळे ती पुढे तपकिरी रंगाची दिसतात.

**मोठा मराल (Large Whistling Teal)** *(D. bicolor)* हा पक्षी भारताचा रहिवासी म्हणून क्वचित आढळतो. त्याच्या मोठ्या आकाराने साध्या मराल पक्ष्याहून वेगळा दिसतो. शिवाय त्याच्या शेपटीची पिसे काळसर रंगाची नसून पांढरी असतात.

**काणूक पक्षी (Cotton Teal)** *(Nettapus coromandelianus)* – चित्रपत्र 3.14 – हिंदी : *गिरिआ, गुरगुरा, सोनिया.* आपल्याकडे राहत असलेल्या जंगली बदकांपैकी सर्वांत लहान पक्षी म्हणजे हा काणूक पक्षी. साधारणपणे गावठी कोंबडीच्या आकाराचा हा पक्षी बहुतांशी पांढऱ्या रंगाचा असतो. नर वरून चकाकित काळसर असतो. डोके, मान व खालचा भाग पांढरा असतो. त्याला काळ्या रंगाची गळपट्टी असून उडताना पंखावरचा पांढरा पट्टा स्पष्ट दिसतो. मादीचा रंग सरसकट फिका तपकिरी असतो आणि तिला गळपट्टी किंवा पंखावरचा पट्टा नसतो. विणीच्या हंगामाशिवाय इतर काळात नर व मादी सारखीच दिसतात पण नराच्या पंखावरचा पांढरा पट्टा मात्र कायम असतो. राखी बदकाच्या बरोबरीनेच हा काणूक पक्षी आपल्याकडे सर्वत्र सापडतो; फक्त तो सर्वांत लहान आकाराचा पक्षी आहे एवढेच. नेहमी 5 ते 15 किंवा अधिक संख्येच्या गटाने हा वावरत असतो. क्वचित्-प्रसंगी 50 किंवा त्याहून अधिक संख्येचे गट आढळून येतात. ज्या ज्या ठिकाणी जलाशय आहे आणि त्यात वेताची बेटे व वनस्पती भरपूर आहेत त्या त्या ठिकाणी हा पक्षी आढळतो. हे जलाशय म्हणजे गावातील तलाव, रस्त्यालगतची पाण्याची डबकी, पाण्याने भरलेली बिळे, किंवा पाण्याने भरलेली भातशेते इत्यादी असू शकतात. त्यांना जर त्रास दिला नाही तर ते माणसाळले जातात गावातल्या तलावावर माणसांची वर्दळ असली तरी हे पक्षी विश्वासाने न भिता पोहत राहतात. अन्नामध्ये कोवळ्या वनस्पती, दाणे आणि कीटक, गोगलगाई इत्यादी सजीव खाल्ले जातात. हे पक्षी जलद व चपळ उडणारे असतात. नवी पिसे धारण करण्याचे वेळी त्यांना उडता येत नाही परंतु अशा वेळी पाण्यात सूर मारून हे आपला बचाव फारच चलाखीने करतात. उडताना 'क्लक क्लक' एवढाच आवाज ते करतात. पाण्याजवळ किंवा पाण्यात असलेल्या झाडावर सपाटीपासून 6 ते 30 फूट उंचीवर हे पक्षी झाडामधील नैसर्गिक पोकळी व ढोली ह्यांचेच घरटे करतात. वेळेला – 6 ते 12 – अंडी घातली जातात. अंडी हस्तिदंतासारखी पांढरी स्वच्छ असतात. पिलांना हे पक्षी पाण्यात घेऊन जातात असा जो समज आहे तो चुकीचा आहे. ही पिले आपणहून फडफडत पाण्यात किंवा जमिनीवर उतरतात.

**ससाणा गण** (Order FALCONIFORMES) किंवा शिकारी पक्षी. ह्या पक्षीगणात **वाजी** (Family ACCIPITRIDAE) (हॉक, गरुड, गिधाडे आणि कुरर – Osprey) आणि **ससाणा** (FALCONIDAE) ही कुले गणली जातात. ह्या कुलांमधील पक्ष्यांत निश्चित फरक करता येत नाही. दोन्ही कुलांतील पक्ष्यांना मांस फाडण्यासाठी आकडीसारखी वळलेली छोटी व शक्तिमान चोच आणि तितकेच जोरदार वळलेले आकडी पंजे (claws) असतात. वाजी कुलातील पक्ष्यांचे पंख रुंद आणि गोलाकार व टोकदार असतात. त्या पंखांमुळेच पंख लांबट, चिंचोळे, चातीच्या आकाराचे व टोकदार असतात. त्या पंखांमुळेच ते आपल्या भक्ष्याचा वेगाने पाठलाग करू शकतात. घार आणि गिधाड ह्यांसारखे पक्षी शिळे मांस किंवा प्रेते ह्यांवर उपजीविका करतात तर शिक्रा आणि पावशा (Sparrow Hawk) हे पक्षी जिवंत भक्ष्यावर आडून झडप घालून त्याचा पाठलाग करून त्याला पकडतात व खातात. ससाणे हे खरे शिकारी पक्षी आहेत. भक्ष्याचा पाठलाग करण्यासाठी खूप उंचीवरून ते थेट धडक मारतात. त्यामुळेच पावशा जंगलामध्ये राहतो कारण त्याला तेथे लपून राहता येते तर ससाणा मोकळ्या मैदानाची जागा पसंत करतो.

शिकारीच्या क्रीडेसाठी जे पक्षी माणसाकडून मारले जातात त्यांचा नाश पावशा, गरुड आणि ससाणे हे पक्षी करतात असा वृथा आरोप त्यांच्यावर केला जातो. शिकारीच्या अधिकृत नियमांप्रमाणे ह्या पक्ष्यांना पिकांना उपद्रव देणारे पक्षी ठरविले असून त्यांना कोणतेही संरक्षण देण्यात आलेले नाही. ह्या पक्ष्यांच्या अन्नसवयींचा लक्षपूर्वक अभ्यास केल्यावर हे पक्षी उलट उपकारच ठरले आहेत; कारण पिकांचा नाश करणारे उंदीर, घुशी ह्यांसारखे प्राणी हे नाहीसे करतात. शेवटी हे शिकारी पक्षी उपद्रवी असण्यापेक्षा फायदेशीरच अधिक आहेत आणि म्हणून ते कायदेशीर संरक्षणास पात्र आहेत.

**घार** आणि **ब्राह्मणी घारी (Pariah & Brahminy kites)** – चित्रपत्र 4.18, 4.19 – स्वतःच्या आसपास जी कृत्रिम परिस्थिती मानवाने निर्माण केली आहे त्यात सापडणाऱ्या त्या दोन प्रकारच्या परिचित घारी आहेत. घार पक्षी इतर सदृश पक्ष्यांपासून त्याच्या दुभंगलेल्या शेपटीमुळे चटकन ओळखता येतो. त्याच्या शेपटीचा हा आकार विशेषतः तो उडत असताना स्पष्ट दिसतो. खाटीकखाने, मासळी व मांसबाजार, कचऱ्यांचे साठे, गोदी आणि बंदरे ह्यांच्या आसपास मिळणारे तुकडे गोळा करताना हे पक्षी बहुसंख्येने दिसतात. गर्दीच्या रस्त्यावर मरून पडलेला उंदीर, किंवा मांसाचे तुकडे, घेऊन जाण्यासाठी हा पक्षी ज्या चपलतेने रहदारीतील माणसे, वाहने, टेलिफोन आणि विजेच्या तारा ह्या अडथळ्यांना कुशलतेने टाळून येतो ते पाहण्यासारखे असते. त्याची ही कुशलता म्हणजे विमानशास्त्रामधील एक धडाच आहे. कोंबड्यांची पैदास (पोल्ट्री) करणाऱ्या लोकांना मात्र हा पक्षी त्रासदायक वाटतो. कारण आईबरोबर तुरुतुरु चालणारी कोवळी पिले हा पक्षी उचलून नेतो. गावात राहणाऱ्या सर्वांनाच घारीची इवी-विर-विर-विर-विर ही शीळ परिचित आहे.

**ब्राह्मणी घार** *(Haliastur indus)* – हिंदी : *ब्राह्मणी छील, धोबिया छील,* किंवा *खेमकरनी.* घारीच्याच आकाराचा पण सुरेख असा हा पक्षी आहे. वरून गंजासारखा तांबडा

रंग,पांढऱ्या रंगाचे डोके,छाती आणि पोट असते लहान वयाचे पक्षी चॉकोलेटसारखे तपकिरी रंगाचे असतात आणि घारीच्या व गिधाडाच्या पिलांशी त्यांचे खूपसे साम्य असते. अर्थातच त्याच्या गोलसर शेपटीमुळे तो ह्या इतरांहून सहज ओळखता येतो. नद्या व सरोवरे ह्यांच्या आसपास हा पक्षी जरी दिसला तरी प्रामुख्याने तो समुद्रकिनाऱ्यावरच्या गावांमधून व बंदरांमधून आढळतो. पावसाळ्यात सर्वत्र पाणी साठले म्हणजे तो किनाऱ्यापासून दूर अंतर्भागातील भातशेतांच्या आसमंतातही संचार करतो. कावळे आणि घारी यांच्या समवेत ब्राह्मणी घार मानवी वस्तीत सुद्धा अन्न गोळा करण्यास येते. परंतु पाण्याच्या पृष्ठभागावरून अन्न टिपून काढणे त्यांना जास्त पसंत असल्यामुळे बंदरे आणि मासेमारीची केंद्रे ही ठिकाणे त्या आपली वसतिस्थाने करतात. अंतर्गत भागात सरडा,मासा,बेडूक,खेकडा,साप हे प्राणी आणि कीटकसुद्धा त्यांचे अन्न असतात.पावसाने ओल्या झालेल्या जमिनीतून पंखाचे वाळवी किडे जेव्हा बाहेर पडतात तेव्हा त्यांना पकडणे व खाणे हे ब्राह्मणी घारीला जास्त मानवते. सुजलेल्या घशातून घार जसा आवाज काढील तशी कर्कश किंकाळी ही ब्राह्मणी घार काढते. दोन्ही प्रकारच्या घारी झाडांवर काटक्यांची माचेवजा मोठी घरटी बांधतात. त्यांतल्या त्यात ब्राह्मणी घार पाण्याजवळचे झाड अधिक पसंत करते अंडी राखट किंवा गुलबस पांढरी असून त्यावर तांबूस तपकिरी रंगाचे ठिपके असतात.

**शिक्रा (Shikra)** *(Accipiter badius)* – चित्रपत्र 4.20 – हिंदी : *शिक्रा.* कबुतराच्या आकाराची छोटी घार म्हणजे शिक्रा पक्षी. वरून राखट निळसर-राखी रंगाच्या,खालून पांढऱ्या व त्यावर गंजासारखे तपकिरी पट्टे असलेल्या ह्या पक्ष्याच्या शेपटीवर रुंद काळपट रेघा असतात. मादी नरापेक्षा मोठी असून वरून जास्त तपकिरी असते. बालक पक्षी वरून तपकिरी आणि तांबूस दिसतात व त्यांच्या खालच्या बाजूला तपकिरी रेघा असतात. जंगलामध्ये ह्यांच्या जोड्या आढळतात आणि गावाच्या किंवा शेताभोवतालच्या दाट झाडीत ते असतात. टोळ, नाकतोडे, बेडूक, उंदीर ह्यांसारखे प्राणी म्हणजे त्यांचे अन्न. भक्ष्याला आश्चर्यचकित करून पकडणे ही त्यांची खरी युक्ती. दाट झाडीच्या फांदीवर ताठ बसणारे हे पक्षी, सावजाला धोका समजण्यापूर्वीच त्याच्यावर झडप घालून उचलून नेतात व नखांनी त्याला ओरबाडून, फाडून खातात. सातभाई (Babbler), लाहुरी (Quail) व होला (Dove) ह्यांसारख्या पक्ष्यांवर आपल्या गुप्त जागेतून झडप घालतात आणि त्यांचा निश्चयाने पाठलाग करून त्या पक्ष्यांना पकडतात घरगुती कोंबड्यांच्या नाजूक पिलांची चोरी करण्यात शिक्रा पक्का मुरलेला आहे. त्यामुळेच तो पोल्ट्री-व्यावसायिकांचा शत्रू आहे. शिक्रा पक्ष्याचे कर्कश ओरडणे कोतवाल पक्ष्याप्रमाणेच पण अधिक मोठ्या आवाजाचे असते. विणीच्या हंगामात एकमेकाशी प्रणयक्रीडा करताना हे पक्षी 'टिटुई' असा तीव्र स्वर काढतात. प्रणयक्रीडेत ते हवेत नाना प्रकारचे खेळ करतात व एकमेकांचा पाठलाग करीत सूर मारताना हे फारच आवाज करतात. गावाजवळच्या राईमधील वृक्षांवर हे कावळ्यासारखेच काटक्यांचे घरटे बांधतात. वेळेला – 3 किंवा 4 – फिकट निळसर पांढऱ्या रंगाची अंडी घालतात.काही वेळा अंड्यावर राखट रंगाचे फिकट लहानमोठे ठिपके असतात.

**पांढऱ्या पाठीचे किंवा बंगाली गिधाड (White-backed or Bengal Vulture)** *(Gyps bengalensis)* – चित्रपत्र 6.32 – हिंदी : *गिध.* भारतात बहुतेक सर्वत्र सापडणारा हा पक्षी काळपट तपकिरी रंगाचा असून स्थूल व किळसवाणा दिसतो. त्याचे डोके व मान हडकुळी आणि उघडी (पिसे नसलेली) असते. विश्रांती घेताना व एका बाजूला कलते होऊन उडत असताना त्याची पांढरी पाठ स्पष्ट दिसते व ओळखता येते. डोक्यावर उंच उडत असताना खालून त्याच्या पंखांच्या खालच्या भागावरील पांढरा पट्टा (धडामुळे खंड पडलेला) सहज दिसतो व त्यामुळे हा पक्षी ओळखण्यास मदत होते. बालक पक्षी तपकिरी असतात व पाठ पांढरी नसल्यामुळे **लांब चोचीच्या गिधाडाशी** *(G. indicus)* त्यांचा घोटाळा होतो. हे दोन्ही पक्षी श्री लंकेत अजिबात सापडत नाहीत हे आश्चर्याचे आहे. पांढऱ्या पाठीचे गिधाड भारताच्या द्वीपकल्पावर सर्वत्र आढळते. फक्त दमट सदाहरित जंगलांचा प्रदेश मात्र तो टाळतो. स्थिर पंख ठेवून उंच आकाशात डौलाने तासनतास तरंगणारा हा पक्षी अन्न शोधीत हिंडत असतो. भंग्यासारखे काम करणारे म्हणून हे पक्षी मानवाला फार उपयोगी पडतात. त्यांची दृष्टी अतिशय तीक्ष्ण असते पण त्यांचे गंधज्ञान मात्र बेताचे असते किंवा नसतेच. ह्या प्राण्यांचा घोळका रिकाम्या आकाशातून क्षणार्धात कोठून येऊन एखादे मृत जनावर पळवितो हे एक नवलच असते. हा घोळका एखाद्या मृत बैलाचा किंवा तत्सम मोठ्या प्राण्याचा इतक्या थोड्या वेळात आणि अतिशय नीटपणे कसा निकाल लावतो हे एक आश्चर्यच आहे. प्रेताची भयानक उत्तरक्रिया करताना हे पक्षी एकमेकांशी धक्काबुक्की करीत कर्कश आवाज करीत असतात, किंवा मांसाच्या एकाच तुकड्याला पकडून दोघेजण भांडत असतात. रस्त्याच्या कडेला किंवा गावाजवळच्या झाडावर ही गिधाडे काटक्यांची व फांद्यांची उंच व मोठी माचेवजा घरटी बांधतात. एकच अंडे घालतात. अंड्याचा रंग पांढरा असतो व कधीकधी त्यावर तांबूस तपकिरी रंगाचे ठिपके किंवा शिडकावे असतात.

द्वीपकल्पाच्या रुक्ष भागात आढळून येणारे लहान गिधाड म्हणजे **पांढरे** किंवा **सर्वाशनी गिधाड. (White or Scavenger Vulture)** त्याला **फरोहाचे चिकन (Pharaoh's Chicken)** असेही म्हणतात *(Neophron percnopterus)* – हिंदी : *सफेद गिध* किंवा *गोबर गिध* – चित्रपत्र 4.23 – घारीसारखा हा पक्षी मळकट पांढऱ्या रंगाचा असतो. पंखांची पिसे काळी असतात व चोच आणि डोके पिवळ्या रंगाचे रोगट व उघडे असते. बालक पक्षी तपकिरी असतात पण पाचरीच्या आकाराच्या शेपटीमुळे सहज वेगळे ओळखता येतात. मनुष्यवस्तीच्या आसपास मोकळ्या जागेत दोन किंवा तीनच्या समूहात हे दिसतात. आकाशात उंचावर घिरट्या घालीत किंवा जमिनीवर अन्न शोधीत हे दिसतात. जमिनीवर उंच व लांब टांगा टाकीत फिरण्याची त्यांची चमत्कारिक चाल दिसून येते. सांडपाण्याची चांगली व्यवस्था असलेल्या गावातील लोक आपले प्रातर्विधी वेशीच्या आसपास उरकून ती जागा गलिच्छ करतात. अशा ठिकाणी हे पक्षी स्वच्छता करून त्या गावाची सेवाच करतात. इतर प्रकारच्या घाणीबरोबरच माणसाचा मळ हे त्यांचे प्रमुख अन्न आहे. मद्रासजवळच्या थिरुकलिकुंद्रम गावातल्या देवळाच्या पुजाऱ्यांनी दिलेला प्रसाद भक्षण करण्यास (ते बनारसहून येतात अशी

श्रद्धाळू समजूत आहे) ह्या जातीच्या पक्ष्यांची एक अमर जोडी विशिष्ट वेळी येते अशी दंतकथा आहे. ह्यांचे घरटे म्हणजे काटक्यांचा डोलारा असतो. त्यात प्राण्यांची कातडी, केस, चिंध्या आणि कचरा असतो. घरटी पडक्या इमारतीच्या फळकुटावर किंवा खडकाच्या सुळक्यांवर असतात, कधी कधी झाडाच्या दुबेळक्यातही असतात. वेळेला 2 अंडी घालतात. ह्या घाणेरड्या पक्ष्यांची अंडी मात्र सुंदर व स्वच्छ पांढऱ्यापासून विटकरी तांबड्या रंगापर्यंतच्या कोणत्याही रंगाची असतात. त्यांवर तांबूस तपकिरी किंवा काळपट ठिपके असतात.

**ससाणा (Shaheen Falcon)** *(Falco peregrinator)* – चित्रपत्र 4.21 – हिंदी : *शाहीन*. टोकदार पंख असलेल्या ससाण्यांपैकी शाही ससाणा हा एक चांगला नमुना आहे डोमकावळ्याच्या आकाराचा, रुंद खांद्यांचा, सुबद्ध व सशक्त असा हा पक्षी आहे. वरून काळपट दगडी रंगाच्या ह्या पक्ष्याचे डोके काळे व कपोलावर पट्टे असतात. तो पोटाच्या भागाकडून गुलबस पांढरा किंवा गंजासारखा तांबडा असतो. काही पक्ष्यांच्या पोटापासून खाली काळे पट्टे असतात. मादी अशीच पण मोठी असते. शाही ससाणा एकटा किंवा जोडीने डोंगराळ प्रदेशांमधील तुटलेल्या कड्यांवर व सुळक्यांवर वास्तव्य करतो. तेथून त्याला आपल्या भक्ष्यावर लक्ष ठेवता येते व त्याच्यावर झडप घालता येते उत्तरेकडे सापडणाऱ्या शाही ससाण्यांपैकी (किंवा त्याला भैरी असेही म्हणतात) जे हिवाळ्यात आपल्याकडे येतात त्यांचा हा येथील स्थानिक प्रतिनिधी आहे. कबूतर, राघू आणि इतर लहान पक्षी हे त्याचे भक्ष्य आहेत. शाही ससाण्याचे उड्डाण अतिशय वेगाचे असते. टोकदार पंख वेगाने हलवून तो उठतो व त्यानंतर अतिशय वेगाने तरंगत जातो. भक्ष्याला तो हवेतच आपल्या नख्यांनी पकडतो व एखाद्या सुळक्यावर जाऊन त्या भक्ष्याला ओरबाडून व फाडून खातो. विणीच्या हंगामात जोडप्यांच्या चाललेल्या प्रणयक्रीडा प्रेक्षणीय असतात. एकमेकांकडे सूर मारून विलक्षण वेगाने झेपावत घरट्यात – 3 किंवा 4 – अंडी घालतात. अंड्यांचा रंग फिक्कट विटकरी तांबडा असून त्यांवर तांबूस तपकिरी रंगाचे ठिपके व डाग असतात. घरट्याची जागा वर्षानुवर्षे तीच राहते आणि त्या जागेला जर धक्का बसला नाही तर ती वंशपरंपरागत राहते.

**तुरुमती ससाणा (Redheaded Merlin)** *(Falco chicquera)* – चित्रपत्र 4.22 – हिंदी : *तुरुमती*. टोकदार पंखाचा हा शोभिवंत ससाणा वरून निळसर राखी असतो व खालच्या पांढऱ्या रंगावर काळपट आडवे पट्टे असतात. मान व डोके काळसर तांबड्या (चेस्टनट) रंगाचे असून डोळ्याच्या खालच्या आणि वरच्या बाजूला काळसर तांबड्या रंगाची 'मिशी' सारखी रेघ ह्या त्याची ओळख पटवून देणाऱ्या खुणा आहेत. उडत असताना त्याच्या पंखांची पांढरी कड आणि वरचे रुंद काळे पट्टे त्याची ओळख दृढ करतात. शेतांच्या आसपास उंचवट्यांवर किंवा टेकाडांवर त्या पक्ष्यांच्या जोड्या बसलेल्या दिसतात; किंवा उंदीर, छोटे पक्षी, सरडे व मोठे कीटक ह्यांना पकडण्यासाठी वेगाने कुंपणावरून उडत जाताना हा पक्षी दिसतो. काही वेळा संध्याकाळच्या वेळी जेव्हा वटवाघळे झाडांवरून बाहेर पडतात तेव्हा त्यांच्याकडे

विलक्षण वेगाने झेपावून हा ससाणा त्यांना पकडतो. नर व मादी जोडीने शिकार करतात. एकजण सावजाच्या मागे लागून त्याचा पाठलाग करीत त्याला दुसऱ्याकडे ढकलतो तर दुसरा लगेच झडप घालून सावजाला पकडतो. नंतर दोघेजण ते भक्ष्य वाटून घेतात. एखाद्या मोठ्या तुरुमती मादीला चाष (निळकंठ), हुप्पो, मैना, तित्तर ह्या पक्ष्यांची शिकार करण्याचे खास शिक्षण दिले जाते. इतर ससाण्यांप्रमाणे जोराने व दीर्घकाल पंख हलवून हा पक्षी एखाद्या बाणासारखा विलक्षण वेगाने भक्ष्याचा पाठलाग करतो. त्याचे ओरडणे म्हणजे एक कर्कश किंकाळी असते. विणीच्या हंगामात हे पक्षी अतिशय धीट आणि निर्दय बनतात, व आपल्या घरट्याच्या आसमंतात येणाऱ्या कावळे, घारी ह्यांसारख्या मोठ्या पक्ष्यांवर हल्ला करून त्यांना ढकलून देतात. घरटे म्हणजे काटक्यांचे माचे असते व माळरानात उभ्या असलेल्या वृक्षांच्या पर्णमय छतात बांधले जाते. अंडी – 3 किंवा 4 – फिकट तांबूस पांढरी असून त्यांवर तांबूस तपकिरी रंगाचे दाट ठिपके असतात.

**कुक्कुट गण** (Order GALLIFORMES) – आपल्या भागात प्रामुख्याने भारद्वाज (Pheasant), जंगली कोंबडी, तित्तर (Partridge) आणि दुर्लाव (Quail) ह्या शिकारी क्रीडापक्ष्यांचे कुल (Family PHASIANIDAE) कुक्कुट गणाचे प्रतिनिधित्व करते. हे दाणे खाणारे पक्षी मध्यम आकाराची चोच, गोलाकार पंख, लांबट बळकट पाय (नराला पुष्कळ वेळा आरी – spur – असते), बळकट व बोथट पंजे (उकरण्यासाठी) अशा गुणांचे असतात.

**काळे तित्तर (Black Partridge)** *(Francolinus francolinus)* – चित्रपत्र 5.25 – हिंदी : काळा तीतर, नेहमीच्या परिचयाच्या चितूर (Grey Partridge) पक्ष्याच्या आकाराचा हा पक्षी असतो. ह्या जाडसर पक्ष्याचे भुंडे शेपूट काळ्या कुळकुळीत रंगाचे असते. शेपटावर पांढऱ्या आणि पिंगट रंगाचे ठिपके आणि पट्टे असतात. नराचे चकाकणारे पांढरे कपोत (गाल) व काळसर तांबडा (चेस्टनट) गळपट्टा चटकन ओळखू येतो. मादी पुष्कळच फिकट रंगाची असते. तिच्या अंगावर पांढरे व काळे ठिपके असतात व मानेवर काळसर तांबडा डाग असतो. उत्तर भारत व आसाममधील उंच गवताच्या जंगलात, नदीकाठी, झुडपात व पाण्यालगत वाढणाऱ्या वनस्पतींच्या घोळक्यात हा सुंदर पक्षी एकटा किंवा जोडीने आढळतो. उसाची शेते, ज्वारीची शेते आणि चहाचे मळे ही ठिकाणे सुद्धा त्याच्या आवडीची निवासस्थाने आहेत. शेतांमधील दाणे किंवा पीक खाण्यासाठी हे पक्षी सकाळी व संध्याकाळी शेतात घुसतात त्यावेळी शेताच्या कडेने इकडे तिकडे चोची मारीत हिंडताना आढळतात. भटकताना हा पक्षी पाणकोंबडीप्रमाणे आपले भुंडे शेपूट वर उभे करून हिंडतो. चितूर पक्ष्यात ही पद्धत सहसा दिसत नाही. हे पक्षी उत्तम पळतात, व म्हणूनच ते आपल्या पायांवर संकटाच्या वेळी जास्त विश्वास टाकतात. त्यांचे उडणे वेगाचे असते. पंखाची त्वरित हालचाल करीत जमिनीपासून 10-15 फूट किंवा – 3 ते 5 – मीटर ऊंचीपर्यंत उडताना हे एका वेळी शेदोनशे

मीटर अंतर काटतात. दाणे, गवताचे बी, कोवळ्या फांद्या हे त्यांचे अन्न पण वाळवी किंवा इतर किडेही हे पक्षी चवीने खातात. नराचा आवाज उत्साहवर्धक, घुमणारा, व उच्च स्वराचा असतो. 'चिक...चीक-चीक-केरेकेक' अशा प्रकारचा कर्कश पण स्वरबद्ध आवाज ते काढतात. परंतु हे पक्षी 'सुभान-तेरी-कुदरत लसन-पियाझ-अदरक' असे म्हणतात असा एक अर्थ लावला जातो. गवताळ जमिनीत झुडपांच्या मुळाशी उथळ खड्डा करून घरटे तयार करतात. घरट्यात गवत लावलेले असते. अंड्यांचा – 6 ते 8 – रंग फिकट ऑलिव्ह-तपकिरीपासून जवळजवळ चॉकलेटी तपकिरी रंगापर्यंत कोणताही असतो.

**चितूर (Grey Partridge)** *(Francolinus pondicerianus)* – चित्रपत्र 5.26 – हिंदी : *तीतर* किंवा *सफेद तीतर*. *चितूर* आकाराने गावठी कोंबडीच्या निम्म्याने असतो व त्याचे मुंडे शेपूट काळ्या तित्तरासारखेच असते. सर्वसाधारण रंग राखट तपकिरी असतो व त्यावर काळ्या आणि पिवळ्या, तांबूस रंग मिसळलेल्या, रेघा असतात. शेपटीवर काळपट तांबड्या (चेस्टनट) रंगाच्या रेघा असतात. गळ्याचा रंग तांबूस असतो आणि सभोवती काळ्या रंगाची तुटक रेघ असते. नर मादीपेक्षा बळकट दिसतो आणि त्याच्या प्रत्येक पायावर टोकदार आरी (spur) असते. शेताच्या व गावाच्या आसपास असलेल्या माळरानात किंवा काटेरी झुडपांच्या भागात हा पक्षी आढळतो. त्याचा उत्साहवर्धक आणि घुमणारा आवाज खेड्यापाड्यांच्या आसपासच्या प्रदेशात परिचित आहे. विणीच्या हंगामात त्यांची जोडपी असतात परंतु इतर वेळी ते 4 ते 6 च्या गटाने इकडे तिकडे ताठ राहून पळताना, पायाने जमीन किंवा शेण उकरून अन्न शोधताना दिसतात. अन्नात रसाळ फळे, बिया व कीटक ह्यांचा समावेश होतो. वाळवी आणि मानवी उत्सर्जनात सापडणाऱ्या अळ्या हे त्यांचे आवडते खाद्य आहे. धोका पोहोचताच हा गट माघार घेतो आणि झुडपांच्या आश्रयाने पळत जाऊन शेवटी एकेकट्याने एखाद्या झुडपात लपून राहतो. उडण्याचा त्यांना कंटाळा असतो पण प्रसंगच आला तर नाइलाजाने पंखांचा घर्रर असा फडफडाटी आवाज करून गटातील पक्षी चारी दिशांना पांगतात व शंभर एक मीटर गेल्यावर जमिनीवर उतरून लगेच ते पुन्हा जोरात पळू लागतात. काटेरी झाडांवर रात्री ते वसती करतात. 'कटीटर, कटीटर' किंवा 'पटीला पटीला पटीला' अशा प्रकारचा आवाज नर पक्षी काढतात. सुरवातीला हळू पण पुढे वारंवार व तीव्र स्वरात त्यांचे हे ओरडणे चालू राहते. बालक पक्षी सहज माणसाळले जातात. कुत्र्याप्रमाणेच ते आपल्या मालकाच्या मागोमाग जातात, आज्ञेत राहतात, आणि त्याने बोलाविले तर लांब अंतरावरूनही धावत त्यांच्याकडे येतात. झुंज लावण्यासाठी नरांची मागणी फार असते. जत्रेच्या किंवा सुटीच्या दिवसांत खेडेगावांमधून चितूरांशी झुंज लावणे हा एक लोकप्रिय खेळ आहे व त्यावेळी मोठ्या रकमेच्या पैजा जिंकल्या व हरल्या जातात. विजेत्या पक्ष्यांना फारच किंमत येते. काटेरी झुडपाच्या आश्रयाने जमिनीत उथळ खड्डा करून घरटे बांधले जाते. घरट्यात गवत लावलेले असते. – 4 ते 8 – अंडी घातली जातात. त्यांचा रंग तपकिरी फिकट पिवळा (क्रीम) असतो व त्यावर इतर कोणत्याही खुणा नसतात.

**काळ्या छातीचा किंवा पावसाळी दुर्लाव (Black-breasted or Rain Quail)** *(Coturnix coromandelica)* – चित्रपत्र 5.27 – हिंदी : *चनक, छीन बटेर.* चितूर पक्ष्याच्या निम्या आकाराचा हा पक्षी आहे. हा पक्षी म्हणजे चितूरची छोटी आवृत्ती. पिसे पिवळट तपकिरी रंगाची असतात व त्यांच्यावर पुसट रेघा असतात. खालच्या भागावर वेड्यावाकड्या आकाराचे काळपट डागही दिसतात. नराच्या छातीचा वरचा (मानेकडचा) भाग आणि पुष्कळदा पोटाचा मध्यभाग काळ्या रंगाचा असतो. मादीच्या छातीचा रंग काळा नसतो आणि गळ्यावरचे काळे-पांढरे भागही नसतात.

**राखी दुर्लाव (Common or Grey Quail)** *(C. coturnix).* उत्तरेकडून हिवाळ्यात मोठ्या संख्येने भेट देणारा हा पक्षी आहे. नराच्या गळ्यावर नांगराच्या आकाराची काळी खूण असते तर मादी पावसाळी दुर्लाव मादी पक्ष्यासारखीच दिसते, फक्त आकाराने मोठी असते एवढेच. हातात जर मादी पकडली तर तिच्या पंखांवरील पिवळसर आणि तपकिरी रंगाच्या पट्ट्यांमुळे ती सहज ओळखता येते. वरील दोन्ही जातींच्या पक्ष्यांच्या चालीरीती समान असतात. दुर्लाव हे जमिनीवर राहणारे पक्षी असून बहुतेक वेळ ते कोवळ्या पिकांच्या किंवा गवताच्या झुडपाआड काढतात. ते उत्तम पळतात आणि वेळ आली तरच उडतात. मुद्दाम हुसकावले तर हे पक्षी पंखाचा विशिष्ट फडफडाटी आवाज करीत व मंद शीळ काढीत शे-दोनशे मीटर उडतात. गवताच्या किंवा पिकाच्या शेंड्यालगत उडून ते थोड्याच वेळात झुडपामध्ये उतरतात. पंख थरथरावून ते एकदम उडतात. त्यांच्या उडण्याचा वेगही जलद असतो. त्यांचा आहार प्रामुख्याने दाणे व गवताचे बी-बियाणे ह्यांचा असतो. पण त्याचबरोबर ते वाळवी आणि इतर कीटकही खातात. पावसाळी दुर्लाव पक्षी 'विच्-विच्. . विच्-विच्' अशा आवाजाची स्वरमय शीळ वाजवितात. हा प्रकार विशेषत: विणीच्या दिवसात सकाळी आणि संध्याकाळी वारंवार होतो. ढगाळ हवेत ते दिवसभर व रात्रीही शीळ वाजवितात. राखी दुर्लाव पक्ष्याचा आवाज ह्यापेक्षा निश्चित वेगळा आहे. त्याची पद्धत म्हणजे प्रथम एक लांब शीळ वाजवून पाठोपाठ दोन छोटे स्वर काढणे. ह्याला इंग्रजीत 'ए लिक्किड वेट-मी-लिप्स' असे म्हणतात. उभ्या गवतात किंवा पिकात लपविलेला जमिनीतील उथळ खड्डा म्हणजे ह्यांचे घरटे. घरट्यात आतल्या बाजूने गवत लावलेले असते. – 6 ते 8 – अंडी वेळेला घातली जातात. अंड्यांचा रंग पिवळट-सायीसारखा असून त्यावर तपकिरी रंगाच्या विविध छटांचे डाग असतात. दोन्ही पक्ष्यांच्या अंड्यांच्या आकारात मात्र फरक असतो.

**जंगली दुर्लाव (Jungle Bush Quail)** *(Perdual asiatica)* – चित्रपत्र 5.28 – हिंदी : *लोव्वा.* इतर दुर्लाव पक्ष्यांच्या आकाराचा आणि त्यांच्यासारखाच दिसणारा हा पक्षी आहे. नर वरून पिंगट तपकिरी रंगाचा असून त्यावर काळ्या आणि पिवळट रंगाच्या रेघा व ठिपके असतात. खालच्या पांढऱ्या रंगावर जवळजवळ असलेले काळे पट्टे असतात. मादीचा खालचा भाग गुलबस पिंगट रंगाचा असतो. नर व मादी ह्या दोहोंच्या अंगांवर कपाळापासून मानेच्या बाजूला गेलेली पिवळट व चेस्टनट रंगाची भुवईची पट्टी स्पष्ट दिसते. शिवाय गळ्यावर चेस्टनट रंगाचा डाग असतो. **रॉक बुश क्वेल** *(P. agroondah) जातीचा पक्षी ह्या*




K.P. JADAV

1. रोहित (पृ.29-30) 2. ठिपक्याच्या चोचीचा किंवा करडा पेलिकन (पृ.20)
3. उघड्या चोचीचा करकोचा (पृ.26-27) 4. रंगीत करकोचा (पृ.26 )
5. क्षत्र बलाक (पृ.27) 6. दर्वीमुख (पृ.29)




7. तिरंदाज (पृ.21) 8. पाणकावळा किंवा करढोक (पृ.22)
9. राखी बगळा (पृ.23) 10. लहान बगळा (पृ.24) 11. वंचक (पृ.24-25)
12. [illegible]




13. पाणडुबी (छोटा ग्रीब किंवा डॅबचिक) (प. 19)    14. काणूक (पृ.33)
15. छोटा मगल (पृ.[illegible]) [illegible]




18. घार (पृ.34) 19. ब्राह्मणी घार (पृ.34) 20. शिक्रा (पृ.35)
21. ससाणा (पृ.37) 22. तुरुमती ससाणा (पृ.37)
23. पांढरे किंवा सर्वाशनी गिधाड (पृ.36)




24. राखी जंगली कोंबडी (पृ.41) 25. काळे तित्तर (पृ.38) 26. चितूर (पृ.39)
27. पावसाळी किंवा काळ्या छातीचा दुर्लाव (पृ.40) 28 . जंगली दुर्लाव (पृ.40)




29. मोठा भारतीय सारंग (माळढोक) (पृ.45)   30. मोर (पृ.42)   31. सारस (पृ.43)
32. पांढऱ्या पाठीचे बंगाली गिधाड (पृ.3 6)   33. काळा शराटी (पृ.28)




0 2 4 6 INCHES
0 50 100 150 MM

K.P.JADAV

34. तुतवार (पृ.48)    35 . लिटल रिंग्ड प्लवर (पृ.48)
36. पांढऱ्या छातीची पाणकोंबडी (पृ.44)    37. ब्राँझ पंखांचा जलकपोत (पृ.46)
38. जांभळी पाणकोंबडी (पृ.44)    39. टिटवी (पृ.47)




40. भारतीय नदीसुरय (पृ.51)  41. तपकिरी डोक्याचा कुरव (पृ.50)
42. मलबारी धनेश (पृ.65)  43. चष्मेवाला प्लवर (पृ.49)  44. भाटतीतर (पृ.52)




45. चाष (नीलकंठ) (पृ.64)  46. हरितालक (पृ.53)  47. ठिपक्याचे कबुतर (पृ.54)
47(अ). तांबडा होला (पृ.55)  48. पारवा (पृ.54)  49. पोपट (गुलाबी कंठाचा) (पृ.55)




50. दुर्बल (पृ.58)  51. कोकिळ (पृ.56)  52. शृंगी उलूक (शिंगवाले घुबड) (पृ.59)
53. भारद्वाज (पृ.57)  54. भारतीय रात्रिंचर (रातवा) (पृ.60)




55. दुर्बल (पृ.61) 56. तांबट (पृ.66) 57. खंड्या (पृ.61)
58. छोटा हिरवा वेडा राघू (पृ.63) 59. मराठा सुतार (काष्ठकूट (पृ.67)
60. शबल मीनरंक (पृ.62) 61. सुतार (हुप्पो) (पृ.64)




62. लालबुड्या भांडिक (पृ. 70) 63. राखी खाटीक (पृ. 71) 64. कोतवाल (पृ. 73)
65. टकाचोर (पृ. 76) 66. तुरेबाज चंडोल (पृ. 69) 67. पद्मपुष्प किंवा कस्तूर (पृ. 68)
68. कावळा (पृ. 76)




0 1 2 3 INCHES
MM
0 25 50

K.P.JADAV

69. शिंपी (पृ.85)  70. राखा वटवट्या (पृ.84)  71. गप्पीदास (पृ.87)
72. चष्मेवाला (पृ.94)  73. टिकेलचा फुलटोच्या (पृ.92)  74. राखी टिट (पृ.89)
75. जांभळा शिंजीर (पृ.93)  76. चेस्टनट पोटाचा नटहॅच (पृ.89)
77. करडा धोबी (पृ.91)  77. (अ). मोठ्या ठिपक्यांचा धोबी (पृ.91)
78. झाडावरील पिपीट (पृ.92)

79 80 81 83 82 84 85 86




K.P.JADAV

79. लालबुड्या बुलबुल (पृ.80)    80. लालगाल्या बुलबुल (पृ.74)
81. जेरडोनचा क्लोरॉप्सिस (पृ.78)    82. सुभग (शुकिक) (पृ.78)
83. कालशीर्ष कांचन (पृ.72)    84. शेंदरी विष्फुलिंग (मिनिव्हेट) (पृ.77)
85. साळुंकी (मैना) (पृ.74)    86. रंगीत साळुंकी (पृ.75)




87. स्वर्गीय नर्तक (सुरंगी) (पृ.92)  88. बडा सातभाई (बैरागी) (पृ.83)
89. पांढऱ्या ठिपक्यांचा नर्तक (नाचरा) (पृ.81)  90. छोटा सातभाई (पृ.84)
91. शमा (पृ.86)  92. पिवळ्या डोळ्यांचा सातभाई (पृ.82)  93. चीरक (पृ.87)
94. दयाळ (पृ.86)  95. पर्वत कस्तूर (पृ.88)

96

97

98a

98

99

100

101




K.P.JADAV

96. गुलाबी फिंच (पृ.97) 97. सुगरण (पृ.95) 98. ठिपक्यांचा मुनिआ (पृ.96)
98 (अ). लाल मुनिआ (पृ.96) 99. कालशीर्ष भारीट (पृ.98)
100. रक्तशीर्ष भारीट (पृ.98) 101. चिमणी (पृ.95)

पक्ष्यांबरोबर नेहमी आढळतो व ही जात जंगली दुर्लावसारखीच असल्यामुळे ह्या दोन्ही जातींच्या पक्ष्यांमध्ये नेहमी घोटाळा होतो. ह्या जातीच्या नराच्या गळ्यावर चेस्टनटऐवजी फिकट विटकरी तांबड्या रंगाचा डाग असतो तर मादीच्या गळ्यावर कोणत्याच रंगाचा डाग नसतो. पाने गळून पडणाऱ्या (पतझडी) जंगलात आणि गवत व झुडपांच्या रानात जंगली दुर्लाव राहतो. 5 ते 20 च्या गटाने हे पक्षी राहतात, आणि रात्रीच्या वेळी विश्रांती घेताना किंवा दिवसा इतर वेळी जर त्यांना त्रास दिला तर एखाद्या झुडपाच्या आश्रयाने बाहेर तोंडे करून जमावाने एकत्र येतात. त्यांच्यावर जर चुकून पाय पडला तर एकदम एकत्र उडतात किंवा स्फोटासारखे सर्व दिशांना पसरतात. उडताना पंखांचा सूं सूं आवाज करीत ते पांगतात आणि थोड्याच वेळात आणखी एखाद्या झुडपात आश्रयाला उतरतात. 'व्ही-व्ही-व्ही...' असा आवाज करून पक्षी एकमेकांना साद घालतात व लवकरच पुन्हा एकत्र येतात. एका ठराविक मार्गाने हे पक्षी रोजच्या रोज सकाळी व संध्याकाळी एका ओळीत पाणी पिण्यासाठी येतात. दाणे, बी-बियाणे, कोवळे अंकुर, वाळवी व तत्सम कीटक हे त्यांचे अन्न. विणीच्या हंगामात नर लढाऊ वृत्तीचे होतात आणि कर्कश ओरडून प्रतिस्पर्ध्यांना आव्हान देतात. झुडपांच्या जंगलात जमिनीवर उथळ खड्डा करून त्यात गवत लावून घरटे तयार करतात. –4 ते –8 अंडी वेळेला घालतात. अंडी दुधाच्या सायीसारखी पांढरी असतात व पावसाळी दुर्लाव पक्ष्यांच्या अंड्यांहून संपूर्ण निराळी असतात.

**राखी जंगली कोंबडी (Grey Jungle-fowl)** *(Gallus sonneratii)* – चित्रपत्र 5.24 – हिंदी : *जंगली मुरगी.* गावठी कोंबडीच्या आकाराचे हे पक्षी आहेत. नराच्या अंगावर राखट रेघा असतात व विळ्याच्या आकाराची शेपटी चकचकीत काळ्या रंगाची असते. मादी वरून तपकिरी रंगाची व खालून पांढऱ्या रंगावर खवल्यासारख्या बारक्या काळ्या ठिपक्यांची असते. डोंगरांच्या पायथ्याशी असलेल्या बांबूच्या जंगलात हे पक्षी एकटे, जोडीने अगर छोट्या टोळ्यांमध्ये राहतात. बेवारशी पडलेल्या शेतांमधून अगर टंटणींच्या जंगलांमधून अगर झाडे कापल्यावर उगविणाऱ्या दाट झुडपांमधून राहणे हा पक्षी अधिक पसंत करतो. द्वीपकल्पाच्या पश्चिम भागात ह्यांची वस्ती मर्यादित आहे. बांबू किंवा कर्वीच्या जंगलात, जेव्हा ह्यांचे बी तयार होते तेव्हा, ह्या पक्ष्यांचे थवेच्या थवे हे बी खाण्यासाठी येतात. रानटी कोंबडी आणि तांबड्या रंगाच्या जातीची कोंबडी हे दोन्ही पक्षी लाजाळू आणि भित्रे आहेत. अन्नासाठी ते सकाळी व संध्याकाळी जंगलापासून जवळच्या मोकळ्या भागात येतात. पण जरा जरी संकटाची चाहूल लागली तरी लगेच लांब माना करून व शेपट्या पाडून झुडपांच्या आश्रयाला धावतात. त्यांच्या अन्नामध्ये दाणे, कोवळी झुडपे व टंटणींची आणि बोरांची रसाळ फळे ह्यांचा समावेश होतो. वड व तत्सम झाडांची पडलेली फळे तर त्यांना खूपच आवडतात. शिवाय किडे, अळ्या हे प्राणीसुद्धा ते खातात. 'कुक-कया-कया-कुक' असा जंगली कोंबड्याच्या नराचा आवाज असतो. ह्या आवाजाच्या शेवटी 'क्यूकुन-क्यूकुन' असा मंद व हळू स्वर काढला जातो. त्यांचा आवाज फार दूरवर ऐकू जात नाही. एखाद्या उंचवट्यावर उभे राहून व पंख फडफडवून नंतर कोंबडा साद घालतो. त्याच्या भोवतालचे इतर कोंबडे तसेच ओरडून त्याला प्रतिसाद देतात.

एका कोंबड्याची एकच मादी असते का अनेक मादींचा झनाना तो बाळगतो ह्याची खात्री देता येत नाही. दाट झुडुपांच्या तळाशी मातीत उथळ खड्डा करून व त्यात वाळलेली पाने लावून हे पक्षी घरटी तयार करतात. साधारण – 4 ते 7 – अंडी घालतात. गावठी कोंबडीच्या अंड्यांसारखीच ह्यांची अंडी फिकट ते जरा ठळक पिवळट रंगाची असतात.

**तांबडी जंगली कोंबडी (Red Jungle-fowl)** *(G. gallus)* आपण ज्या कोंबड्या पाळतो त्यांची उत्पत्ती ह्या जातीपासून झालेली आहे. हा पक्षी प्रामुख्याने हिमालयाच्या तराई जंगलात, पूर्व मध्य प्रदेशापर्यंत साल वृक्षांबरोबर *(Shorea robusta)* पसरलेल्या हिमालयाच्या पायथ्याच्या प्रदेशात आढळतो. पाळीव बँटम जातीप्रमाणेच ह्या पक्ष्याचे नर आणि मादी हे असतात. कोंबड्याचा (नराचा) आवाजही त्यांच्याप्रमाणेच असतो.

**मोर (Common Peafowl)** *(Pavo cristatus)* – चित्रपत्र 6.30 – हिंदी : *मोर* किंवा *मयूर*. भारताचा हा 'राष्ट्रीय' पक्षी तितर पक्ष्यांमधील सर्वात परिचयाचा व थाटामाटाचा आहे.

हा पक्षी इतक्या परिचयाचा आहे की त्याचे वर्णन करण्याची जरूरी नाही. फक्त एकाच गोष्टीबद्दल खुलासा करणे जरूर आहे. ती म्हणजे मोराची डोळे अस्लेली सुरेख शेपूट नसून ती त्याच्या शेपटीची असाधारण लांबीची पिसे आहेत. लांडोरीला मोरासारखा डोक्यावर तुरा नसतो व ती साधारण तपकिरी रंगाची असून गळ्याच्या खालच्या भागाचा रंग झळझळीत हिरवा असतो. डोंगरांच्या पायथ्याशी असलेल्या जंगलात किंवा पतझड जंगलात हा पक्षी कळपात वावरतो. काही हंगामात नर व मादी एकत्र राहून कळपापासून अलग होतात. जंगलांमधील मोकळ्या प्रदेशांमधून हे पक्षी सकाळी व संध्याकाळी अन्न गोळा करण्यासाठी येतात. गुजरात आणि राजस्थानमध्ये हे पक्षी धार्मिक भावनांशी निगडित राहिल्यामुळे माणसाळले आहेत. अशा पक्ष्यांचा स्वभाव निसर्गात राहणाऱ्या लुच्च्या स्वभावाच्या पक्ष्यांपेक्षा खूप वेगळा असतो. हे जंगली पक्षी शिकाऱ्याला कौशल्याने हुलकावणी देतात. ह्या पक्ष्यांचे डोळे आणि कान विलक्षण तिखट असतात. त्यामुळेच त्यांना बेसावध अवस्थेत पकडणे कठीण असते. जरा जरी संशय आला तरी ते झुडपांचा आश्रय घेऊन निसटतात. परंतु जर त्यांच्यावर अकस्मात हल्ला केला तर आवाज करीत पंखांचा कष्टदायक फडफडाट करीत अग्निबाणासारखे सरळ वर उडतात. एवढे लांब 'शेपूट' असून देखील एकदा उडावयास लागले की चांगलाच वेग घेतात. रात्रीचा निवारा उंच वृक्षांमध्ये घेतात व सकाळ झाली की मोरांच्या (नराच्या) 'मेअँव' आरोळीने सारे रान दणाणून जाते. इतक्या सुंदर पक्ष्याचा आवाज मात्र त्याला न शोभणारा आहे. दाणे, कंदमुळे, कोवळ्या वनस्पती, हे त्यांचे अन्न; परंतु त्यांचा आहार मिश्र असल्यामुळे किडे, सरडे आणि छोटे साप हे प्राणीसुद्धा ते भक्षण करतात. खेडेगावातील संरक्षित पक्षी शेतात खुशाल निर्भयपणे वावरतात. पण ते शेंगदाणे आणि इतर तृणधान्यांच्या पिकांचे खूप नुकसान करतात. कारण ह्या पिकांचे अंकुरच ते खाऊन टाकतात. जमिनीत झुडपांमध्ये दडविलेला व काटक्या-पानांनी लावलेला उथळ खड्डा म्हणजे ह्यांचे घरटे. वेळेला – 3 ते 5 – अंडी घातली जातात. अंड्यांचा रंग फिकट पिवळट सायी पासून दुधाळ कॉफीच्या रंगापर्यंत कोणताही असतो.

**क्रौंच गण** (Order GRUIFORMES). भारतात ह्या गणामधील बरीच कुले आढळतात. त्यांपैकी महत्त्वाची कुले म्हणजे **क्रौंच कुल** (GRUIDAE, क्रौंच), **रॅलिडी** (RALLIDAE)(रेल पक्षी), **सारंग** (OTIDIDAE, सारंग किंवा माळढोक पक्षी).

**सारस (Saras Crane)** *(Grus antigone)*– चित्रपत्र 6.31 – हिंदी : *सारस* – हा क्रौंच पक्ष्यांचा एक उत्तम नमुना. गिधाडाच्या आकाराचा राखी रंगाचा हा पक्षी जवळजवळ माणसाइतका उंच असतो. ह्याचे तांबडे पाय, तांबडे डोके आणि वरची मान हे भाग उघडे (पिसांविरहित) असतात. ह्या पक्ष्यांची जोडपी शेतांमधून आणि दलदलीच्या प्रदेशांमधून, कधीकधी एकदोन पिलांना बरोबर घेऊन हिंडताना दिसतात. कळप सहसा दिसत नाहीत, परंतु शंभर शंभर पक्ष्यांचा थवा अगदीच अपरिचित नाही. आयुष्यभर एकच जोडीदार असल्यामुळे त्यांचे जोडपे लोककथांमध्ये आदर्श मानले गेले आहे. त्यांचे हे जीवन इतके आदर्श मानतात की त्याला एक प्रकारचे पावित्र्य निर्माण झाले आहे. गावकरी त्यांना कधीही त्रास देत नाहीत. त्यामुळेच ते माणसाळले आहेत व ते सर्वत्र संचार करतात. उलट त्यांचे स्थलांतर करणारे बांधव मात्र त्यांच्या रुचकर मांसासाठी व उत्कृष्ट क्रीडापक्षी म्हणून ख्याती पावले आहेत. एकदम उडताना त्यांना जरा जडच जाते पण एकदा का हवेवर आरूढ झाले म्हणजे पंखांच्या हळुवार दिसणाऱ्या पण अतिशय नियमबद्ध हालचालीने मान पुढे करून पाय मागे ताणून हे पक्षी अतिशय वेगाने प्रवास करतात. उडताना किंवा जमिनीवर ते तुतारीसारखा मोठा, नादबद्ध व लांबवर पोहोचणारा आवाज काढतात. विणीच्या हंगामात किंवा इतर वेळी सुद्धा ह्या पक्ष्यांच्या जोडप्यांची प्रेमक्रीडा बघण्यासारखी असते. पंख पसरून, उड्या मारून, एकमेकांना सलाम करून, नाचत व खिदळत ते आपला गमतीदार खेळ करीत असतात. त्यांच्या आहारात धान्य, कंदमुळे, कोवळे अंकुर, इतर शाकाहार, आणि कीटक, शंखशिंपले, बेडूक, सरडे, कधीकधी मासे ह्यांचा अंतर्भाव होतो. शेतात मनमुराद नाचण्यास मज्जाव नसल्यामुळे हे पक्षी शेंगदाणे व तृणधान्यांचे कोवळे अंकुर खाऊन पिकांचे नुकसान करतात. कळक, पाने, गवत ह्यांनी **बांधलेले घरटे पाण्याने भरलेल्या शेतात इतर पाणथळ** जागेत असते. नेहमी 2 अंडी घालतात. अंड्यांचा रंग फिकट हिरवट किंवा गुलबस पांढरा असतो. कधी कधी त्यावर तपकिरी व जांभळ्या रंगाचे ठिपके किंवा डाग असतात.

दुसरे दोन राखी क्रौंच पक्षी हिवाळ्यात स्थलांतर करून मोठ्या संख्येने भारतात येतात. त्यांच्यापैकी लहान म्हणजे **स्थानिक क्रौंच (Demoiselle Crane)** *(Anthropoides virgo)* – हिंदी : *करकरा* किंवा *कूंज पक्षी*. त्याच्या डोक्यावर पिसे असतात व कानाच्या भोकावरची पिसे *चकाकित पांढरी* असतात. मान आणि छाती काळी असते. दुसरा **सामान्य क्रौंच (Common Crane)**, *(Grus grus)* किंवा **कुलंग**. डोके काळे व पिसांविरहित असते. मानेवर तांबडा डाग असतो.

**रेल** (Family RALLIDAE) हे पक्षी दलदलीच्या प्रदेशांमधून लपून छपून राहणारे

आहेत. ते लहान ते मध्यम आकाराचे असून भुंडे शेपूट, गोलाकार पंख व लांब उघडे पाय व बोटे असलेले पक्षी आहेत.

**पांढऱ्या छातीची पाणकोंबडी (White-breasted Waterhen)** *(Amaurornis Phoenicurus)* – चित्रपत्र 7.36 – हिंदी : *जलमुरगी* किंवा *डौक.* राखी चितूर पक्ष्याच्या आकाराच्या ह्या पक्ष्याचा रंग (दगडी पाटीसारखा) स्लेटी करडा असतो. शेपूट भुंडे असून उघड्या पायाने हा पक्षी दलदलीच्या प्रदेशात वावरतो. त्याचा चेहरा व छाती पांढरी असते आणि उभारलेल्या शेपटीच्या खाली गंजासारखा तांबडाभडक डाग असतो. जलाशयाच्या आसपास, बांबूच्या बेटाच्या आसपास, आणि पाणवठे किंवा तलाव ह्यांच्या काठावरील दाट झुडपांमध्ये हे पक्षी एकटे किंवा जोडीने सापडतात. पावसाळ्यात जेव्हा सर्वत्र पाणथळ जागा निर्माण होतात त्यावेळी मात्र ह्यांच्यापासून दूर राहून ते रस्त्यालगतच्या झुडपांमध्ये किंवा गवताळ प्रदेशात आश्रय घेतात. झुडपांमधून रमतगमत फिरताना किंवा लपून लपून वावरताना ते आपली शेपूट उभारून चालत असल्यामुळे शेपटीखालचा तांबडा डाग स्पष्ट दिसतो. हा पक्षी तसा भित्रा आहे आणि त्याच्यावर लक्ष ठेवलेले त्याला आवडत नाही. परंतु जर त्याला त्रास दिला नाही तर तो बागांमधून किंवा हिरवळीवरून मोकळेपणाने वावरतो. किडे, शंख, शिंपले, कीटक, धान्य इत्यादी पदार्थांचे तो भक्षण करतो. पावसाळ्यातील विणीच्या हंगामाखेरीज हा पक्षी आवाज काढीत नाही. विणीच्या हंगामात नर मोठे भांडखोर आणि गडबड करणारे होतात. एखाद्या झुडपाच्या टोकावर उभे राहून आपल्या मांजरासारख्या गुरगुरणाऱ्या आवाजाचा स्वैर उच्चार करतात. त्यांचे ओरडणे म्हणजे घोगरट आवाजात क्रो-क्रो शब्द असतात. उदा., क्र-क्काक-क्काक, क्र-क्काक-क्काक – अस्वलाच्या दुःखित आवाजाप्रमाणे. त्यानंतर 'कूक-कूक-कूक' असा एकसारखा आवाज करीत राहतात. हा आवाज तांबट (Coppersmith Barbet) पक्ष्याप्रमाणे वाटतो, फक्त पाणकोंबडीचा स्वर आणि वेग मात्र उच्च असतो. गावातल्या ऑइल इंजिनाच्या गिरणीच्या आवाजासारखा हा आवाज लांबून ऐकू येतो. एका वेळी न थांबता हा नर 15 मिनिटे ओरडत राहतो. काही वेळा अधिक वेळ. विशेषतः ढगाळ हवा असेल तेव्हा दिवसा व रात्री पण हा पक्षी ओरडत राहतो. झुडपांच्या बुडाशी जमिनीवर कपासारखा आकार करून फांद्यांचे घरटे बांधतात. किंवा हे घरटे साधारणपणे जमिनीपासून पाच फूट किंवा 1/2 मीटर उंचीवर पाण्याजवळच्या एखाद्या झुडपात बांधतात. सायीच्या किंवा गुलबस पांढऱ्या रंगाची – 6 किंवा 7 – अंडी असतात. त्यांच्यावर तांबूस तपकिरी रंगाचे ठिपके व डाग असतात.

**जांभळी पाणकोंबडी (Purple Moorhen)** *(Porphyrio porphyrio)* – चित्रपत्र 7.38 – हिंदी : *कैम, खरीम* किंवा *कलीम.* गावठी कोंबडीच्या आकाराच्या ह्या पक्ष्याचा रंग जांभळट निळा असतो व पाय लांब, उघडे असून बोटे पण उघडीच असतात. उघडे तांबड्या रंगाचे कपाळ व त्याच्यापुढील लहान, जाड व तांबडी चोच आणि चालताना स्पष्ट दिसणारा उभारलेल्या शेपटीखालचा पांढरा डाग ह्या त्याला ओळखण्याच्या खुणा आहेत. वेताच्या वनामधील पाणथळ प्रदेशात ह्या पक्ष्यांचे विखुरलेले थवे आढळतात. अन्नशोधार्थ हा पक्षी

ह्या प्रदेशामध्ये वावरतो. काही वेळा तर वेळूच्या किंवा वेताच्या खोडावर चढताना हात डोक्यावर घेऊन चालल्यासारखा दिसतो. कमळाच्या पानांच्या आसपास किंवा पाणवनस्पतींच्या आसपास रेल पक्ष्याप्रमाणे रमतगमत जाताना तो दिसतो. धोक्याचे वेळी ते पळतात व उडण्याची त्यांची फारशी इच्छा नसते. अर्थात संकटाच्या वेळी ते उडूही शकतात. त्यांचे उड्डाण कष्टप्रद व कमजोर असते. एकदा उडाल्यानंतर मात्र त्यांना चांगला वेग घेता येतो व त्यावेळी आपले लांब पाय मागे खेचून ते जातात. भाताच्या व इतर वनस्पतींच्या कोवळ्या शाखा हेच त्यांचे अन्न. भातशेताचे ते बरेच नुकसान करतात परंतु हे नुकसान खाऊन होण्यापेक्षा भाताची रोपे त्यांच्या लांब बोटांनी तुडविल्यामुळे अधिक होते. काही वेळा हे पक्षी कीटक आणि गोगलगाई खातात. आपल्या वसतिस्थानामधून दिवसभर – विशेषत: ढगाळी हवेत – ह्या पक्ष्यांचा कर्कश 'हुरहुर कलकल' आवाज ऐकू येतो. विणीच्या हंगामात तर ह्यांचा कलकलाट अधिकच वाढतो. तोंडाने आवाज करीत, चोचीत धरलेला छोटा वेत मादीसमोर धरून, तिच्यापुढे वाकून नर आपली चमत्कारिक क्रीडा करीत असतो. पक्ष्यांच्या शिकारीमधील तज्ज्ञ शिकारी त्या पक्ष्याला क्रीडापक्षी समजत नाहीत. परंतु खेडेगावातील लोकांना ह्याचे मांस फार आवडते व म्हणूनच खेडेगावातील स्थानिक शिकारी नेहमी ह्या पक्ष्यांना मारण्याच्या मागे असतात. पाणथळ जागेवर खाली वेताचा विणलेला पाया करून त्यावर भाताची पाने जोडून एक जाडसर पॅड करून घरटे तयार होते. वेळेला – 4 ते 7 – अंडी घालतात. अंड्यांचा रंग सायीपासून तांबूस पिवळ्यापर्यंत कोणताही असतो व त्यावर तांबूस तपकिरी रंगाचे ठिपके व डाग असतात.

**सारंग पक्ष्यांपैकी** (Family OTIDIDAE) सर्वांत चित्तवेधक व महत्त्वाची जात म्हणजे **मोठा भारतीय सारंग किंवा माळढोक. (Great Indian Bustard)** *(Choriotis nigriceps)* – चित्रपत्र 6.29 – हिंदी : *तकदर* किंवा *हुक्ना*. गिधाडाच्या आकाराचा तीन फूट उंचीचा, तीस पौंड वजनाचा व जमिनीवर राहणारा हा पक्षी आहे. त्याला पाहिल्यावर छोट्या शहामृगाची आठवण येते. पायाला काटकोनात असणारे त्याचे आडवे शरीर ही त्याची खास खूण आहे. वरच्या अंगाची पिसे दाट बदामी रंगाची असून त्यांच्यावर काळ्या रंगाच्या कृमिगत रेषा असतात. खालच्या बाजूला पांढरा रंग आहे व छातीच्या आणि पोटाच्या सीमेवर एक एक काळा पट्टा आहे. पांढरी मान, काळे शीर्ष व विशेषत: उडताना दिसणारा पंखांच्या टोकावरचा पांढरा डाग ह्या खुणा त्याची ओळख पटवितात. मादी आकाराने लहान असते. हा पक्षी एकटा, जोडीने किंवा तिघांच्या गटाने तुरळक दिसतो. परंतु – 25 ते 30 – पक्ष्यांचे कळप पाहिल्याची नोंद पूर्वी करण्यात आलेली आहे. वाळवंटी प्रदेश, थोडेसे गवत किंवा इतर झुडपे असलेले वैराण प्रदेश अशा भागांत हे पक्षी असतात. हा पक्षी लाजाळू पण दक्ष आहे त्यामुळेच त्याच्याजवळ जाणे कठीण असते. बैल किंवा उंट ह्यांच्यासारख्या निरागस दिसणाऱ्या प्राण्यांच्या बरोबरीने लपून गेले तरच त्यांच्या सन्निध जाता येते. परंतु हे पक्षी मूर्खासारखे

शिकाऱ्यांच्या जीप गाड्यांबद्दल मात्र फारच बेसावध असतात व त्यामुळेच हे पक्षी कायद्याची अतिशय कडक बंधने असून देखील निर्वंश होण्याच्या मार्गावर होते. उड्डाण करतेवेळी ह्या पक्ष्याला जरा जडच जाते पण एकदा हवेवर आरूढ झाला म्हणजे हा पक्षी जरी फार उंचावरून प्रवास करीत नसला तरी वेळेला शेकडो किलोमीटर अंतर सहज काटतो. नाकतोडे, टोळ, कीटक,दाणे आणि निरनिराळ्या पिकांचे कोवळे अंकुर हे त्याचे अन्न आहे. सरडे,छोटे साप आणि गोम ह्यांसारखे प्राणीही तो खातो. 'हुक' अशासारखा आवाज काढून तो धोक्याचा इशारा देतो. एका नराचा अनेक मादींचा झनाना असतो. घशातून गंभीर आवाज काढीत हा एखाद्या टर्की कोंबड्याप्रमाणे झनान्यासमोर मोठ्या दिमाखाने खेळ करतो. एखाद्या झुडपाच्या बुडाशी उथळ खड्डा करून त्यात हे पक्षी नेहमी – 1 किंवा क्वचित 2 – अंडी घालतात. रंग फिकट ऑलिव्ह-तपकिरी असतो व त्याच्यावर गडद तपकिरी रंगाचे पुसट ठिपके असतात.

**टिट्टिभ गण** (Order CHARADRIIFORMES) ह्या गणात विविध प्रकारच्या जलपक्ष्यांच्या किंवा जलाशयाजवळ राहणाऱ्या पक्ष्यांच्या 13 कुलांचा समावेश करण्यात आला आहे. काही भारतवासी आहेत तर काही स्थलांतर करून भारतात येणारे पक्षी आहेत. जलकपोत (JACANANIDAE) कुलामधील दोन जाती आपल्याकडे सापडतात. **ब्राँझ पंखांचा जलकपोत (Bronze-winged Jacana)** *(Metopidius indicus)*– चित्रपत्र 7.37 – हा राखी चितूर पक्ष्याच्या आकाराचा पाणथळ पक्षी बराचसा पाणकोंबडीच्या वळणाचा आहे. त्याचे डोके, मान व छाती चकाकणाऱ्या काळ्या रंगाची असते. हिरवट ब्राँझ रंगाची पाठ आणि पंख व चेस्टनट तांबड्या रंगाचे भुंडे शेपूट असते. डोळ्याच्या पाठीमागून मानेपर्यंत गेलेली पांढरी पट्टी उठून दिसते आणि हा पक्षी जेव्हा लपून राहतो तेव्हा त्याच्या अस्तित्वाची हीच पट्टी चुगली करते. बालकपक्षी मुख्यतः पांढरे, तपकिरी व तांबूस असतात. त्यांची कोळ्यासारखी लांबलचक बोटे सर्व जलकपोतांमध्ये आढळतात. ह्या विशिष्ट ठेवणीमुळे त्यांना पाण्यावर तरंगणाऱ्या वनस्पतींवरून किंवा पानांवर आपले वजन फारसे पडू न देता सहज चालता येते. म्हणून त्यांचे अन्न अर्थातच पाण्यातले कीटक, शंख, शिंपले, जलवनस्पतींचे बी व मुळे हे असते. त्यांना ज्या ठिकाणी कोणी त्रास देत नाही त्या ठिकाणी ते धीट व पाळीव होतात. गावामधल्या पाणवठ्यावर पाणी भरणाऱ्या स्त्रियांच्या कलकलाटात किंवा धोब्यांच्या धुण्याच्या गडबडाटात हे पक्षी पुष्कळ वेळा निर्वेधपणे भटकतात. येथील दोन्ही जातींचे पक्षी उत्तम सूर मारणारे आणि वेळप्रसंगी पोहणारे आहेत. त्यांचे उडणे मात्र कमजोर असते. जोराने पंख हलवीत, मान लांब करून व अवजड पाय मागे लोंबकळत हे पक्षी उडतात. 'सीक-सीक-सीक' असा कर्कश व घरघरणारा आवाज हे पक्षी काढतात. विणीच्या हंगामात हे पक्षी भांडखोर होतात आणि फारच आवाज करतात. त्यावेळी ते कर्कश रे रे आवाज करतात ब्राँझ पंखाच्या जलकपोताची मादी वेळेला 4 अंडी घालते. अंड्यांचा रंग सुरेख ब्राँझ-तपकिरी

असतो, व त्यावर काळपट वेड्यावाकड्या रेघांचे जाळे असते.

**जलकपोत (Phesant-tailed Jacana)** (*Hydrophasianus Chirurgus)* हा भारतीय जातीचा दुसरा पक्षी पहिल्या पक्ष्यासारखाच असतो. एकाच जलाशयावर ह्या दोन्ही जाती पुष्कळ वेळा एकत्र सापडतात. त्याचा रंग पांढरा व चॉकलेट तपकिरी असतो. चोच लांब, टोकदार आणि कोयत्याच्या आकाराची असते म्हणून सहज वेगळा ओळखता येतो.

दोन्ही जातींमधील मादीचे अनेक सहचर असतात. एका नराबरोबर समागम करून ती अंडी घालून मोकळी होते. अंड्यांचे उबविणे व पिलांची निगा ही काम संपूर्णपणे ती नराच्या अंगावर टाकून दुसऱ्या नराकडे जाते. अशा रीतीने एकामागोमाग एक असे अनेक घरोबे ती करते. शिंगाडा किंवा इतर तरंगणाऱ्या वनस्पतींच्या पानांवर वेड्यावाकड्या फांद्यांचे माचेवजा घरटे बांधले जाते. ब्रॉंझ पंखाच्या जलकपोताची मादी वेळेला 4 अंडी घालते. अंड्यांचा रंग सुरेख ब्रॉंझ-तपकिरी असतो, व त्यावर काळपट वेड्यावाकड्या रेघांचे जाळे असते. फीझंट-टेल्ड जलकपोताच्या मादीची अंडी चकाकणाऱ्या स्वच्छ हिरवट ब्रॉंझ रंगाची अगर तांबूस तपकिरी रंगाची असतात.

**टिटवी (टिट्टिभ) कुलातील** (Family CHARADRIIDAE – टिट्टिभ, तुतवार इत्यादी) पुष्कळ प्रकारच्या जाती भारतवासी आहेत तर काही हिवाळ्यात उत्तरेकडून स्थलांतर करून येथे येतात.

**टिटवी (Red-wattled Lapwing)** (*Vanellus indicus)* – चित्रपत्र 7.39 – हिंदी : तितीरी किंवा तितुरी – ही भारतीय जात सर्वांच्या परिचयाची आहे, राखी चितूर पक्ष्याच्या आकाराचा हा पक्षी वरून ब्रॉंझ-तपकिरी, खालून पांढरा, छाती, डोके आणि मान काळी, व डोळ्याजवळ पुढे किरमिजी रंगाची मांसल गाठण (wattle) असणारा असतो. डोळ्यांमागून निघालेला पांढरा पट्टा खाली मानेवरून येऊन खालच्या पांढऱ्या भागाला मिळतो. माळरान, नांगरलेली शेते, चराऊ रान, ह्या प्रदेशामधील तळ्याजवळ असलेल्या ओलसर दमट भागात ह्या पक्ष्यांच्या जोड्या व तीनचार विखुरलेले गट असतात. छोट्या छोट्या उड्या मारीत टिटवीच्या विशिष्ट पद्धतीने चोचीने टिपत हे पक्षी फिरतात. चोच जमिनीकडे करून हे पक्षी भक्ष्य शोधतात. दिवसा व रात्री हे पक्षी चांगले जागे व उद्योगी असतात. ते अतिशय सावध राहतात व त्यामुळे त्यांच्या प्रांतात एखादा माणूस किंवा जनावर आले तर ते क्षुब्ध होऊन खळखळाट करून आवाज काढतात. 'डिड-यी-डू-इट' किंवा 'पिटी-टु-डू-इट' अशा प्रकारचा आवाज प्रसंगाप्रमाणे दोन वेळा किंवा अनेक वेळा काढतात. टिटवीचा हा आवाज सर्वश्रुत आहे. पिलांवर किंवा घरट्यावर संकट आले तर क्षुब्ध झालेली मातापिता आक्रमकाच्या डोक्याजवळून रागारागाने जोरात आवाज करीत व उडत त्याला मारण्याच्या पवित्र्याने झेप घेतात. पंखांची मुद्दाम हालचाल करून ते संथ उडतात. थोड्याच अंतरावर उतरून ते काही पावले पळत जातात. जमिनीवर केलेला उथळ खड्डा म्हणजे ह्यांचे घरटे. त्यात काही वेळा वाळूचे

दगड आढळतात. आटून गेलेली तळी व तापलेली निकस जमीन ही त्यांची घरटी बांधण्याची आवडती ठिकाणे. काही वेळा घरांच्या सपाट काँक्रीट छपरावर किंवा रुळालगतच्या दगडांमधूनही त्यांची घरटी असल्याची नोंद आहे. वेळेला – 3 किंवा 4 – अंडी घालतात. अंड्यांचा रंग राखट तपकिरी असून त्यावर काळपट रंगाचे ठिपके असतात. त्यांचा किंवा पिलांचा रंग सभोवतालच्या रंगाशी इतका जुळणारा असतो की आपल्याला अगदी जवळचा पक्षीसुद्धा ओळखू येत नाही.

**तुतवार (Common Sandpiper)** *(Tringa hypoleucos)* – चित्रपत्र 7.34 – हा उघड्या पायाचा, हडकुळ्या चोचीचा पक्षी दलदलीच्या प्रदेशात व जलाशयाच्या काठाने आढळतो. ह्या पक्ष्यांना इंग्रजीत 'स्निपेट्स' असे म्हणतात. दुर्लाव पक्ष्याच्या आकाराच्या ह्या पक्ष्याचे वरचे अंग राखट ऑलिव्ह-तपकिरी रंगाचे, खालचा भाग पांढऱ्या रंगाचा, छातीच्या बाजूला फिकट काळसर रंगाचा व मानेच्या पुढच्या बाजूला काळसर रंगाच्या रेघा असलेला असतो. उडताना शेपूट (कडेची पांढरी पिसे सोडून) व शरीराचा शेपटीकडील भाग तपकिरी रंगाचे दिसतात. पंखांवरील पांढरा पट्टा व वर निर्देश केलेले गुण ह्यांमुळे तो ठिपक्याचा तुतवार वुड सँडपायपर पक्ष्याहून वेगळा निवडता येतो. काश्मीर आणि गढवालमधून स्थलांतर करून इकडे सर्वांत लवकर येणारा व सर्वांत शेवटी परत जाणारा हा तुतवार पक्षी आहे. ज्या पक्ष्यांना प्रौढत्व आलेले नसते असे पक्षी मूळच्या जागी वर्षभर राहतात. त्या पक्ष्यांचे कळप सहसा नसतात. उलट ठिपक्यांचे तुतवार पक्षी कळपाने राहतात. जलाशयांच्या काठाकाठाने एकेकटा पक्षी अखंड पळताना दिसतो. त्यावेळी त्याची शेपटी एकसारखी हलत असते आणि आपली मान व डोके तो एकसारखे पुढे-मागे हलवीत असतो. त्याला चाळविले तर तो ताठ पंख थरथरावत उड्डाण करतो आणि पाण्याच्या पृष्ठभागालगत उडताना 'टी-टी-टी' असा आवाज काढतो. मोकळेपणाने विहार करताना ह्या पक्ष्याचे सुरेल, दमदार गाणे 'व्हीइट-व्हीइट' ह्या स्वरामध्ये एकसारखे म्हटलेले ऐकू येते. ते अन्न गोळा करण्यासाठी एकाच प्रदेशाला चिकटून राहतात. कीटक, शंख, शिंपले, किडे, अळ्या हे त्यांचे इतर तुतवार पक्ष्यांप्रमाणे अन्न असते. जोराने वाहणाऱ्या पाण्याच्या प्रवाहाच्या एका काठावर किंवा प्रवाहामधील छोट्याशा बेटावर उथळ खड्डा करून हे पक्षी घरटे तयार करतात. घरट्याला आतून पाने लावलेली असतात. वेळेला 4 अंडी घालतात. त्यांचा रंग पिवळसर बदामी किंवा दगडाच्या रंगासारखा असतो. त्यांवर तांबूस तपकिरी रंगाचे ठिपके व चट्टे असतात.

**ठिपक्यांचा तुतवार (Wood or Spotted Sandpiper)** *(Tringa glareola)* हा पक्षी तर सैबेरियामधून येथे हिवाळ्यात भेट देण्यास येतो. साध्या तुतवारपेक्षा मोठा आणि उडताना दिसणारी पांढरी शेपूट व तिच्याजवळचा पांढरा डाग ह्यांमुळे तो सहज ओळखता येतो. उडताना चिफ्-चिफ्-चिफ्-चिफ् असा कर्कश आवाज हा पक्षी करतो.

**लिटल रिंग्ड प्लवर (Little Ringed Plover)** *(Charadrius dubius)* – चित्रपत्र

7.35 – हिंदी : *झिरिआ* किंवा *मर्वा*.लावी (Quail) पक्ष्यापेक्षा जरा लहान असा हा पक्षी आहे. वरून वाळूच्या तपकिरी रंगाचा,खालून पांढरा,जाड गोल डोके,उघडे किडकिडीत पाय,छोटी व जाड कबुतरासारखी चोच असलेला हा पक्षी आहे.त्याचे कपाळ पांढरे,कपाळामागचे डोके, कानाच्या भोकावरील पिसे व डोळ्याभोवती काळा रंग असून गळ्यावरचा गोल काळा पट्टा तपकिरी पाठ मानेपासून वेगळी दर्शवितो. **केन्टिश प्लवर** *(C. alexandrinus)* ह्या पक्ष्यापासून हा पक्षी त्याच्या एकरंगी पंखांमुळे सहज वेगळा ओळखता येतो. जलाशयांच्या दमट काठांवर,नदीकिनारी हे पक्षी जोडीने किंवा विखुरलेल्या छोट्या कळपांमध्ये सापडतात. जमिनीवर धावताना उसळ्या मारीत व हळूहळू पावले टाकीत,वारंवार चोचीने इकडेतिकडे टिपत हे पक्षी फिरतात. हिंडताना शरीर खूप कलते करून ते जातात. त्यांना एक विशिष्ट खोड आहे. मऊसर चिखलात दडून बसलेले कीटक, नाकतोडे, आणि छोटे खेकडे बाहेर पडावेत म्हणून हे पक्षी आपली बोटे ढोलक्यावर बडविल्यासारखी चिखलावर बडवितात. चिखलामधील हे प्राणी म्हणजेच त्यांचे अन्न. त्यांच्या शरीराचा रंग सभोवतालच्या सृष्टिरंगाशी इतका मिळताजुळता असतो की ते जर स्तब्ध असतील तर त्यांना चटकन ओळखून काढता येत नाही. सर्वसाधारणपणे अन्नसाधनेचे वेळी हे पक्षी विखुरलेले असतात. परंतु जर एखाद्याला धोक्याचा इशारा मिळाला तर तो लगेच उड्डाण करतो आणि मग त्याच्या पाठोपाठ इतर सर्व उड्डाण करून एकत्र येतात. वेगाने एकत्र ऊडून जाताना ते एकमेकाशी लगटून उलट्या-सुलट्या उड्या मारताना दिसतात त्यावेळी त्या सर्वांचे खालचे अंग मधून मधून एकदम दिसत राहते. टोकदार पंखांच्या जलद उघडझापीने ते चांगलाच वेग घेतात. पण जमिनीच्या वर 4 ते 5 मीटर्स उंचीपलीकडे ते उड्डाण करीत नाहीत. नेहमीच 4 अंडी घालतात. ही अंडी नदीच्या पात्रामधील कोरड्या वालुकामय किनाऱ्यावर पातळ तक्तपोशीवर किंवा फळकुटावर घालतात. खुंटीच्या जाड टोकाच्या आकाराच्या ह्यांच्या अंड्यांचा रंग दगडासारख्या बदामी रंगापासून हिरवट राखी रंगापर्यंत कोणताही असतो व त्यावर गर्द तपकिरी आणि जांभळट रंगाचे ठिपके बरबटलेले असतात. त्यामुळे सभोवतालच्या परिस्थितीशी हा रंग इतका जुळतो की समजा जरी त्यांची जागा लांबून हेरून ठेवलेली असली तरी प्रत्यक्ष त्या जागी गेल्यावर ते चटकन सापडत नाहीत.

**पाणविक** कुलाचा (Family BURHINIDAE) प्रतिनिधी म्हणजे **चष्मेवाला प्लवर (Stone-Curlew or Goggle-eyed Plover)** *(Burhinus oedicnemus)* – चित्रपत्र 8.43 – हिंदी : *करवानक किंवा बर्सिरी*. प्लवरसारखेच हे पक्षी जमिनीवरील आहेत. अंगावर तपकिरी रेघा,राखी चितूरापेक्षा मोठा आणि लांब पायाचा हा पक्षी असून त्याचे डोके गोलाकार, 'जाड गुडघ्याचे' उघडे पिवळे पाय, आणि पिवळे 'चष्मेवाला' डोळे असतात,उडताना पंखांच्या वरच्या बाजूचे दोन अरुंद पांढरे पट्टे व टोकाच्या काळ्या पिसांच्या अग्रभागी असलेला पांढरा डाग, ह्या त्याला ओळखण्याच्या खुणा आहेत. नद्यांची कोरडी पात्रे, झुडपांचे माळरान,

नांगरलेली व ओसाड जमीन ह्या प्रदेशात हा चष्मेवाला प्लवर पक्षी ढाळतो. गावाच्या आसपास असलेल्या आमराईत किंवा पतझड जंगलातही हा पक्षी कधी कधी दिसतो. साधारणपणे जोडीने किंवा चारपाचच्या कळपाने हे राहतात. त्याच्या मोठ्या डोळ्यांनी सूचित केल्याप्रमाणे हा पक्षी रात्री व संधिप्रकाशात बाहेर पडतो. दिवसा तो अगदीच आळशी असतो. धोक्याची शंका आली किंवा इशारा मिळाला की हा पक्षी शरीराच्या पातळीत मान लांब करून, डोके खाली करून पटपट चालत जातो. नंतर एखाद्या झुडपाच्या बुंध्याशी बसून हा थिजून राहतो. अशा वेळी शरीर जमिनीवर चिकटून पसरतो व मान पुढे टेकून शत्रूची हालचाल निरखत राहतो. त्याच्या ह्या सवयीमुळे व त्याचा रंग सभोवतालच्या परिस्थितीशी विलक्षण जुळणारा असल्यामुळे जवळूनसुद्धा हा पक्षी चटकन ओळखता येत नाही. छोटे सरडे, कीटक, किडे, अळ्या, गोगलगाई हे प्राणी त्याचे अन्न आहेत. अन्न खाताना हा पक्षी बरोबर दगडही गिळतो. संध्याकाळी, पहाटे किंवा चांदण्या रात्रीत सर्व वेळ ह्या पक्ष्याचा आवाज ऐकू येतो. 'पिक्, पिक्, पिक् पिक्...पिक्-विक्, पिक्-विक्, पिक्-विक्' (दुसऱ्या भागावर जोर देऊन) अशा प्रकारची स्वच्छ, तीव्र व शिटीवजा किंकाळी हा पक्षी काढतो. हा आवाज जरी परिचित असला तरी तो ह्याच जातीच्या पक्ष्याचा आहे हे माहीत नसते. आंबराईत, नदीच्या कोरड्या पात्रात, दगडी जमिनीवर एखाद्या झुडपाच्या बुंध्याशी थोडेसे उकरून हा पक्षी घरटे तयार करतो. साधारणपणे वेळेला 2 अंडी घातली जातात. ती अंडी फिकट बदामीपासून ऑलिव्ह-हिरव्या रंगापर्यंत कोणत्याही रंगाची असतात. त्यांच्यावर तपकिरी किंवा जांभळट रंगाचे मोठे डाग असतात आणि पक्ष्याप्रमाणेच ही अंडीही सहसा दिसून येत नाहीत.

**वीचीकाक** कुलामधील (Family LARIDAE) कुरव (Gull) आणि नदीसुरय (Tern) हे पक्षी भारताच्या लांबलचक समुद्रकिनारी सापडतात. ह्यांपैकी काही भारतीय आहेत तर काही स्थलांतर करून भारताला भेट देणारे आहेत.

कुरव पक्षी नदीसुरय पक्ष्यापेक्षा बोजड आणि टोकदार पंखांचे असतात. आपल्याकडे नेहमी सापडणारी कुरव पक्ष्यांची जात म्हणजे **तपकिरी डोक्याचा कुरव (Brown-headed gull)** *(Larus brunnicephalus)* – चित्रपत्र 8.41 – हिंदी : *ढोमरा.* हा पक्षी डोमकावळ्यापेक्षा मोठा असतो. त्याचा रंग वरून गखो, खालून पांढरा असतो व उन्हाळ्यात त्याच्या डोक्याचा रंग कॉफीसारखा तपकिरी होतो. हिवाळ्यात जेव्हा ते येथे असतात तेव्हा डोके राखट पांढऱ्या रंगाचे असते व कधी कधी त्यावर कानामागे चंद्रकोरीच्या आकाराचा उभा काळा भाग असतो.

**काळ्या डोक्याचा कुरव (Black-headed gull)** *(L. ridibundus).* लहानसर पक्ष्याच्या पंखांच्या मुख्य काळ्या पिसांवर टोकाला 'आरशा' सारखा पांढरा डाग असतो तर ह्या कुरव पक्ष्याच्या पंखांच्या मुख्य पांढऱ्या पिसांवर शेवटी काळा डाग असतो व त्यांच्या कडा काळ्या असतात. दोन्ही जातीच्या पक्ष्यांच्या बालकांना पांढऱ्या शेपटीच्या टोकावर काळा

पट्टा असतो. विशेषतः समुद्रकिनारी हे दोन्ही पक्षी एकत्र आढळतात. हे कुरव पक्षी सप्टेंबर-ऑक्टोबर महिन्यांच्या सुमारास भारताच्या समुद्रकिनारी किंवा अंतर्गत जलाशयांच्या किनारी हिवाळ्यासाठी येतात आणि एप्रिलच्या शेवटापर्यंत बहुतेक सर्व परततात. समुद्रावरील बंदरे, गोद्या, खाडी, खेडेगाव ह्या भागांत हे पक्षी जहाजांवरील फेकून दिलेल्या अन्नासाठी नेहमी घिरट्या घालीत असतात. हेच त्यांचे अन्न. पण कोळी लोकांनी फेकून दिलेले मृत मासे खाण्यासाठी त्यांना ब्राह्मणी घार आणि साधी घार ह्या पक्ष्यांबरोबर चढाओढ करावी लागते. पाण्यावर झेप घेऊन हे पक्षी चोचीने तरंगणारे अन्न पकडतात आणि किनारी येऊन लाटांबरोबर बदकांसारखेच हेलकावत तरंगत राहतात. भूमीच्या अंतर्गत भागात ते कीटक, अळ्या आणि वनस्पती खाऊन राहतात. 'कीआह' अशा प्रकारचा त्यांचा घरघर कापणारा, कर्कश व पिरपिरा आवाज (डोमकावळ्याप्रमाणे) नेहमी ऐकू येतो.

भारताच्या सीमेत हा पक्षी समुद्रसपाटीपासून खूप ऊंचीवर असलेल्या लडाखमधील सरोवरात अंडी घालतो. दलदलीच्या भागातील छोट्या बेटांवर पाणवनस्पती एकत्र करून पेंडीसारखी घरटी हे पक्षी मोठ्या समूहाने एकत्र घालतात. वेळेला –2 किंवा 3 – अंडी घालतात. हिरवट पांढऱ्यापासून फिकट पिवळ्या बदामी रंगापर्यंत कोणत्याही रंगाची ही अंडी असतात. त्यांच्यावर तांबूस किंवा गडद तपकिरी रंगाचे मोठे चट्टे व वेड्यावाकड्या रेघा असतात.

नदीसुरय पक्ष्यांचे उत्तम उदाहरण म्हणजे **भारतीय नदीसुरय (Indian Whiskered Tern)** *(Chlidonias hybrida)* – चित्रपत्र 8.40 – हिंदी : *तेहारी, कूरी* (सर्व नदीसुरय). कबुतराच्या आकाराचा पण शेलाट्या अंगाचा हा पक्षी सुरेख रुपेरी राखी आणि रुपेरी पांढऱ्या रंगाचा असतो. त्याचे शेपूट किंचित दुभंगलेले (जवळ जवळ चौकोनी) असल्यामुळे त्यांना 'मार्श टर्न्स' असेही म्हणतात. चोच तांबडी किंवा काळपट तांबडी असते. पंख मिटवून बसल्यावर ते पंख शेपटीपेक्षा लांब असतात. विणीच्या हंगामात (उन्हाळ्यात) नर व मादी पक्ष्यांना एक काळी टोपी उगवते आणि पोट संपूर्ण काळ्याभोर रंगाचे असते. दलदलीच्या प्रदेशात, पाण्याने भरलेल्या भातशेतांमध्ये किंवा किनाऱ्यावरच्या गाळाच्या प्रदेशात हे पक्षी डौलाने उडताना दिसतात. त्यावेळी चोच व डोळे खालच्या प्रदेशाकडे झुकवून ते भक्ष्य शोधीत असतात. वाळवंटातील खेकडे, कीटक, बेडकाची पिले, लहान मासे पकडण्यासाठी वर्तुळाच्या स्पर्शिकेप्रमाणे (tangent) ते झेप घेतात. किनाऱ्यावर येणाऱ्या मासेमारी बोटींसाठी ते किनाऱ्यावरच रेंगाळतात व त्यांतून पडलेले छोटे छोटे मासे पकडतात. पायाची बोटे जरी पडद्याने जोडलेली असली व त्यांना जरी पोहता येत असले तरी ते क्वचित पाण्यावर उतरतात. आपला बहुतेक वेळ ते आकाशात घिरट्या घालीत किंवा अगदीच छोट्या पायांवर किनाऱ्याशी बसून काढतात. 'क्रीॲक' असा धारदार कर्कश आवाज ते उडताना काढतात. लांबून हा आवाज खाटिक पक्ष्यासारखा वाटतो.

**नदीसुरय (River Tern)** *(Sterna aurantia)* हा आणखी एक परिचित पक्षी. हा प्रामुख्याने नदीच्या आसपास सापडतो. हा सुद्धा राखी आणि पांढऱ्या रंगाचा असून त्याला

तपकिरी ठिपक्यांची टोपी असते.इतर सुरय पक्ष्यांपेक्षा जरा मोठा असा हा पक्षी असून त्याची चोच पिवळी असते व शेपूट पाकोळी-पक्ष्याप्रमाणे विभागलेली असते. विणीच्या हंगामात टोपी काळीभोर होते पण खालचे अंग पांढरेच राहते.

हा पक्षी उत्तर भारत व काश्मीर प्रदेशात अंडी घालतो. हा पक्षी सरोवरांच्या पाण्यावर तरंगणाऱ्या शिंगाडा व तत्सम वनस्पतींच्या पानांवर काटक्यांचे गोलाकार पेंडीसारखे घरटे बांधतो. वेळेला –2 किंवा 3 – अंडी घालतो. हिरवट रंगापासून निळसर किंवा तपकिरी रंगाची ही अंडी असतात व त्यावर गडद तपकिरी किंवा जांभळट तपकिरी रंगाचे चट्टे किंवा रेघा असतात.

**कपोत गण** (Order COLUMBIFORMES) आपल्याकडे यामधील दोन कुलांचे – **कृकल कुलातले** (Family PTEROCLIDAE) कृकल (Sandgrouse) आणि **कपोत कुलामधील** (Family COLUMBIDAE) पारवे आणि कबुतरे – हे पक्षी सापडतात. ह्या दोन्ही कुलांमधील पक्षी क्रीडेसाठी व अन्नासाठी फार लोकप्रिय आहेत. ते त्यांच्या पाणी पिण्याच्या पद्धतीबद्दल विशेष प्रसिद्ध आहेत. कोंबडी पाण्यात चोच बुडवून पाणी ओढून घेते व नंतर मान वर करून ते पाणी गिळून टाकते; पण हे पक्षी घोड्यासारखे पाणी पितात म्हणजे पाण्यात चोच बुडवून पाणी शोषीत राहतात. सँडग्राउज पक्षी बरेचसे कबुतरांसारखे आहेत पण त्यांची पिसे दाट तपकिरी रंगाची असतात. त्यांचे पाय आणि मान लहान असतात व टोकदार मध्यवर्ती पिसांची झालेली शेपटी निमुळती असते. निम-वाळवंटी प्रदेशात आणि नापिक जमिनीच्या प्रदेशात हे मोठ्या कळपात आढळतात. एका विशिष्ट वेळी ठराविक जागी पाणी पिण्यास येण्याची त्यांची सवय सर्वश्रुत आहे.

**भाट तीतर (Common Sandgrouse)** *(Pterocles exustus)* – चित्रपत्र 8.44 – हिंदी : भट तीतर, कबुतरापेक्षा आकाराने लहान असलेल्या ह्या पक्ष्याचा रंग समुद्रावरच्या वाळूसारखा पिवळट तपकिरी असतो, शेपूट टाचणीसारखे अणकुचीदार असते, छातीवर अरुंद काळा पट्टा आणि पोट तपकिरी काळे असते. गाल, हनुवटी आणि गळा फिकट पिवळ्या रंगाचे असतात. हनुवटीशिवाय इतर सर्व भागावर मादीच्या अंगावर रेघा, ठिपके आणि पट्टे असतात. तिच्या छातीवर काळा पट्टा असतो. आकाशात उडत असताना अणकुचीदार पंख व शेपटी आणि विशिष्ट प्रकारे काढलेला द्विरुक्त आवाज ह्या गुणांनी त्याला ताबडतोब ओळखता येतं. हे ओसाड किंवा रेताड जमिनीवर 12 किंवा अधिक संख्येच्या कळपात सापडतात. त्यांचा सर्वसाधारण रंग सभोवतालच्या प्रदेशाशी जुळणारा असल्यामुळे हे पक्षी बसले असताना सहज ओळखता येत नाहीत. नेहमी जरी हे पाण्यापासून दूर राहात असले तरी त्यांच्या ठराविक वेळी सकाळी व संध्याकाळी मोठ्या थव्याने तळ्यावर किंवा जलाशयावर आपली तहान भागविण्यासाठी येतात. ह्या त्यांच्या सवयीमुळे ते शिकाऱ्याचे आवडते क्रीडापक्षी आहेत.

त्यांचे उडणे दमदार आणि वेगवान असते. उडताना 'कुट-रो' असा स्पष्ट भेदक आवाज काढतात. आपल्या डोक्यावरून उडत असताना किंवा ते लांबून येताना दिसण्यापूर्वी हा विशिष्ट आवाज स्वच्छ ऐकू येतो. त्यांचे अन्न म्हणजे गवताचे बी, धान्ये आणि जमिनीवर घासून साफ केलेले वनस्पतींचे दांडे ह्यांचे असते. अन्नाबरोबरच ते पुष्कळशी रेव (दगड) पोटात घेतात. हे पक्षी आपली अंडी उघड्या जमिनीवर किंवा अती उथळ खड्ड्यात घालतात. वेळेला 3 अंडी घालतात. त्यांचा रंग फिकट राखी किंवा दगडासारखा पिवळट असतो. त्यावर तपकिरी रंगाचे असंख्य ठिपके व डाग पसरलेले असतात. पिलांच्या अंगावर संरक्षक पिसे असतात व अंड्यातून बाहेर आल्याबरोबर ही पिले धावू लागतात. नरपक्षी पाणी पिण्यास जातात त्यावेळी त्यांच्या पोटांवरील पिसे भिजून ओलीचिंब होतात. ह्या ओल्या पिसांनीच ते पिलांना पाणी पाजतात.

ज्याप्रमाणे बदक आणि टील (चक्रांग) पक्ष्यांमध्ये फारसा फरक नाही त्याचप्रमाणे **कपोत कुलामधील** कबुतर व पारवे ह्यांच्यामध्येही फारसा फरक करता येत नाही; कबुतर म्हणजे मोठा पारवा आणि पारवा म्हणजे छोटे कबुतर, कबुतरांचा एक प्रकार सर्वस्वी धान्य व फळे ह्यावर उपजीविका करणारा आहे व त्यांना हिरवी कबुतरे किंवा हिंदीमध्ये 'हरियल' असे म्हणतात.

**हरितालक (Common Green Pigeon)** *(Treron phoenicoptera)* – चित्रपत्र 9.46 – हा भारतात सापडणाऱ्या अनेक जातींच्या कबुतरापैकी सर्वत्र सापडणारा पक्षी आहे. पाळीव निळसर कबुतराच्या आकाराचा पण मजबूत बांध्याचा हा पक्षी आहे. त्याचा रंग पिवळा, ऑलिव्ह-हिरवा आणि राखट करडा असतो. खांद्यावर अस्मानी फिकट जांभळ्या रंगाचा डाग असतो – मादीमध्ये हा डाग विशेष उठावदार नसतो – व काळपट पंखांवर पिवळ्या रंगाचा स्पष्ट दिसणारा पट्टा असतो. त्याचे पिवळे (तांबडे नव्हे) पाय भारतामधील इतर कबुतरांपेक्षा वेगळे दिसतात व म्हणून त्याला ओळखणे सोपे असते. मोकळ्या किंवा दाट जंगलांच्या प्रदेशात, किंवा शहरांमधील उद्यानांमधून फळे देणाऱ्या वृक्षांवर, ह्या पक्ष्यांचे थवेच्या थवे आढळतात. हे कळप करून राहणारे पक्षी नेहमीच झाडांवर असतात आणि अगदी क्वचित ते जमिनीवर येतात. फळांनी लटकलेल्या फांद्यांवर हे पक्षी कुशलतेने चढतात व कित्येक वेळा स्वतःला उलटे टांगून घेऊन लांबचे फळ (केळ किंवा वडाचे फळ) तोडतात. धोक्याचा किंवा संकटाचा जरा संशय आला की हे जागच्या जागी 'थिजतात'. त्यांचा हिरवा रंग झाडावरच्या पानाच्या रंगाशी इतका बेमालूम जमतो की ते एवढ्या मोठ्या आकाराचे असून सुद्धा महज ओळखता येत नाहीत. त्यांनीच जर थोडी हालचाल केली तर मात्र त्यांचे अस्तित्व ते स्वतःच उघड करतात. गोळीचा आवाज ऐकून एखाद्या वडाच्या झाडावरून हे पक्षी जेव्हा एकदम उडतात तेव्हा त्यांची संख्या पाहून मन दिङ्मूढ (चकित) होते. कळपांचा बहुतांश दिवस झाडांवरील फळे गोळा करण्यातच जातो. फक्त मधूनमधून झाडांच्या उंच टोकांवरील फांद्यांवर बसून ते मधूनमधून विश्रांती घेतात. पर्णविरहित झाडांच्या टोकाच्या फांद्यांवर सकाळी व

संध्याकाळी पंख पसरवून सूर्यस्नान करताना हे पक्षी दिसतात. उडण्याचे वेळी ते झाडांवरून एकदम उडतात. दमदार व जलद उडण्याचे वेळी संपूर्णपणे फलाहारच करतात व त्यात विशेषतः वड, पिंपळ, उंबर, अंजीर अशा फळांचा समावेश बहुतांशी असतो. त्यांच्या शिटीचा आवाज मृदू आणि मंजुळ असून खालच्या सुरापासून वरच्या सुरापर्यंत तो फिरतो. त्या आवाजाला मानवी छटा असते. ह्यांचे घरटे पारव्यांप्रमाणेच काटक्यांचे माचेवजा रचलेले असते. वृक्षांच्या गर्द पर्णराजीत ही घरटी लपलेली असतात. ह्या कुलामधील इतर पक्ष्यांच्या नियमानुसार हरितालक नेहमीच न चुकता – 2 – अंडी घालतात. ती पांढरी स्वच्छ व चकाकणारी असतात.

**पारवा (Blue Rock Pigeon)** *(Columba livia)* – चित्रपत्र – 9.48 – हिंदी : *कबूतर*. दगडी पाटीसारख्या राखट रंगाचा हा पक्षी सर्वांना परिचित आहे. गळ्यावर आणि छातीवर हिरवा, जांभळा आणि किरमिजी ह्या रंगांची चमक असते. त्याशिवाय पंखांवर दोन आडवे पट्टे आणि शेपटीच्या टोकावर एक आडवा काळा पट्टा असतो. चिमणी आणि कावळा ह्यांच्याइतकाच हा रोजच्या परिचयाचा पक्षी आहे. ज्या रानटी जातीपासून आजच्या विविध प्रकारच्या पाळीव जाती निर्माण झाल्या आहेत त्या जातीचा पक्षी डोंगराळ भागातील माळरानांवर वसती करतो व शक्य तो दाट जंगले टाळतो. बहुतेक ठिकाणी हा पक्षी पाळीव जातीचाच झाला आहे. जवळजवळ भारताच्या प्रत्येक गावात पारव्यांची स्थानिक लोकवस्ती असते. हे पक्षी गावातल्या रहदारीला, गजबजाटाला आता पक्के रुळले असून इमारतींमध्ये राहात आणि वावरत ते मोठ्या कौतुकाचे आळशी जीवन व्यतीत करतात. गोदामे, कारखाने, मशिदी, रेल्वेस्थानके व मालाचे धक्के ही त्यांची राहण्याची आवडती ठिकाणे आणि त्यांच्या वास्तव्यामुळे ते ही ठिकाणे इतकी घाण करतात की त्यांचा अतिशय त्रासच होतो. पडक्या विहिरी, पडकी व ओसाड घरे, जुने मोडकळीस आलेले किल्ले व खडकांचे सुळके ह्या भागांत ह्या पक्ष्यांच्या रानटी टोळ्या राहतात. भातशेते, डाळींची शेते आणि शेंगदाण्यांची शेते ह्यांतील धान्य व दाणे खाण्याकरिता किंवा रुजलेले अंकुर खाण्यासाठी हे पक्षी आपल्या घरट्यापासून शेतापर्यंत एकसारख्या फेऱ्या मारीत असतात. त्यांचा आवाज सर्वश्रुत आहे. गुटर-गू, गूटर-गू असा खोल आवाज नरपक्षी गळा फुगवून काढतात. ह्यावेळी ते मादीसमोर लवून नंतर गोल गोल फेऱ्या मारतात. त्यांचे घरटे म्हणजे गवत आणि काटक्यांचे ओबडधोबड अस्तर असते. त्यांच्या कुळधर्माप्रमाणे हे पक्षी 2 अंडी घालतात आणि ती स्वच्छ पांढऱ्या रंगाची असतात.

**ठिपक्याचे कबुतर (Spotted Dove)** *(Streptopelia chinensis)* – चित्रपत्र 9.47 (वरचे चित्र) – हिंदी : चित्रोक *फाक्ता* किंवा *पर्की*. साळुंकी आणि पारवा ह्या पक्ष्यांच्या दरम्यानच्या आकाराचा हा पक्षी आहे. हा पक्षी म्हणजे शेलाट्या अंगाचा पारवाच आहे. त्याचा वरचा भाग गुलबस तपकिरी व राखी रंगाचा असून त्यावर मोठे पांढरे ठिपके असतात. मानेवर पाठीकडे काळ्या व पांढऱ्या ठिपक्यांचा बुद्धिबळाच्या पटासारखा भाग असतो. मोकळ्या

जंगलात, भरपूर पाण्याच्या प्रदेशात व शेतांच्या भागात हा पक्षी जोडीने किंवा छोट्या टोळक्यांनी राहतो. धुळीच्या रस्त्यांवर किंवा पिके कापलेल्या शेतात हा पक्षी दाणे टिपताना आढळतो. त्याला जर त्रास पोहोचला नाही तर तो लगेच पाळीव होतो व मग बंगल्यांच्या पडवीत किंवा वळचणीला घरटे बांधतो, बागेत हिंडतो व आसपासच्या वर्दळीमुळे जरासुद्धा विचलित होत नाही. 'क्रू-क्रूक-क्रक-क्रू. . .क्रू-क्रू-क्रू असा आवाज एकसारखा काढतो. क्रू क्रू हा आवाज निदान 3 ते 6 वेळा तरी परत परत काढतो. त्याचा आवाज जरी सुखकर वाटला तरी त्यात दु:खाची झाक असल्यासारखी वाटते. इमारतीच्या वळचणीला, झाडांच्या फांद्यांमध्ये हा पक्षी काटक्यांचे ओबडधोबड पॅडसारखे घरटे बांधतो. वेळेला – 2 – पांढरी शुभ्र अंडी हे पक्षी घालतात.

**तांबडा होला (Red Turtle Dove)** *(Streptopelia tranquebarica)* – चित्रपत्र 9.47 (अ) – हिंदी *सिरोती फाक्ता, गिर्वी फाक्ता* किंवा *इतवा.* साळुंकीपेक्षा आकाराने थोडा मोठा असा हा पक्षी आहे. नराच्या मानेवर फिकट तपकिरी राखी रंगाचा पट्टा असतो तर मादीचा हा गळपट्टा भडक गुलबस विटकरी-तांबड्या रंगाचा असतो. मादी **रानहोल्याची (Ring Dove** – हिंदी : *ढोर फाक्ता)* छोटी आवृत्ती वाटते. अर्धवट वाळवंटी प्रदेशात किंवा शेतांच्या भागात तांबड्या होल्याच्या टोळक्या भेटतात. जरी हा पक्षी सर्वत्र असतो तरी तो आपल्या खेडेगावच्या आसपास कमी प्रमाणात सापडतो. इतर जातींप्रमाणे हा मनुष्यवस्तीच्या जवळ नसतो. ग्र-गुर्र-गू, ग्र-गुर्र-गू असा वारंवार जरासा कर्कश आवाज हा पक्षी काढतो. जमिनीपासून 10 ते 20 फूट वा 3 ते 6 मीटर उंचीवर असलेल्या झाडाच्या फांदीत हा काटक्यांचे माचेवजा घरटे तयार करतो. घरट्याच्या विरळ रचनेतून त्यांनी घातलेली – 2 – पांढरी अंडी सहज दिसून येतात.

**शुक गण** (Order PSITTACIFORMES) ह्या गणात फक्त एकच **शुककुल** (Family PSITTACIDAE) आहे व त्यामध्ये सर्व प्रकारच्या पोपटांचा अंतर्भाव होतो. त्यांचे वैशिष्ट्य म्हणजे छोटी, जाड आणि जबरदस्त आकडीची (हुक) चोच, लहान पाय, दोन पुढे व दोन मागे असलेल्या बोटांची पावले. ह्या पावलांचा त्यांना चढण्यासाठी उपयोग होतो. ह्या सर्व पक्ष्यांचा रंग बहुतांशी हिरवा असतो पण हे पिकांचे व फळांचे अतिशय नुकसान करतात आणि म्हणून आर्थिक दृष्ट्या फारसे फायदेशीर नाहीत.

**पोपट (गुलाबी कंठाचा) (Rose-ringed Parakeet)** *(Psittacula krameri)* – चित्रपत्र 9.49 – हिंदी : *तोता* किंवा *लिबर तोता.* सर्वत्र आढळणारा हा पक्षी साळुंकीपेक्षा आकाराने जरा मोठा आणि लांब टोकदार शेपटीचा आहे. गवतासारख्या हिरव्या रंगाच्या ह्या पोपटाची चोच जाड, लहान, आकडीची आणि तांबड्या रंगाची असते. शिवाय त्याला काळा आणि रोजपिंक (गुलाबी) रंगाचा गळपट्टा किंवा कंठ असतो. कावळा, चिमणी, साळुंकी आणि

पारवा ह्या पक्ष्यांप्रमाणेच पोपटही अतिपरिचयाचा पक्षी आहे. शेतांच्या किंवा खेडेगावांच्या आसपास जेथे भरपूर अन्न उपलब्ध आहे अशा ठिकाणी ह्यांचे मोठाले कळप असतात. उभ्या पिकांचे दाणे खाणे व फळांच्या बागांमधील पिकावयास आलेली असंख्य फळे खाण्यापेक्षा टोकरूनच हे पक्षी शेतकऱ्यांचे अतिशय नुकसान करतात. धान्यांच्या व शेंगदाण्यांच्या पोत्यांना लटकून आपले आपले पोट यथेच्छ भरून घेणाऱ्या ह्या पक्ष्यांचे थवेच्या थवे आडबाजूच्या रेल्वेस्थानकावर नेहमी दृष्टीस पडतात. दाट लोकवस्तीच्या शहरांच्या सीमेवरील आमराईत ह्या पक्ष्यांच्या पलटणीच्या पलटणी रोज संध्याकाळी विलक्षण आवाज करीत निवाऱ्याकडे परतताना नेहमी दिसतात. स्वस्थ बसून अगर उडताना त्यांचा 'कीॲक, कीॲक, कीॲक' असा तीव्र किंकाळीवजा आवाज ऐकू येतो. हा पोपट किंवा लार्ज पॅरॅकीट (हिंदी : *राय तोता* किंवा *हिरामन तोता)* हा पक्षी, ह्या दोघांनाही पाळतात व त्यांना काही शब्द किंवा वाक्ये उच्चारण्यास शिकविता येते. सर्कशीमधील पोपटांना तोफ उडविण्यासही शिकविता येते. हे पक्षी गोलसर लंबगोल पांढरी – 4 ते 6 – अंडी घालतात. सुतारपक्ष्याच्या घरट्यात, कड्यांमधील भोकांमधून किंवा घरांच्या भिंतींमधील भोकांमधून हे पक्षी घरटी करतात. अनेक पक्ष्यांचा समूह एकत्रितपणे अंडी घालतो.

**अलेक्झांड्रिन पोपट (Large Indian or Alexandrine Parakeet)** *(Psittacula eupatria)* हा पक्षी आकाराने मोठा असल्यामुळे व त्याच्या जबरदस्त चोचीमुळे साध्या पोपटाहून वेगळा ओळखता येतो. नराच्या खांद्यावर मरून किंवा पिंगट किरमिजी रंगाचा छाप असतो. मादीला हा छाप व गुलाबी कंठ नसतो. हा बहुतांशी जंगलात सापडतो. दोन्ही जातींच्या पोपटांची पिले बाजारात विकावयास येतात.

**कोकिल** (किंवा परभृत) **गण** (Order CUCULIFORMES) जवळजवळ साऱ्या जगात पसरलेल्या कोकिळ पक्ष्यांचा हा गण आहे. दुसऱ्या पक्ष्यांच्या घरट्यांमधून आपली अंडी घालून ती उबविण्याची व पिलांना वाढविण्याची जबाबदारी दुसऱ्यावर घुसडणाऱ्या ह्या पक्ष्यांची जुन्या जगात कुप्रसिद्धी आहे. अशा परजीवी (Parasitic) पक्ष्यांमधील युरोपियन कोकिळ *(Cuculus canorus)* हा पक्षी काश्मीर आणि पश्चिम हिमालयाच्या प्रदेशात वास्तव्य करतो. आसाममध्ये ह्याच पक्ष्याची स्थानिक जात सापडते. परंतु ह्या भूखंडात नेहमी आढळून येणारा पक्षी म्हणजे **कोकिळ (Koel)** *(Eudynamys scolopacea)* – चित्रपत्र 10.51 – हिंदी : *कोएल.* कावळ्याचा आकाराचा हा पक्षी जरासा बारीक असून त्याची शेपटी लांब असते. नराचा सर्वसाधारण रंग चकाकित काळा असतो, चोच पिवळट हिरवी असते व डोळे किरमिजी किंवा रक्तासारखे लाल असतात. मादी तपकिरी रंगाची असून अंगावर पांढरे चट्टे व ठिपके असतात. कोकिळ जरी सर्वत्र सापडतो तरी हा पक्षी दिसून माहीत असण्यापेक्षा त्याच्या गायनानेच अधिक परिचित आहे. हा पक्षी नेहमीच झाडावर असतो व तो जमिनीवर

कधीही उतरत नाही. हिवाळ्यात त्याला कंठ फुटलेला नसतो व त्यामुळे त्याच्याकडे लक्ष जात नाही आणि म्हणूनच त्याने स्थलांतर केले असावे असा समज होतो. उन्हाळ्याच्या सुमारास त्याच्या विणीच्या हंगामात त्याला आवाज फुटतो आणि मग तो खूपच गोंगाट करतो. उन्हाळ्यात नराचा कर्कश व मोठा 'कुऊ, कुऊ, कुऊ' असा आवाज आसमंतात दिवसा व रात्री घुमत राहतो. सुरवातीला त्यांचा कुऊ आवाज खालच्या पट्टीतला असतो. नंतर आवाज वरच्या पट्टीत जात जात सातव्या किंवा आठव्या वेळी इतका उंच आणि कर्कश होतो की तो फुटतो व थांबतो. लगेच हे गाणे पुन्हा पुन्हा सुरू होते व हा प्रकार कंटाळा येईपर्यंत चालू राहतो. हिंदी साहित्यात कोकिळेच्या गाण्याला फार मान आहे. थोडा वेळ ऐकण्यास हे गाणे आल्हाददायक आहे. पण लवकरच ते कंटाळवाणे होते आणि त्याचा इतका त्रास होतो की डोके भणाणून जाते. म्हणूनच ह्या पक्ष्याला ब्रेनफीव्हर (तापदायक) पक्षी असे म्हणतात. वास्तविक हे नाव पपीहा किंवा हॉक-कोकिळेचे आहे. कोकिळा गाऊ शकत नाही. ती फक्त झाडांवरून इकडेतिकडे उडताना किक्-किक्-किक् असा आवाज करते. केळी, वडाची फळे, इतर रसाळ फळे आणि केसाळ सुरंवट हे त्यांचे अन्न. साधा कावळा व डोमकावळा ह्यांच्या बरोबरीनेच कोकिळ पक्ष्यांचा विणीचा हंगाम सुरू होतो. कोकिळ स्वतःचे घरटे कधीच बांधत नाही. कावळ्याच्या घरट्यात आपली अंडी घालून ती उबविण्याची व पिलांना वाढविण्याची जबाबदारी कावळ्यावर टाकून हा पक्षी मोकळा होतो. फिकट हिरवट रंगाची व तांबूस तपकिरी ठिपक्यांची अंडी कावळ्यांच्या अनेक घरट्यांमधून घातली जातात. अंडी कावळ्याच्या अंड्यासारखीच पण आकाराने लहान असतात.

**भारद्वाज (Crow-pheasant or Coucal)** *(Centropus sinensis)* – चित्रपत्र 10.53 – हिंदी : *महोका* किंवा *कुका*. स्वतंत्रपणे घरटे बांधून पिलाची निगा करणारा असा हा एक स्वावलंबी पक्षी आहे. ह्याचा आकार डोमकावळ्याएवढा असतो. हा जरा चमत्कारिक पण मोठा रंगतदार पक्षी आहे. पाठ काळी कुळकुळीत, चकाकणारी, चेस्टनट रंगाचे पंख, लांब रुंद रेखांकित चोच ही त्याची वैशिष्ट्ये आहेत. छोटी झाडे, झुडपे व मधून मधून उंच गवत असलेल्या माळरानात हा पक्षी सापडतो. काही वेळा गावांजवळही हा असतो. हा नेहमीच जमिनीवर असतो. शेपटी फरफटत व मधूनमधून पंखांची उघडझाप करून किड्यांना उठावीत हा पक्षी झुडपांमधून हिंडत असतो. मोकळेपणाने उद्यानांमधून वावरतो. हा नेहमीच जमिनीवर असतो. अन्नासाठी हा काही वेळा झाडांवर चढतो व ह्या फांदीतून त्या फांदीत त्वरित उड्या मारीत असतो. 'ऊक' असा खर्जामधला आवाज नियमितपणे तो काढीत असतो. विशेषतः उन्हाळ्यात (गरम हवामानात) हा आवाज लांबवर ऐकू येतो. काही वेळा 'कूप-कूप-कूप-कूप' असा वेगळा आवाजही हा पक्षी करतो. वेळेला – 6 किंवा 7 – तर कधी 20 वेळापर्यंत हा आवाज निघतो. एका सेकंदात 2 किंवा 3 वेळा 'कूप' असा आवाजाचा वेग असतो. त्याला लगेच लांबच्या दुसऱ्या पक्ष्याची जोड मिळते आणि हे अनियमित द्वंद्वगीत चालू राहते. काही वेळा क्रॅव, क्लक अशा निरनिराळ्या आवाजांची भेसळ असलेले गाणेही हा पक्षी गातो. विणीच्या हंगामात नर

मादीसमोर विलक्षण क्रीडा करतो. पिसे फुलवून, शेपटी हलवून व पंख खाली टाकून नर मादीसमोर दिमाखाने नाचतो. भारद्वाजाचे उडणे हळू, कष्टप्रद व थोड्या अंतराचे असते. नाकतोडे, इतर मोठाले कीटक, शेतातले उंदीर, सरडे आणि छोटे साप हे त्याचे अन्न. लहान पक्ष्यांच्या घरट्यात शिरून त्यांची अंडी व पिले खराब करणे किंवा खाऊन टाकणे हा त्याचा छंद आहे. त्यासाठी तो अतिशय काळजीपूर्वक झुडपांमधून घरटी शोधीत हिंडतो. श्वासनलिकेच्या रोगावर उपाय म्हणून भारद्वाजाचे मांस औषधासारखे वापरणारे वैदू आहेत. कोकिळ पक्ष्याप्रमाणे हा पक्षी दुसऱ्याच्या घरट्यांवर अवलंबून राहणारा नसून स्वतंत्रपणे घरटे बांधतो. पाने आणि काटक्या ह्यांचा गोलसर आकार करून हा पक्षी काटेरी झाडांच्या बुंध्याजवळ घरटे बांधतो. घरट्याला बाजूने एक दार असते. खडूसारख्या पृष्ठभागाची स्वच्छ पांढरी –3 किंवा 4 - अंडी हा पक्षी घालतो.

**उलूक गण** (Order STRIGIFORMES) म्हणजे घुबड. ह्या गणामध्ये **श्वेतोलूक कुल** (Family TYTONINAE) (पांढऱ्या तोंडाचे घुबड, Barn Owl) आणि **उलूक कुल** (Family STRIGIDAE) (घुबड) ह्या दोन कुलांमधील पक्ष्यांचा अंतर्भाव होतो. पहिल्या कुलामधील पक्ष्यांचा तोंडावळा माकडाप्रमाणे चिमटलेल्या थाळीवजा चेहऱ्यासारखा असून हे पक्षी जगभर पांढऱ्या तोंडाचे घुबड *(Tyto alba)* म्हणून माहीत आहेत. खऱ्या घुबडाचे डोके मोठे व गोलाकार असते आणि त्याचे डोळे मोठे व गोल असून भेदक नजरेचे असतात. काही जातींमध्ये डोळ्याच्या वरच्या बाजूला शिंगासारखी दिसणारी पिसे असतात.

**पिंगळा (Spotted Owlet)** *(Athene brama)* – चित्रपत्र 10.50 – हिंदी : खुसाटिआ, किंवा छुघड. हा आपल्याकडे नेहमी आढळणारा पक्षी आहे. साळुंकीच्या आकाराच्या ह्या पक्ष्याचा बांधा बसकट असतो शरीराची वरची बाजू राखट उदी (तपकिरी) असून त्यावर पांढरे ठिपके असतात. डोके मोठे व वाटोळे असून पुढे झुकलेले पण वटारलेले डोळे असतात. माळरानात व डोंगराळ भागाच्या पायथ्याशी असलेल्या प्रदेशात हा पक्षी वास्तव्य करतो पण शहरातून सुद्धा तो मोठ्या संख्येने अगदी पाळीव अवस्थेतही सापडतो. जुना वड आंबा ह्या सारख्या वृक्षांच्या ढोलीमधून अगर मोठाल्या फटींमधून ह्या पक्ष्यांची जोडपी राहतात. ह्या झाडांच्या बुंध्यावर जर आघात केला तर ढोलीमधून फटींमधून बाहेर डोकावणारा ह्या पक्ष्याचा प्रश्नांकित चेहरा दिसतो, किंवा धक्क्यामुळे एका बाजूच्या फांदीवर बसलेले जोडपे हटकून उडावयास लागते. मग हे जोडपे आवाज करीत दुसऱ्या फांदीवर उडून बसते आणि वटारलेल्या डोळ्यांनी ह्या आगंतुक पाहुण्याकडे विदूषकासारखे रोखून बघत राहते. अशा वेळी काही वेळा ते आपले डोके स्क्रूसारखे गोल फिरवितात. हे पक्षी बहुतांशी निशाचर आहेत. दिवसभर ते लपून राहतात व संध्याकाळी बाहेर पडतात. संध्याकाळच्या वेळी हे पक्षी पुष्कळदा कुंपणांच्या खांबांवर, तारायंत्रांच्या तारांवर किंवा कुंपणांच्या तारांवर बसलेले आढळतात. कीटक,

नाकतोडे, टोळ ह्यांसारख्या प्राण्यांवर झडप घालताना किंवा ह्या ठिकाणाहून त्या ठिकाणाकडे जाताना त्यांची गडबड नेहमी दिसते. पंख फुटलेले वाळवीचे किडे जेव्हा दमट जमिनीतून बाहेर पडतात तेव्हा किंवा रस्त्यावरच्या दिव्याभोवती जमणारे कीटक येतात तेव्हा हे पक्षी त्यांच्यावर हल्ला करून त्यांना पकडतात, फांदीवर परत येऊन आपल्या नखांनी भक्ष्याला फाडून काढतात व नंतर पोपटाप्रमाणे पंजाने तो किडा तोंडात घालतात छोट्या बहिरीससाण्याप्रमाणे जमिनीवर सरपटत जाणाऱ्या भक्ष्याची ते टेहळणी करीत असतात. अन्नामध्ये भुंगे व इतर किडे, सरडे, उंदरांची पिले, चिचुंद्रा आणि छोटे पक्षी ह्यांचा अंतर्भाव होतो. पिंगळा हा फार आवाज करणारा पक्षी आहे. त्याचा आवाज म्हणजे कर्कश, कलकल व गोंधळ असतो. पुष्कळ वेळा दोघेजण एकमेकाला साद घालीत बेसूर द्वंद्वगीत म्हणत असतात झाडांच्या ढोलीत किंवा घरांच्या (पडक्या किंवा राहत्या) भोकांमधून विरळ गवत व पिसे लावलेले घरटे हे पक्षी तयार करतात. त्यात – 3 किंवा 4 – पांढरी गोलसर अंडी घातली जातात.

**शृंगी उलूक** किंवा **शिंगवाले घुबड (Great Horned Owl)** *(Bubo bubo)* - चित्रपत्र 10.52 – हिंदी : घुघु. हा घारीएवढा पक्षी असून तिच्यापेक्षा अधिक बळकट असतो. त्याचा रंग गर्द तपकिरी असतो आणि अंगावर बदामी व काळ्या रंगाचे ठिपके आणि रेघा असतात. डोक्यावर दोन्ही बाजूंना काळ्या पिसांचा एकेक झुपका असतो. हे झुपके शिंगासारखे दिसतात. **तपकिरी मत्स्य घुबड (Brown Fish Owl)** *(Bubo zeylonensis)* ह्या पक्ष्याबरोबर शृंगी उलूकाचा घोटाळा होण्याचा संभव असतो. शृंगी उलूक फिकट तांबूस रंगाचा असून साधारण पिवळट तपकिरी असतो, आणि पायावर पिसे असतात. मत्स्य घुबड ह्या पक्ष्याचे पाय उघडे असतात. नदीच्या किनाऱ्यावर झुकलेल्या खडकावर किंवा झुडपाच्या आश्रयाने शृंगी उलूक आपला दिवसाचा वेळ घालवितो. मत्स्य घुबडाप्रमाणे हा संपूर्ण निशाचर नाही, कारण तो दिवसाढवळ्यासुद्धा हिंडताना दिसतो. साधारणपणे रोज संध्याकाळच्या सुमारास हे पक्षी निवाऱ्यातून बाहेर पडतात त्यावेळी ते 'बे-बो' (लांबलेला) असा खोल, गंभीर घुमणारा आवाज काढतात. आवाज तसा मोठा नसतो परंतु तो भेदक आणि लांब पल्ल्याचा असतो. संध्याकाळचे वेळी ते एखाद्या वेळी खडकावर बसलेले दिसतात व तेथून ते सहज तरंगत जाताना दिसतात त्यांच्या भक्ष्यस्थानी जाण्यासाठी ते बरेच वेळा लांब अंतर काटून जातात. त्यांच्या नेहमीच्या आवाजाखेरीज ते नाना प्रकारचे घोगरे आणि किचकिचाट करणारे आवाज भावनेच्या उद्रेकात काढतात. शृंगी उलूकाचे अन्न म्हणजे छोटे सस्तन प्राणी, पक्षी, सरडे इत्यादी. प्रसंगोपात्त ते किडे, खेकडे आणि मासेसुद्धा खातात. शेतीवाडीमधील त्रासदायक उंदीर आणि चिचुंद्रा यांसारखे प्राणी खाऊन ते एक प्रकारे मानवाला मदतच करतात. त्यांच्या ह्या कृत्यामुळे अशा उपकारी पक्ष्यांचे संरक्षण कडक रीतीने होणे जरूर आहे. खडकांच्या सुळक्यांमधील भेगांमधून, जमिनीवर किंवा नदीच्या किनाऱ्यावर हे पक्षी अंडी घालतात. वेळेला –3 किंवा 4 – गोलसर लंबगोल व सायीसारखी पांढऱ्या रंगाची अंडी हे पक्षी घालतात.

**छिप्पिका गण** (Order CAPRIMULGIFORMES) ह्या गणामधील दोन कुलाचे पक्षी भारतात सापडतात. त्यांपैकी आपला ज्याच्याशी अधिक संबंध येतो तो पक्षी म्हणजे **छिप्पिका कुलातील** (Family CAPRIMULGIDAE) रात्रिंचर (Nightjar) पक्षी. ह्या पक्ष्यांना 'मेंढीशोषक' (Goat-sucker) असेही म्हणतात. ह्या निशाचर पक्ष्यांचा रंग घुबडांप्रमाणेच सभोवतालच्या वातावरणात छपणारा असतो. लहान आणि हडकुळे पाय असलेल्या ह्या पक्ष्याची रुंद जिवणी संधिप्रकाशात हिंडणाऱ्या कीटकांना पकडण्यासाठी खूप मोठी असते. चोचीच्या बाजूला असलेली ताठ व राठ पिसे जिवणीची व्याप्ती आणखी वाढवितात.

**भारतीय रात्रिंचर (Indian Nightjar)** *(Caprimulgus asiaticus)* – चित्रपत्र 10.54 – हिंदी : *छिपाक* किंवा *डाब चिरी*. आपल्याकडे ह्या छिप्पिका पक्ष्यांच्या ज्या अनेक जाती सापडतात त्यांपैकी रात्रिंचर पक्षी सर्वत्र जास्तकरून आढळतो. साळुंकीच्या आकाराच्या ह्या पक्ष्याचा रंग फिकट राखी, तपकिरी, बदामी आणि पिंगट असून त्यावर काळ्या रेषा आणि रंगीबेरंगी ठिपके असतात. त्यामुळे सभोवतालच्या परिस्थितीशी तो एकरूप होऊन जातो. उडताना पंखांवरचे पांढरे डाग स्पष्ट दिसतात. हा पक्षी एकट्यानेच दिवसा झुडुपांच्या प्रदेशात वाकून फिरत असतो. संध्याकाळचे वेळी हा किडे शोधीत हिंडत असतो किंवा कच्च्या सडकेजवळ बसून राहतो. सर्व प्रकारचे कीटक हेच त्याचे अन्न. कीटकांना उडताना हा पक्षी आपल्या भल्या मोठ्या जिवणीने पकडतो. त्याचे उडणे निःशब्द कीटकांसारखे इकडे तिकडे भटकत जाणारे असते. पण किडे पकडण्यासाठी हा पक्षी जलद वळू शकतो, व मग फिरक्या मारीत, पंख फडफडावीत, तरंगत हा कीटकांचा पाठलाग करतो. रस्त्यालगत बसलेल्या पक्ष्यांवर मोटारीच्या प्रकाशाचा झोत पडला म्हणजे ह्याचे डोळे माणकासारखे चकाकतात. अंगावर जर एखादे वाहन आले तर त्यातून ते सहज सुटका करून घेतात. 'चक्-चक्-चक्-चक्-र-र-र' हा त्यांचा आवाज परिचित आहे व तो आवाज बर्फावरून घरंगळत जाणाऱ्या दगडाच्या आवाजासारखा वाटतो. एखाद्या उंचवट्यावरून किंवा झाडावरून किंवा जमिनीवरून हा पक्षी संध्याकाळी जो आवाज काढण्यास सुरवात करतो तो सारी रात्र काढीत राहतो. एकमेकांपासून थोड्या अंतरावर असणारे दोन पक्षी एकमेकांना साद-प्रतिसाद देत दीर्घकाल द्वंद्वगीत गात बसतात. विणीच्या हंगामात व त्यातूनही चांदण्या रात्री हे पक्षी फारच आवाज करतात. हे पक्षी घरटी बांधत नाहीत. विरळ झुडुपांच्या जंगलात जमिनीवर हे पक्षी वेळेला – 2 – अंडी घालतात. अंडी लांबट चिंचोळी लंबगोल असतात. त्यांचा रंग फिकट गुलाबीपासून तांबूस पिवळट रंगापर्यंत कोणताही असतो. त्यावर तांबूस तपकिरी शाईसारख्या जांभळ्या रंगाचे ठिपके व चट्टे असतात.

**दुर्बल गण** (Order APODIFORMES) – दुर्बल (Swift) किंवा पांगळी पक्ष्यांचा गण. शेलाट्या व सुवाही (Streamlined) शरीराच्या ह्या दुर्बल पक्ष्यांचे पंख अतिशय वेगाने

उडण्यासाठी लांब, निमुळते व धनुष्याकृती असतात. आपल्या रुंद जिवणींच्या साहाय्याने नाना प्रकारचे किडे पकडण्यासाठी दिवसभर ते बहुतेक उडतच राहतात. त्यांच्या छोट्या पायाची चारही बोटे पुढच्या बाजूस असतात, त्यामुळे त्यांना चिमण्यांप्रमाणे तारांवर बसता येत नाही. म्हणून हे पक्षी भिंतींवर किंवा उभ्या पृष्ठभागांवर आपली सुईसारखी नखे घट्ट रोवून चिकटून किंवा लटकून राहतात.

**दुर्बल (House Swift)** *(Apus affnis)* – चित्रपत्र 11.55 – हिंदी : *बाबिला* किंवा *बतासी*. हा **ॲपोडिडी कुलाचा** (Family APODIDAE) प्रतिनिधी. चिमणीपेक्षा लहान असलेल्या ह्या पक्ष्याचा रंग धुरकट काळा असतो. गळा व ढुंगणाचा भाग पांढरा; आखूड चौकोनी शेपटी आणि लांब व निमुळते पंख. जुनाट किल्ले, पडक्या मशिदी, देवळे व इमारती ह्या ठिकाणी हा पक्षी राहतो. दिवसभर उडत्या किड्यांना शोधीत व वटवट करीत हे पक्षी उडत राहतात. सुवाही लांब पंखांमुळे त्यांना दीर्घकाल जलद वेगाने उडता येते. मनुष्यवस्तीच्या आसपास त्यांचे विस्कळीत जमाव संध्याकाळभर गमतीने उडत, एकसारखी कर्कश चिवचिव करीत व स्वतःची करमणूक करून घेताना आढळतात. भिंतींचे कोपरे, पुलांच्या कमानी, घुमट, छते ह्यांवर वाटीच्या आकाराची, गवत व मऊ पिसे लाळेने आतून चिकटवून काटक्यांनी बांधलेली घरटी लटकताना आढळतात. भिंतीच्या आणि घरट्याच्या मधली फट म्हणजे घरट्याचे प्रवेशद्वार, घरटी एखाद्या गजबजलेल्या शहरामधूनही आढळतात. हे पक्षी जमावाने एकत्र राहात असल्यामुळे बरीच घरटी एके ठिकाणी आढळतात. लांबट लंबगोल आकाराची दोन-चार पांढरी अंडी एके वेळी घालतात. त्यांच्या घरट्यांना जर धक्का पोहोचला नाही तर त्यांच्या घरट्यांच्या जागा पिढ्यानपिढ्या त्याच राहून वंशपरंपरागत होतात.

**नीलकंठ गण** (Order CORACIIFORMES) ह्या गणात **मीनरंक (खंड्या) कुल** (Family ALCEDINIDAE), **शार्ङ्ग कुल** (MEROPIDAE), **वेडा राघू, पुत्रप्रिय कुल** (CORACIIDAE) (चाष, नीलकंठ), **प्रियात्मज कुल** (BUCEROTIDAE) (शिंगचोचा, धनचिडी) UPUPIDAE (सुतार-हुप्पो) ह्यांचा समावेश होतो.

**खंड्या (Small Blue Kingfisher)** *(Alcedo atthis)* – चित्रपत्र 11.57 – हिंदी : छोटा किलकिला किंवा *शरीफन. हा* पक्षी चिमणीपेक्षा मोठा असतो. त्याचा रंग सुबक निळा व हिरवा असतो; गंजासारख्या रंगाचा खालचा भाग; आखूड शेपूट; आणि लांब, सरळ निमुळती चोच. नदी, ओढे व जलाशय ह्यांच्या आसपास हा पक्षी एकट्यानेच पाण्यावरून फेऱ्या मारीत आढळतो. काही वेळा खडकाळ समुद्रकिनारीसुद्धा हा पक्षी असतो.

एखाद्या झाडाच्या पाण्यालगतच्या फांदीवर बसून एकसारखे आपले डोके वरखाली, इकडेतिकडे हलवीत व त्याचवेळी क्लिक् असा आवाज करीत शेपटी उडवीत असतो. ह्यावेळी तो कायम पाण्याच्या पृष्ठभागावर येणाऱ्या माशांची व बेडकाच्या पिलांची टेहळणी करीत

असतो. पाण्यात जरा हालचाल दिसली की हा पक्षी तीरासारखा त्या ठिकाणी जातो व पाण्याखाली जाऊन आपले भक्ष्य चोचीत आडवे घट्ट पकडून फांदीवर परत येतो. तेथे त्या भक्ष्याचा चेंदामेंदा करून ते खाऊन टाकतो. पाण्यावर उडत असताना भक्ष्य पकडण्यासाठी तो जी झेप घेतो ती पाहण्यासारखी असते. खंड्या पक्षी ह्याचकरिता प्रसिद्ध आहे. उडताना हा पक्षी 'चिची-चिची' असा तीव्र आवाज काढतो. मासे व बेडकाची पिले ह्यांखेरीज जलकीटक व त्यांच्या अळ्या हे सुद्धा तो खातो. ओढ्याचे किनारे, जलाशय, पाणथळ खड्डे ह्या ठिकाणी हा पक्षी आपले घरटे बांधतो. त्याचे घरटे म्हणजे मीटर-दोन-मीटर लांबीचा आडवा खणलेला बोगदा असतो व त्याच्या शेवटी अंड्यांसाठी रुंद भाग असतो. किड्यांचे पंख, माशांची हाडे ह्यांसारखे पदार्थ घरट्यात असतात. तकतकीत पांढऱ्या रंगाची गोलट लंबगोल – 5 ते 7 – अंडी हे पक्षी घालतात.

आणखी एक परिचित जात म्हणजे **पांढऱ्या छातीचा खंड्या (White-breasted kingfisher)** *(Halcyon smyrnensis)*. हा पक्षी जमिनीवरचे किडे खात असल्यामुळे पाण्यावर फारसा अवलंबून नसतो. मैनेच्या आकाराच्या ह्या पक्ष्याचा रंग वरून टरकॉइज निळा असतो. डोके, मान व खालचा भाग गर्द चॉकोलेटी तपकिरी रंगाचे असतात. छातीच्या भागात 'शर्ट' सारखा पांढरा भाग, लांब जड व टोकदार चोच त्याची ओळख ताबडतोब पटवून देते. काळ्या पंखावरचा मोठा पांढरा डाग उडताना स्पष्ट दिसतो.

**शबल मीनरंक (Pied Kingfisher)** *(Ceryle rudis)* – चित्रपत्र 11.60 – हिंदी : *कोरियाला किलकिला* किंवा *करोना*. ताबडतोब ध्यानात येणारा हा पक्षी. साळुंकी आणि पारवा ह्यांच्या दरम्यानच्या आकाराचा आहे. पांढऱ्या व काळ्या पिसांच्या ठिपक्यांचे व पट्ट्यांचे अंग असलेल्या ह्या पक्ष्याची जाड चोच खंजिरासारखी असते. मादी (चित्रात दाखविलेली) व नर जवळजवळ सारखेच असतात. पण त्याच्या मानेभोवती दोन काळे पट्टे असतात व मादीच्या मानेभोवती एकच तुटका काळा पट्टा असतो. नद्या, ओढे, तलाव, खाड्या व इतर जलाशय ह्यांच्या भोवती हा पक्षी एकटा अगर दुकटा सापडतो. जवळच्या एखाद्या आवडत्या खडकावर बसून हा पक्षी आपले शेपूट उडवीत व मान इकडे-तिकडे फिरवीत असलेला दिसतो. उडताना त्याचा 'चिररक चिररक' असा स्पष्ट आवाज एकदा ऐकला की सहसा विसरला जात नाही. शबल मीनरंकाची शिकार करण्याची पद्धत विलक्षण प्रेक्षणीय असते. पाण्यावरून उडत असताना त्याची नजर पृष्ठभागावर येणाऱ्या माशांची हालचाल हेरीत असते. हालचालीचा संशय आला की हा पक्षी उडताना एकदम थांबतो व वाऱ्याकडे तोंड करून, शरीर तिरपे करून आणि पंखांची उघडझाप करीत हवेत 'लोंबकळत' राहतो. चोच भक्ष्य पकडण्यासाठी तयार केलेली असते. पाण्यावर भक्ष्य आले व ते आपल्या पकडीत आहे ह्याची खात्री झाली की सहा ते आठ मीटर उंचीवरून पंख बंद करून विजेसारखा पाण्यात सूर मारतो व संपूर्णपणे पाण्याखाली जातो. थोड्याच वेळात भक्ष्याला चोचीत आडवा पकडून हा पाण्याबाहेर येतो. अंग झटकून पाणी फेकून हा लगेच त्या भक्ष्याला घेऊन जवळच्या फांदीवर जातो. तेथे त्या वळवळणाऱ्या भक्ष्याला आपटून मारतो व त्याला नीट फिरवून डोक्याच्या भागाकडून त्याला

गट्ट करतो. मुख्य भक्ष्य म्हणजे मासे पण त्याचबरोबर बेडकाची पिले, बेडूक, जलकीटक हे प्राणीसुद्धा तो खातो. किनाऱ्यावर आडवा खोदलेला बोगदा हेच त्याचे घरटे. घरट्याला आतून काहीही आवरण लावलेले नसते, पण त्यात माशाच्या हाडांचा खच पडलेला असतो. गोलसर लंबगोल आकाराची – 5 किंवा 6 – तकतकीत शुभ्र पांढरी अंडी हे पक्षी घालतात.

**हिमालयातील शबल मीनरंक (Himalayan Pied Kingfisher)** *(Ceryle lugubris)* हा मोठा असून त्याच्या डोक्यावर तुरा असतो. 800 मीटर्स उंचीवर हा पक्षी हिमालयात शबल मीनरंकाची जागा घेतो.

**छोटा हिरवा वेडा राघू (Small Green Bee-eater)** *(Merops orientalis)* – चित्रपत्र 11.58 – हिंदी : *पत्रिंगा.* चिमणीच्या आकाराच्या ह्या पक्ष्याचा रंग गवतासारखा हिरवा आहे. डोके व मान ह्या भागांवर तांबूस तपकिरी रंगाची छटा असते, आणि शेपटीवरील मध्यवर्ती पिसांची जोडी लांबवर बोथट टाकाने पसरलेली असते. थोडीशी बाकदार काळी चोच आणि गळ्यावरील काळी पोत ह्या गुणांनी त्याची ओळख लवकर पटते. हा पक्षी एकट्याने अगर जोडीने माळरानात जरी राहात असला तरी त्याला शेतीवाडी, साफ केलेली जंगले आणि गावाजवळची चराऊ राने जास्त पसंत असतात. तारायंत्रांच्या तारा, कुंपणाचे खांब, झुडपे ह्यांवर हे पक्षी लहानमोठ्या कळपांत ओळीने बसलेले दिसतात. हवेत उडणारे कीटक दिसले की हा पक्षी तत्काळ झेप घेऊन त्यांना पकडतो, व पंख स्थिर पण ताठ ठेवून आपल्या बसावयाच्या जागी परत येतो. ह्या ठिकाणी भक्ष्याचा फन्ना उडविला जातो. त्याचा आवाज मंजुळ असतो व तो उडताना 'टिट, टिट्' किंवा 'ट्री-ट्री-ट्री' असा आवाज काढतो. गर्द वृक्षांमधील निवासस्थानी ह्या पक्ष्यांचे थवेच्या थवे सूर्यास्तानंतर परत येतात. झाडावर परत आल्यावर सुद्धा हे पक्षी बराच वेळ अस्वस्थ असतात. उगाचच इकडून तिकडे उड्या मारीत, मधेच झाडाभोवती फेरी मारीत राहतात व शेवटी ते एखाद्या ठिकाणी शांतपणे झोपी जातात. छोट्या छोट्या टोळक्यांनी हे पक्षी एकत्र एका फांदीवर झोपतात. झोपताना पिसे फुगवून व डोके पंखात घुसडून ठेवतात. हे पक्षी सूर्यवंशी असल्यामुळे सूर्य उगवून वर आला म्हणजे झोप संपवून झाडावरून उडून जातात. मधमाशा, नाकतोडे व इतर कीटक हे ह्यांचे अन्न. मधमाशांना खाण्याच्या सवयीमुळे हे पक्षी मधाच्या धंद्याला नुकसानकारक ठरतात. उंच टेकाडांमधून किंवा वालुकामय जमिनीत एक मीटर किंवा त्यापेक्षा लांब मर्यादेचे बोगदे तयार केले जातात. हे बोगदे म्हणजेच ह्या पक्ष्यांची घरटी. बोगद्याच्या शेवटी अंडी ठेवण्यासाठी रुंद भाग तयार केलेला असतो. –4 ते 7 – पांढरी स्वच्छ लंबगोल आकाराची अंडी हे पक्षी घालतात.

**निळ्या शेपटीचा वेडा राघू (Blue-tailed Bee-eater)** *(Merops philippinus)* हा पक्षी वेड्या राघूसारखाच असतो. ह्या पक्ष्याचा आकार वेड्या राघूपेक्षा मोठा असतो; डोळ्यांमधून एक काळी रेघ असते; गळा चेस्टनट रंगाचा असतो व शेपटी निळ्या रंगाची

असते. तलाव, विहिरी ह्यांच्या आसपास व माळरानात नेहमी सापडणारा हा पक्षी परिचित आहे. तो खूप हिंडतो पण त्याच्या स्थानिक स्थलांतरासंबंधीची संपूर्ण माहिती अद्याप उपलब्ध झालेली नाही.

**चाष (नीलकंठ)** **(Indian Roller or Blue Jay)** *(Coracias benghalensis)* – चित्रपत्र 9.45 – हिंदी : *नीळकंठ, सबझक,* ऑक्सफर्ड व केंब्रिज निळ्या रंगाचा हा पक्षी पारव्याच्या आकाराचा असतो. मोठे डोके, जड चोच, तांबूस तपकिरी रंगाची छाती व पोट आणि शेपटीखालचा भाग फिकट निळ्या रंगाचा असतो. उडताना पंखावरचे फिकट व गडद निळ्या रंगाचे पट्टे उठून दिसतात. माळरानात राहणारा हा पक्षी शक्य तो दाट जंगले टाळतो. फांद्यांवर किंवा तारांवर बसून हा पक्षी सभोवतालची टेहळणी करीत असतो. तेथून जमिनीवर झेप घेऊन तिथला किडा उचलून परत आपल्या जागी येतो, किंवा दुसऱ्या एखाद्या ठिकाणी जाऊन त्या किड्याचा निकाल लावून त्याला खाऊन टाकतो. नाकतोडे, टोळ, भुंगे आणि इतर कीटक हे त्याचे अन्न. पिकाचा नाश करणाऱ्या कीटकांना हा खाऊन टाकीत असल्यामुळे शेतकऱ्यांचा तो मित्र आहे. प्रसंगी बेडूक, सरडे, उंदीर हे प्राणी पण तो खातो. प्रणयक्रीडेचे वेळी हे पक्षी कर्कश आवाज काढीत गोंगाट करतात. नर मादीसमोर नाना प्रकारचे हवाई खेळ करून दाखवितो. कधी कधी तो खूप उंच उडतो व डोके खाली करून व पंख मिटून अग्निबाणासारखा खाली येतो. कोलांट्या उड्या मारतो. हे सर्व कसरतीचे खेळ चालू असताना कर्कश आवाज काढतो व त्याचे मनोवेधक रंग पसरलेल्या पंखांमुळे सूर्यप्रकाशात चमकत असतात. गवत, पिसे ह्यांचे बनविलेले घरटे झाडांच्या ढोलीत तयार केले जाते. लंबगोल आकाराची पांढरी शुभ्र – 4 किंवा 5 – अंडी हे पक्षी घालतात.

**काश्मिरी नीलकंठ** *(Coracias garrulus)* हा चाष पक्ष्याचा काश्मिरातील भाईबंद आहे. हा पक्षी सप्टेंबर-ऑक्टोबरचे सुमारास सिंध, कच्छ, सौराष्ट्र आणि उत्तर गुजरात ह्या मार्गावरून आफ्रिकेला स्थलांतर करतो. उडताना त्याच्या पंखावरील निळसर काळ्या पिसांच्या रंगामुळे हा सहज ओळखता येतो. (चित्रपत्र 9.45 मधील वरील डाव्या कोपऱ्यात त्याच्या पंखाचे चित्र आहे.) त्याचा खालचा भाग फिकट निळ्या रंगाचा असतो.

**सुतार (हुप्पो)** **(Hoopoe)** *(Upupa epops)* – चित्रपत्र 11.61 – हिंदी : *हुडहुड.* **पुत्रप्रिय कुलातील** (Family UPUPIDAE) हा एकमेव प्रतिनिधी आहे. आकर्षक पिंगट उदी रंगाच्या ह्या पक्ष्याच्या पाठीवर, पंखांवर व शेपटीवर झेब्रा प्राण्यासारखे काळे-पांढरे पट्टे असतात. डोक्यावर पिसांचा पंखेवजा तुरा असतो. हा तुरा त्याला मिटता किंवा उघडता येतो. त्याची चोच लांब बारीक आणि किंचित बाकदार असते. ह्याचा आकार साळुंकीएवढा असतो. सुतारपक्षी साधारणपणे जोडीने किंवा टोळक्यांनी आढळतात. शहरे आणि गावे ह्यांच्या

आसपासचे माळरान,राया,बागा आणि विरळ जंगले हे प्रदेश त्याला राहण्यासाठी आवडतात. लाव पक्षी पाण्यात फिरताना जसा फिरतो तसा हा पक्षी जमिनीवर चालतो किंवा पळतो. जमिनीवर टोच्या मारीत, किंवा पाचोळा दूर करीत चिमट्यासारखी चोच टोकरीत, हा पक्षी अन्नशोधन करतो. जमीन उकरताना तुरा मिटलेला व आक्रसून घेतलेला असल्यामुळे त्याचे टोक डोक्यामागे शेंडीसारखे लोंबताना दिसते. त्याला डिवचले किंवा धोक्याचा इशारा मिळाला तर लगेच हा तुरा पंखाप्रमाणे उघडला जातो. थोड्या वेळाने हा पक्षी उडतो व भरकटत कोठे तरी बसला म्हणजे तो तुरा पुन्हा उभा राहतो. त्याचे मृदू गाणे म्हणजे 'हू-पो' किंवा 'हू-पो-पो' असा आवाज असतो. हे गाणे एकसारखे व वेळेला दहा मिनिटे टिकणारे असते. छातीवर चोच जवळजवळ आडवी करून हा पक्षी आरोळी देतो. इतर वेळी मधून प्रत्येक आवाजाला भुंकल्याप्रमाणे डोके हलविले जाते व त्याच वेळी तुरा मधून उघडला व मिटला जातो. ह्याशिवाय 'क्याव क्याव' व 'चक् चक्' असेही आवाज तो काढतो. त्याचे अन्न म्हणजे किडे, त्यांच्या अळ्या व कोष. हे कीटक पिकांचा नाश करणारे असतात व त्यांना हा खात असल्यामुळे तो शेतकऱ्यांचा मित्र समजला जातो. झाडांच्या ढोलीत, भिंतीच्या भोकात, छपरातील भोकात, व गुहांमधील भोकातून हा पक्षी घरटे तयार करतो. घरट्यात चिंध्या, केस, गवत आणि इतर घाणेरड्या वस्तू लावलेल्या असल्यामुळे ह्याच्या घरट्याला येणारी घाण प्रसिद्ध आहे. पांढरी स्वच्छ – 5 किंवा 6 – अंडी वेळेला घातली जातात व उबविण्याचे वेळी ती खराब होतात आणि त्यांचा रंग जातो.

गणामधील शेवटचे कुल म्हणजे **प्रियात्मज** (BUCEROTIDAE) म्हणजे शिंगचोचा (Hornbill) पक्षी. ते संपूर्णपणे फलाहारी व झाडावर राहणारे असून त्यांची भलीमोठी न शोभणारी चोच हे त्यांचे वैशिष्ट्य आहे.

**मलबारी धनेश (Malabar Pied Hornbill)** *(Anthracoceros coronatus)* – चित्रपत्र 8.42 – हिंदी : *धन चिरी*. हा पक्षी त्याच्या कुलाचे एक उत्तम उदाहरण आहे. घारीपेक्षा जरा मोठ्या आकाराचा हा पक्षी मुख्यत: पांढरा काळा असतो. लांब व रुंद शेपटीची बाहेरची पिसे संपूर्ण पांढरी असतात. शिंगासारखी पिवळी व काळी भलीमोठी चोच व त्यावरील टोकदार सपाटशिंग ही त्याची वैशिष्ट्ये आहेत.

नेहमीच्या परिचयाच्या **धनेश (Large Pied Hornbill)** *(A. malabaricus)* ह्या पक्ष्याच्या शेपटीची बाहेरची पिसे टोकालाच फक्त पांढरी असतात. शिवाय चोचीवरील शिंग सपाट नसून वाकलेले असते. धनेश कुमाँव ते आसाम ह्या भागात सापडतो. मलबारी धनेशाच्या मादीच्या डोळ्याभोवतालची उघडी त्वचा पांढरट असते व म्हणून नरापासून (चित्रामधील) तिला वेगळे ओळखता येते.

सर्व प्रकारच्या धनेश पक्ष्यांच्या सवयी जवळजवळ सारख्याच असतात. हे पक्षी जंगलात राहतात. त्यातूनही ज्या जंगलात वड, पिंपळ इत्यादी वृक्ष असतात ती जंगले हे पक्षी अधिक

पसंत करतात. कारण वड व इतर वृक्षांची फळे हेच त्यांचे अन्न होय. प्रसंगी धनेश पक्षी सरडे, छोटे पक्षी आणि उंदीर-घुशी ह्यांसारखे प्राणी पण खातो. ह्या पक्ष्यांचे थवे आपल्या नायकाच्या मागे ओळीने ह्या झाडावरून त्या झाडावर उडत असतात. उडताना प्रथम पंखांची जलद हालचाल करतात व वेग आला म्हणजे पंखांची पिसे खाली दबवून ते तरंगत जातात. त्यांचे आवाज नाना प्रकारचे असतात, ओरडणे, किंचाळणे, इत्यादी. त्यांची घरटी करण्याची पद्धत वैशिष्ट्यपूर्ण असते. आपल्या उत्सर्जनाने हा पक्षी झाडांमधील ढोलीच्या भिंती लिंपतो व हे काम तो आपल्या चोचीचा करणीसारखा उपयोग करून पार पाडतो. घरट्यात मादीला अडकविले जाते व एका बाजूला फट ठेवून नर तिला खाऊ घालतो. मादी एकटी घरट्यात अंडी उबविते व पिलांना वाढविते. पिले अंड्यांतून बाहेर आल्यावर घरट्याच्या भिंती फोडून पिले व त्यांची आई ह्यांची सुटका केली जाते. त्यानंतर मात्र दोघे नर-मादी पिलांचे संगोपन करतात. पावसाळा सुरू होण्यापूर्वी मार्च आणि जून महिन्यांच्या दरम्यान धनेश पक्षी घरटी बांधतात. पांढरी स्वच्छ – 2 ते 4 – अंडी घातली जातात. उबविल्यामुळे पुढे त्यांचा रंग खराब होतो.

**काष्ठकूट गण** (Order PICIFORMES) ह्यामध्ये पिप्पल कुल (Family CAPITONIDAE) तांबट (Barbet) आणि काष्ठकूट कुल (PICIDAE) काष्ठकूट (Woodpecker) ह्यांचा समावेश होतो. तांबट जातीचे पक्षी भडक रंगाचे पण ठेंगणे व विशोभित पक्षी आहेत. फळांवर राहणाऱ्या ह्या पक्ष्यांच्या जाड व मजबूत चोचीभोवती तळाशी राठ केसांसारखा झुपका असतो.

**तांबट (Coppersmith or Crimsons-breasted Barbet)** *(Megalaima haemacephala)* – चित्रपत्र 11.56 – हिंदी : *छोटा बसंत*. हा पक्षी चिमणीपेक्षा थोडा मोठा आणि रंगाने पिंगट असतो. बोजड चोचीच्या ह्या पक्ष्याचा रंग गवती-हिरवा असतो, छाती व कपाळ शेंदरी, गळा पिवळा, आणि खालच्या भागावरील पिवळसर रंगावर हिरव्या काड्या रेखाटलेल्या असतात. त्याच्या भुंड्या शेपटाचा उडताना त्रिकोणी आकार स्पष्ट दिसतो. ज्या ठिकाणी वड, पिंपळ, उंबर ह्या जातीचे वृक्ष भरपूर आहेत अशा ठिकाणी हा पक्षी राहतो — मग ही ठिकाणे म्हणजे गावाजवळचे जंगल असो अगर खुद्द गावामधील बाग असो. साळुंकी, बुलबुल, हिरवा पारवा, शिंगचोचा आणि इतर फलाहारी पक्षी यांच्या संगतीत तांबट पक्षी ह्या झाडांवर घोळक्याने जमतात. काही वेळा फुलपाखरे आणि इतर पंखवाले कीटक हे पक्षी चमत्कारिक व वेड्यावाकड्या उडण्याने पकडतात. तांबट लोक भांडी घडविताना ठोकून ठोक ठोक आवाज काढतात त्या प्रकारचा आवाज हे पक्षी काढतात. 'टुक्, टुक्, टुक्' असा दर दोन सेकंदांनी दीर्घकाल हे पक्षी आवाज करीत राहतात. ह्या पक्ष्यांचा आवाज खेडेगावांच्या आसपास परिचित आहे. आवाज काढताना आपले डोके इकडे व तिकडे हलवीत नाना स्वरांचे

आवाज काढतात. शेवग्यासारख्या झाडांच्या खोडात हे पक्षी पोखरून जमिनीपासून साधारण मध्यम उंचीवर घरटे तयार करतात. घरट्यांना आतून काहीही लावलेले नसते. वेळेला घातलेली 3 – अंडी पांढऱ्या रंगाची असतात.

**हिरवा तांबट (Large Green Barbet)** *(M. zeylanica)* हा पण साध्या तांबट पक्ष्याप्रमाणे असतो. हा पक्षी त्याच्या आवाजानेच जास्त परिचित आहे. साळुंकीच्या आकाराच्या ह्या पक्ष्याचा रंग गवती-हिरवा असून डोके व मान तपकिरी रंगाचे असतात. डोळ्यासभोवती नारिंगी रंगाची उघडी त्वचा असते. रानात ह्या पक्ष्याचा 'कुट् रू कुट् रू' असा एकसारखा काढलेला आवाज ऐकू येतो.

काष्ठकूट पक्ष्यांचे विविध प्रकार भारतात सापडतात. जंगल खात्याला हा पक्षी फार उपकारक आहे, कारण झाडांना पोखरणाऱ्या कीटकांना हे पक्षी खाऊन टाकतात. आपल्या पटाशीसारख्या चोचींनी व लांब जिभेच्या साहाय्याने हा पक्षी पोखरणाऱ्या कीटकांच्या अळ्या, कोष त्यांनी पाडलेल्या भोकांमधून हे पक्षी खेचून काढतात.

**मराठा सुतार (काष्ठकूट) (Mahratta Woodpecker)** *(Picoides mahrattensis)* – चित्रपत्र – 11.59 हिंदी : *कटफोरा*, बुलबुल पक्ष्याच्या आकाराचा हा पक्षी असून त्याची चोच लांब, जाड, टोकदार, कठीण आणि पाचरीच्या आकाराची असते. वरच्या बाजूच्या पिसांवर वेडेवाकडे पांढरे काळे ठिपके असतात. डोक्यावर तपकिरी पिवळ्या रंगाची पिसे असतात, व तुरा शेंदरी रंगाचा असतो. पोटाकडच्या भागावर तपकिरी रेषा छातीवर व बाजूला असतात आणि पोटावर व शेपटीच्या खाली किरमिजी रंगाचा डाग असतो. मादीला शेंदरी तुरा नसतो. मराठा काष्ठकूट पक्षी विरळ पतझड जंगलात, आंबराईत, आणि काही वेळा छोट्या झुडपांच्या वाळवंटी प्रदेशात आढळतो. ह्या पक्ष्यांच्या जोड्या झाडांवर एका विशिष्ट पद्धतीने चढतात व उतरतात. खोडाच्या बुंध्यापासून वर जाताना तो सरळ न जाता मळसूत्राप्रमाणे वेलांट्या घेत घेत जातो. वाटेत तो ठिकठिकाणी चोचीने खोडावर मारीत व किडे पकडीत असतो. खोडावरची साल फोडताना तो आपले पाय फाकटून शेपूट खोडावर घट्ट दाबून भक्कम आधार घेतो. मुंग्या आणि अळ्या हे त्याचे मुख्य अन्न. आपल्या लांब, चिकट व काटेरी जिभेने हा पक्षी किडे पकडतो. 'क्लिक, क्लिक' किंवा 'क्लिक्-र-र-र' असा विशिष्ट आवाज हा पक्षी काढतो. पंख जोराने फडफडावून, मधूनच ते स्तब्ध ठेवून हा पक्षी अतिशय जलद गतीने उडत असतो. कुजलेल्या फांद्यांमध्ये आपल्या पटाशीसारख्या चोचीने हा पक्षी बीळ तयार करतो. आडवी फांदी असेल तर ह्या घरट्याचे प्रवेशद्वार पाऊस आत येऊ नये म्हणून जमिनीकडे असते. घरट्याला आतून काहीही पदार्थ लावलेले नसतात. गोल व तकतकीत पांढऱ्या रंगाची तीन अंडी हे पक्षी घालतात.

**सोनरी पाठीचा काष्ठकूट (Golden-backed woodpecker)** *(Dinopium benghalense)* हा मराठा काष्ठकूटापेक्षा मोठ्या आकाराचा पक्षी आपल्या द्वीपकल्पात

सापडतो. वरून त्याचा रंग सोनेरी पिवळा व काळा असतो. खालच्या बाजूच्या बदामी पांढऱ्या रंगावर काळ्या रेघा असतात. डोके व तुरा किरमिजी रंगाचा असल्यास तो नरपक्षी असतो तर मादीमध्ये हे रंग अर्धवट असतात. विरळ जंगलात, राईत किंवा गावाभोवतालच्या बागांमधून हा पक्षी आढळतो.

भारतामध्ये सापडणाऱ्या पक्ष्यांच्या जातींपैकी जवळजवळ एक तृतीयांश जातीचे पक्षी **कुलिंग गणात** (Order PASSERIFORMES) गणले जातात. ह्या पक्ष्यांना यष्टिसादी म्हणजे फांदी पकडणारे किंवा फांदीधारी (perching) अगर गाणारे पक्षी (song birds) असे म्हणतात. बाह्यतः विविध प्रकारचे दिसणारे हे पक्षी कुलिंग गणात येण्याचे कारण म्हणजे त्यांची विशिष्ट अंतर्गत रचना सारखीच असते. उदाहरणार्थ, पाय आणि पावलांच्या स्नायूंच्या तणाव्यांची (tendons) रचना, कवटी आणि टाळू ह्यांचे स्नायू, तणावे व ध्वनियंत्राचे स्नायू. ह्या पक्ष्यांचे ध्वनी निर्माण करण्याचे यंत्र श्वासनलिकेच्या खालच्या टोकाला असते. (माणसाचे स्वरयंत्र श्वासनलिकेच्या सुरवातीस असते.) ह्या गणामधील काही महत्त्वाची कुले व त्यातील जास्त परिचित पक्ष्यांसंबंधीची माहिती खाली देण्यात आली आहे.

**पद्मपुष्प कुल** (Family PITTIDAE) (पद्मपुष्प किंवा कस्तूर पक्षी) (Pitta or Ant Thrush) हे पक्षी भडक रंगाचे असून जमिनीवर राहणारे असतात. जंगलातील जमिनीवर वावरताना त्यांच्या जाड चोचींनी खालची ओलसर जमीन व ओलसर गवत टोकरून हे पक्षी कीटक व अळ्या खातात. त्यांचे पाय लांब आणि मजबूत असतात. हे पक्षी इकडे तिकडे उड्या मारीतच फिरतात. क्वचित्-प्रसंगी थोडेसे अंतर उडून जातात. परंतु ह्यांच्यापैकी काही जाती लांब अंतरांवर स्थलांतर करतात.

**पद्मपुष्प किंवा कस्तूर (Indian Pitta)** *(Pitta brachyura)* – चित्रपत्र 12.67 – हिंदी : *नवरंग*, हा पक्षी साळुंकीच्या आकाराचा, भडक रंगाचा व भुंड्या शेपटीचा असतो. त्याचा वरचा रंग हिरवा, निळा, पिंगट, काळा आणि पांढरा असतो. पोट व शेपटीचा खालचा भाग किरमिजी रंगाचा असतो. उडताना पंखांच्या टोकावर असलेला पांढरा गोल ठिपका चकाकतो. मनुष्यवस्तीच्या जवळ अगर दूर ओढे, नाले ह्यांच्या सभोवतालच्या दाट झुडपांमधून हा पक्षी वास्तव्य करतो. बहुतांशी जरी तो जमिनीवरच असला तरी निवाऱ्याला तो झाडावर जातो. जमिनीवर लांब उड्या मारीत, पालापाचोळा दूर करून चोचीने अन्नासाठी खणत जाताना हा पक्षी दिसतो. त्याचे भुंडे शेपूट मुद्दाम वर-खाली एकसारखे हलत असते. त्याला डिवचले तर तो उडून एखाद्या फांदीवर जातो व थोड्या वेळाने शांत झाल्यावर पुन्हा जमिनीवर येतो. ढगाळ हवेत दिवसभर परंतु इतर दिवशी पहाटे व संध्याकाळी हा पक्षी 'व्ही-ट्यू' अशी स्पष्ट मोठी व

डबल शिटी मारीत असतो. जमिनीवरून किंवा झाडाच्या फांदीवरून दहा सेकंदांत तीन चार वेळा ही शिटी वाजविली जाते. काही वेळा पाच मिनिटांपर्यंतही अखंड शिटी वाजविण्यात येते. ओरडण्यापूर्वी पक्षी ताठ बसतो आणि डोके मागे झुकवून मग आवाज काढतो. तीनचार पक्षी निरनिराळ्या दिशांनी ह्या शिटीला प्रतिसाद देतात. गवत, काटक्या, मुळ्या, वाळलेली पाने इत्यादी साहित्याने हे पक्षी मोठे गोलाकार घरटे बांधतात. ठेंगण्या झाडाच्या दुबेळक्यात किंवा जमिनीवर झुडपांच्या बुंध्यांशी ही घरटी बांधली जातात. कपबशीसारख्या पांढऱ्या रंगाची – 4 ते 6 – अंडी घातली जातात. फिकट जांभळ्या रंगाच्या रेषा, ठिपके इत्यादी प्रकार अंड्यांवर असतात.

**चंडोल कुल** (Family ALUDIDAE) हे पक्षी जमिनीवर राहतात व त्यांची पिसे तपकिरी, राखी, वाळूसारखी, काळी व पांढरी अशा विविध रंगांची असल्यामुळे ते देखणे पक्षी आहेत. काही जातींच्या पक्ष्यांना तुरा असतो. मोकळ्या मैदानात किंवा चराऊ गवताळ प्रदेशात हे पक्षी वास्तव्य करतात. काही पक्षी स्थलांतर करतात तर काही येथेच राहतात. ह्या कुलामधील पुष्कळ जातीचे पक्षी हवेत विहार करताना सुरेल गाणे गातात.

**तुरेबाज चंडोल (Crested Lark)** *(Galerida cristata)* – चित्रपत्र 12.66 – हिंदी : *चंडूल.* चिमणीपेक्षा थोडा लहान असणाऱ्या ह्या पक्ष्याचे वैशिष्ट्य म्हणजे डोक्यावरील ताठ व टोकदार तुरा. ह्याचा रंग वरून राखट मातट तपकिरी असतो व त्यावर काळसर रेषा असतात. समुद्रावरील वाळूच्या पण फिकट रंगाच्या खालच्या भागावर (छातीवर) तपकिरी रेषा असतात. ह्या पक्ष्यांचे जोडपे किंवा चारपाच जणांचे कुटुंब वाळवंटी (अर्धवट) प्रदेशातील जमिनीवर किडे, भुंगे व गवताचे बी टिपताना दिसते. मधून मधून एखाद्या उंचवट्यावर किंवा दगडावर चढून हे आपले शिटीवजा प्रवाही गाणे गातात. 'टी-उर' असा मंजुळ आवाज हे पक्षी काढतात. विणीच्या हंगामात उडताना हे गाणे नर पक्षी गातो. मादीला आकर्षित करण्यासाठी काही फूट हवेत उंच जातो. एखाद्या विशिष्ट प्रदेशावर पंखांची हळुवार हालचाल करीत तो भटकत असताना हे आपले गाणे गातो. नंतर पंख ताठ करून व मधून मधून किंचित थरथरावत तो एखाद्या उंचवट्यावर अगर दगडावर उतरतो. त्याचे गाणे भारद्वाजाच्या गाण्यापेक्षा तुटक व खालच्या दर्जाचे असते असे असूनसुद्धा चंडोल पक्ष्याला अनेक लोक पिंजऱ्यात ठेवून घरात पाळतात. बंदिस्त अवस्थेतही हा पक्षी सुखाने राहतो. गवताळ भागात जमिनीवर उथळ वाटीच्या आकाराचा खड्डा करून गवताचे घरटे तयार होते. घरट्याला आतील बाजूने मऊसर पदार्थ (पिसे, चिंध्या इत्यादी) लावलेले असतात. फिकट पिवळसर पांढऱ्या रंगावर तपकिरी आणि जांभळे डाग व चट्टे असलेली – 3 किंवा 4 – अंडी हे पक्षी घालतात.

ह्या तांबूस रंगाच्या तुरेबाज चंडोल पक्ष्याच्या दोन जाती द्वीपकल्पावर सापडतात. त्यापैकी **साइकचा चंडोल (Syke's Crested Lark)** *(Galerida deva)* त्या पक्ष्याच्या छातीवर थोड्या व अरुंद रेषा असतात तर **मलबार चंडोल (Malabar Crested Lark)** *(G.*

*malabarica)* पक्ष्याच्या छातीवरील रेघा अधिक संख्येच्या व रुंदीच्या असतात.

**राखी डोक्याचा** किंवा **काळ्या पोटाचा फिंच-चंडोल (Ashy-crowned or Black-bellied Finch-Lark)** *(Eremopterix grisea)* – हिंदी : *दियौरी, दुरी* किंवा *फोथैली*. हा बसकट पक्षी चिमणीपेक्षा आकाराने लहान असतो. तर वरून वाळूसारखा तपकिरी व खालून काळा असतो. डोके राखी रंगाचे व गाल पांढरे असतात. मादीचा रंग सरसकट वाळूसारखा तपकिरी असतो. उघड्या माळरानातील नापीक प्रदेशात अगर शेतात ह्या पक्ष्यांच्या जोड्या किंवा छोटे कळप लांबवर विखुरलेल्या अवस्थेत सापडतात. त्याचा रंग सभोवतालच्या जमिनीशी इतका जुळता असतो की तो चटकन दिसत नाही. किडे, दाणे व गवताचे बी हे त्याचे अन्न शोधताना हा पक्षी गडबडीने जमिनीवर वेड्यावाकड्या उड्या मारीत असतो. पंखांची जलद गतीने उघडझाप करीत व मधूनमधून विश्रांती घेत हा पक्षी हवेत घिरट्या घालतो. हवेतील प्रेक्षणीय कसरत करताना किंवा जमिनीवर चालताना हा आपले सुरेल गाणे गात असतो. त्याचे गाणे म्हणजे छोट्या लकेऱ्या व लांब स्वर ह्यांचे असते. हा हवेत 30 मीटरपेक्षा उंच एखाद्या अग्निबाणाप्रमाणे एकदम वर जातो व पंख मिटून सरळ खाली सूर मारतो. जमिनीजवळ आल्यावर आपल्या वेगाचा फायदा घेऊन तो परत उलटा थेट वर जातो. तेथून पुन्हा खाली सूर मारतो. हे त्याचे चक्र बराच वेळ चालू राहते. परंतु प्रत्येक वर येण्याचे वेळचे अंतर दर खेपेला कमी कमी होत जाते व शेवटी तो एखाद्या उंचवट्यावर उतरतो. जमिनीकडे सूर मारताना तो असा तीरासारखा येतो की हा आता जमिनीवर नक्की आपटणार असे वाटते पण क्षणात तो पंख पसरून त्याच वेगाने जेव्हा परत वर जातो तेव्हा मात्र आश्चर्य वाटते. प्रत्येक सूर मारण्याचे वेळी हा पक्षी आपले सुरेल गाणे गातो. ह्या पक्ष्याची ही हवाई कसरत प्रेक्षणीय असते. झुडपाच्या किंवा उंचवट्याच्या आश्रयात हा पक्षी बशीच्या आकाराचे खड्याचे अतिशय सुबक घरटे बांधतो. मऊ गवत, केस व पिसे ह्यांनी घरटे सुखद केले जाते. काही वेळा वाळूचा कठडा केलेला असतो. फिकट पिवळसर किंवा राखट पांढऱ्या रंगावर तपकिरी व जांभळ्या रंगाचे ठिपके व चट्टे असलेली – 2 किंवा 3 – अंडी हे पक्षी घालतात.

**भांडिक कुल** (Family HIRUNDINIDAE) ह्या कुलात भांडिक (Swallow) आणि पाकोळी (Martin) ह्या पक्ष्यांचा अंतर्भाव होतो. वरवर दुर्बल (Swift) पक्ष्यासारखे दिसणारे हे पक्षी आकाराने चांगलेच मोठे असतात. हे पक्षी आपला बहुतांश वेळ उडणाऱ्या कीटकांना हेरून आपल्या लांब जिवणीच्या साहाय्याने पकडण्यासाठी हवेतच काढतात. पंख लांब व टोकदार असतात, पण दुर्बल पक्ष्याच्या पंखांपेक्षा अधिक रुंद असतात आणि धनुष्याकृती नसतात. पुष्कळ जातींमध्ये शेपटी आतपर्यंत दुभंगलेली असते. त्यांचे उडणे चपल व डौलदार असते. ह्या पक्ष्यांपैकी काही जाती वर्षभर येथेच राहतात तर काही जाती हिमाचलोत्तर प्रदेशातून (Palaearctic Region) इकडे स्थलांतर करतात.

**लालबुड्या भांडिक (Red-rumped Swallow)** *(Hirundo daurica)* – चित्रपत्र

12.62 – हिंदी : *मशीद अबाबील.* भारतात राहणाऱ्या जातींपैकी एका परिचित जातीचा हा पक्षी आहे. चिमणीच्या आकाराचा हा पक्षी दुभंगलेल्या शेपटीचा, वरून धातूसदृश्य निळसर काळ्या रंगाचा, खालून पिंगट रंगाचा वर गर्द तपकिरी रेघा असलेला असतो. मानेवर चेस्टनट रंगाचा पट्टा, आणि उडताना बुडाशी दिसणारा चेस्टनट रंग हे गुण त्याला ओळखण्यास उपयोगी पडतात. तारांवर हजारोच्या संख्येने बसलेले ह्या स्थानिक पक्ष्यांचे स्थलांतर करून आलेले भाईबंद नेहमी दिसतात. हे स्थलांतरे हिवाळ्यात आपल्याकडे येतात. ह्या पाहुण्या पक्ष्यांच्या खालच्या भागावरील अधिक रुंद रेघा व बुडाचा फिकट तांबडा रंग ह्या गुणांमुळे ते वेगळे ओळखता येतात.

भांडिक पक्षी दिवसभर हवेत उंचावर घिरट्या घालीत खालून उडणाऱ्या कीटकांना पकडण्यात काही वेळा जमिनीपर्यंत सूर मारून कीटकांना पकडण्यात आपला दिवस व्यतीत करतात. हे पक्षी समाज करून राहतात. फक्त विणीच्या हंगामात मात्र हे भक्ष्य टिपताना आढळतात. उसांच्या शेतात किंवा बांबूच्या वनात (विशेषत: पाण्याजवळच्या) हे पक्षी बहुसंख्येने रात्रीचा निवारा घेतात. प्रथम जोराने पंख हलवून हे उड्डाण करतात व वेग आल्यावर काही काल तरंगत राहतात. त्यांचा उडण्याचा वेग खूप असतो व ते विलक्षण आकर्षक पद्धतीने उडतात. त्यांची दुभागलेली शेपटी त्यांना हवेतील कसरती करण्यासाठी व किडे पकडण्यासाठी फार उपयोगी पडते. त्यांचे किलबिलणे हंगामात एखाद्या उत्साही गाण्याप्रमाणे वाटते. त्यांचे घरटे खडकाच्या किंवा भिंतीच्या आधाराने चिकटल्यासारखे असते. बकपात्राच्या आकाराचे चिखलाने लिंपून तयार केलेल्या घरट्याचे प्रवेशद्वार नलिकेसारखे चिंचोळे असते. घरट्याच्या गोलाकार भागाला आतून पिसे लावलेली असतात, व ह्या ठिकाणी अंडी घातली जातात. वेळेला पांढरी शुभ्र –3 किंवा 4 – अंडी घालतात.

**साधा भांडिक (Common Swallow)** *(H. rustica)* हा पक्षी लालबुड्या भांडिकाबरोबर हिवाळ्यात येथे दिसतो. हा साधा भांडिक पक्षी वरून चकाकणारा जांभळट निळा किंवा स्टीलसारखा निळा असतो; खालच्या भागाचा रंग फिकट तांबूस पांढरा असतो. कपाळ व गळा चेस्टनट रंगाचे असतात. गळ्याच्या कडेने छातीवर रुंद चकचकीत काळा पट्टा असतो. ह्याचे शेपूट खोलवर दुभागलेले असते.

**खाटीक (Shrike or Butcher Bird)** (Family LANIIDAE) हे पक्षी बुलबुल व साळुंकी ह्यांच्या दरम्यानच्या आकाराचे पक्षी आहेत. मोठे डोके, आकडीची जबरदस्त चोच व तीक्ष्ण नखे ह्यामुळे ते ससाण्याची छोटी आवृत्तीच वाटतात. नर व मादी सारखीच असतात व शेपटी लांब आणि रेखांकित असते. हे पक्षी जरुरीपेक्षा जास्त प्राणी मारतात व जादा मांस काटेरी झुडपांवर टांगून शिल्लक ठेवण्याच्या त्यांच्या नियमित सवयीमुळे त्यांना खाटीक असे म्हणतात. शिल्लक अन्न ते नंतर सावकाशीने खातात.

आपल्याकडे नेहमी सापडणारा व मोठा पक्षी म्हणजे **राखी खाटीक (Grey Shrike)**

*(Lanius excubitor)* – चित्रपत्र 12.63 – हिंदी : सफेद लटोरा. हा पक्षी साळुंकीएवढा असतो. रुपेरी राखी रंगाच्या ह्या पक्ष्याची पांढरी आणि काळी शेपूट लांबसर असते. चोचीपासून गर्द काळ्या रंगाचा पट्टा निघून तो डोळ्यामधून मागच्या बाजूला जातो. उडतांना त्याच्या काळ्या पंखांवरचा पांढऱ्या रंगाचा ठिपका कवडशाप्रमाणे चकाकतो. आकडी चोच आणि मोठे डोके ह्यामुळे तो ससाण्याप्रमाणे भयानक दिसतो. वैराण व पडीक जमिनीच्या प्रदेशात हा एकट्याने आढळतो. काटेरी झुडपांच्या पुढे आलेल्या टोकावरल्या फांदीवर बसून हा खालची जमीन न्याहाळीत असतो. जमिनीवर कीटक दिसला की हा पक्षी लागलीच झडप घालून त्याला पायात पकडतो व फांदीवर परत येतो. तेथे नखांनी त्या किड्याला घट्ट पकडून चोचीने त्याची चिरफाड करतो व खाऊन टाकतो. प्रत्येक पक्ष्याचे अन्न गोळा करण्याचे क्षेत्र ठरलेले असते व ह्या क्षेत्रावर तो दिवसभर फेऱ्या मारतो आणि दुसऱ्या कोणालाही त्या क्षेत्रावर अतिक्रमण करू देत नाही. टोळ, नाकतोडे, इतर मोठाले कीटक, सरडे, उंदीर, छोटे पक्षी हे त्याचे अन्न. काही वेळा स्वतःपेक्षा मोठे असलेले पक्षी पण हा खाटीक पकडतो. त्याचा आवाज साधारणतः कर्कश व विरळ असतो, परंतु विणीच्या हंगामात हा सुस्वर गाणे गातो. खाटीक अनेक पक्ष्यांच्या आवाजाची हुबेहूब नक्कल करतो. काटेरी फांद्यांचे वाटीच्या आकाराचे घरटे हा पक्षी झुडपांमध्ये बांधतो. पिसे, चिंध्या, लोकर ह्यांचे अस्तर ह्या घरट्यांना आतून लावलेले असते. फिक्या हिरवट पांढऱ्या रंगावर जांभळट तपकिरी रंगाचे ठिपके असलेली – 3 ते 6 – अंडी हे पक्षी घालतात.

भारतात खाटीक पक्ष्याच्या आणखी काही जाती आढळतात. त्यातील **तांबूस पाठीचा खाटीक (Rufous-backed Shrike)** *(L. schach)* ही एक परिचित जात आहे. राखी खाटीकापेक्षा लहान असलेल्या त्या पक्ष्याच्या पाठीवर खालच्या बाजूस व शेपटीच्या बुडाशी भडक तांबूस रंगाचा भाग असतो. छाती व पोट ह्या भागावर तांबूस झाक असते. भरपूर पाणी व झाडे असलेले प्रदेश हा पक्षी जास्तकरून पसंत करतो.

**कांचन** कुलामधील (Family ORIOLIDAE) सर्वात परिचयाचा पक्षी म्हणजे **कालशीर्ष कांचन (Black-headed Oriole)** *(Oriolus Xanthornus)* – चित्रपत्र 14.83 – हिंदी: *पीलक.* साळुंकीच्या आकाराच्या ह्या पक्ष्याचे अंग सुंदर सोनेरी-पिवळ्या रंगाचे असते. डोके, गळा, छातीचा वरचा भाग काळ्या कुळकुळीत रंगाचे असतात. त्याचप्रमाणे पंख व शेपूट ह्या भागांवरही काळा रंग असतो. झाडावर राहणाऱ्या ह्या पक्ष्याची चकाकणारी गुलाबी चोच आणि किरमिजी रंगाचे डोळे त्याला ओळखण्याच्या खुणा आहेत. मादीच्या डोक्याचा रंग जरा फिकट काळा असतो. पिलांचे कपाळ पिवळ्या रंगाचे असते व त्यांच्या डोक्यावरही पिवळ्या रेघा असतात. वृक्षराजींच्या प्रदेशांमधून हे पक्षी एकेकटे सापडतात. हा पक्षी जात्याच लाजाळू आणि लपून राहणारा असला तरी तो गावामधल्या बागांमध्ये शिरतो किंवा वेळप्रसंगी गजबजलेल्या शहरातील वृक्षांवरही वास्तव्य करतो. त्याच्या हालचालीमुळे पर्णराजींमधून एखादी सोनेरी

लहर जाताना दिसते. पक्षीनिरीक्षण करणाऱ्या व्यक्तींना ह्याचा कर्कश 'छीहाऽ' किंवा 'क्काक' हा आवाज ऐकू येतो; पण त्याचबरोबर 'पीलो' किंवा 'पीलोलो' अशी मंजुळ स्वराची शिटीही ऐकावयास मिळते. वड, पिंपळ, टंटणी ह्यांची फळे व इतर रसाळ फळे हे त्यांचे अन्न. काही वेळा पांगारा व काटेसावर ह्या झाडांच्या भडक रंगांच्या फुलांतील मधुरसात (नेक्टर) असलेले कीटक हा पक्षी खातो. ह्या पक्ष्याचे घरटे झाडांच्या सालीच्या तंतूचे सुरेख विणलेले व खोल वाटीच्या आकाराचे असते. हे तंतू विणण्यासाठी कोळिष्टकांचा सर्रास उपयोग केला जातो. जमिनीपासून 4 ते 10 मीटर उंचीवर असलेल्या एखाद्या फांदीच्या दुबेळक्यात हे घरटे पिशवीप्रमाणे टांगलेले असते. गुलबस पांढऱ्या रंगावर काळे किंवा तांबूस तपकिरी ठिपके असलेली – 2 किंवा 3 – अंडी हे पक्षी घालतात. कावळे व इतर हल्लेखोर पक्षी ह्यांच्यापासून संरक्षण होण्यासाठी कांचन पक्षी आपली घरटी कोतवाल पक्ष्याच्या घरट्याजवळच बांधतात.

ह्या कालशीर्ष कांचनाबरोबर राहणारी कांचन पक्ष्याची दुसरी जात म्हणजे **पीलक हळदी कांचन (Golden Oriole)** *(Oriolus oriolus)*. ह्याचा आकार कालशीर्षाएवढाच आणि रंग तितकाच सुरेख पिवळा असतो. फक्त ह्याचे डोके काळे नसते व डोळ्यांमधून जाणारी एक काळी रेघ असते. हा पक्षी मुख्यत्वेकरून काश्मिरात व हिमालयाच्या पायथ्याच्या प्रदेशात असतो पण इतरत्र तो हिवाळी पाहुणा म्हणून आढळतो.

**अंगार कुलात** (Family DICRURIDAE) किरकोळ शरीरयष्टीचे, झाडात राहणारे बुलबुलपासून साळुंकीपर्यंतच्या आकाराचे, संपूर्ण काळ्या रंगाचे, दुभागलेले किंवा वर वळलेल्या पिसांच्या लांब शेपटीचे, किंवा तारेसारख्या लांब पिसाचा बनलेल्या पिसाऱ्याचे पक्षी अंतर्भूत केले जातात.

ह्या कुलामधील सर्वत्र परिचित व सगळीकडे आढळणारा पक्षी म्हणजे **कोतवाल (Black Drongo)** *(Dicrurus adsimilis)* – चित्रपत्र 12.64 – हिंदी : भुजंगा किंवा कोतवाल, बुलबुलाएवढ्या आकाराचा हा चपळ व किडकिडीत अंगाचा पक्षी वरून कुळकुळीत काळ्या रंगाचा असतो. शेपटी खोलवर दुभागलेली असते. तारांवर, झुडपांवर किंवा कुंपणांच्या खांबांवर, शेताच्या आसपास किंवा मोकळ्या मैदानात हा पक्षी आढळतो. येथून तो एखाद्या नाकतोड्यावर झेप घेऊन त्याला पकडतो. त्याच ठिकाणी अगर आपल्या बसावयाच्या जागी पायात नाकतोड्याला पकडून चोचीने फाडून खातो. फुलपाखरे, पंखांच्या मुंग्या व इतर कीटक ह्या प्राण्यांना हा पक्षी पकडतो. पुष्कळ वेळा कोतवाल प्रसंगी स्वतःपेक्षा मोठ्या पक्ष्यांचा वेगाने पाठलाग करून आपल्या भक्ष्यापासून त्यांना दूर हाकलतो. हा पक्षी अनेक वेळा चरणाऱ्या गुरांच्या अंगावर बसलेला आढळतो. त्यांच्या हालचालीमुळे गवतांमधून जे किडे बाहेर पडतात त्यांना हा पक्षी चटकन पकडतो. जंगलात लागलेल्या वणव्यांच्या भोवती किंवा पेटलेल्या गवताभोवती ह्या पक्ष्यांचे मोठाले कळप एकत्र येतात व आगीमुळे जीव वाचविण्यासाठी बाहेर पडणारे किडे हे पक्षी खाऊन टाकतात. पिकांचा नाश करणारे अनेक कीटक हे पक्षी खात

असल्यामुळे शेतकऱ्यांना हे पक्षी आवडतात. त्यांचे कर्कश ओरडणे, रागावल्यासारखे किंवा उर्मटपणाचे वाटते व विणीच्या हंगामात तर हे पक्षी फार गोंगाट करतात. झाडांच्या छोट्या फांद्या आणि गवत कोळिष्टकांनी एकत्र बांधून वाटीच्या आकाराचे उथळ घरटे हे पक्षी बांधतात. शेताच्या कडेने जे वृक्ष असतात त्या वृक्षांच्या बाहेरच्या लोंबत्या फांद्यांच्या दुबेळक्यात ही घरटी बांधली जातात. त्यामुळे त्यांना सभोवतालचा प्रदेश स्वच्छ दिसतो. पांढरट रंगावर तांबडे ठिपके असलेली – 3 ते 5 – अंडी हे पक्षी घालतात. आपल्या घरट्यांचे संरक्षण हे नावाप्रमाणेच मोठ्या धाडसाने करतात. घार किंवा कावळा ह्यांसारख्या मोठ्या पक्ष्यांना देखील ते आपल्या घरट्याच्या आसपास फिरकू देत नाहीत. त्यांच्यापासून मिळणाऱ्या संरक्षणाचा फायदा कबुतर व कांचन ह्यांसारखे दुबळे पक्षी आपली घरटी ह्यांच्या घरट्यांच्या शेजारी बांधून घेतात.

**राखी कोतवाल (Ashy)** *(D. leucophaeus)* व **पांढऱ्या पोटाचा कोतवाल (White-bellied)** *(D. caerulescens)* ह्या दोन जातींचा उल्लेख करणे जरूर आहे. पहिल्या प्रकारचा कोतवाल जंगलात सापडतो व त्याचा रंग दगडी पाटीसारखा राखी असून डोळे माणकासारखे लाल असतात. दुसऱ्या जातीच्या पक्ष्याचा रंग वरून निळीच्या रंगात राखी मिसळलेला व खालून पांढरा असा असतो. पतझड वनात किंवा संमिश्र बांबूच्या वनात हा पक्षी वास्तव्य करतो.

**सारिका कुल** (Family STURNIDAE) ह्या कुलात साळुंकी (Myna) व सारिका (Starling) पक्ष्यांचा अंतर्भाव होतो. **साळुंकी (मैना) (Common Myna)** *(Acridotheres tristis)* – चित्रपत्र 14.85 हिंदी : *देसी मैना.* बुलबुल व कबुतर ह्यांच्या दरम्यान आकार असलेल्या ह्या पक्ष्याची लांबी 23 सें.मी. असते. गर्द तपकिरी रंगाच्या ह्या मिजासखोर पक्ष्याचे डोके काळे, भडक पिवळे पाय व चोच, आणि डोळ्यासभोवती पिसे नसलेल्या त्वचेचा भाग असतो. उडताना पंखावरचा मोठा पांढरा भाग स्पष्ट दिसतो. चिमणी व कावळा ह्या पक्ष्यांच्या बरोबरीने साळुंकी गावात मोठ्या शहरांमधून सापडते. ह्या पक्ष्याचा समाजप्रिय स्वभाव व सर्वभक्षकपणा ह्यांमुळे तो मानवी वस्तीचा एक अविभाज्य घटक बनला आहे. एखादे घर किंवा जागा साळुंकीची एक किंवा दोन जोडपी स्वतःच्या वहिवाटीची जागा करतात व मग तेथे मात्र कोणाही उपऱ्या पक्ष्याला ते येऊ देत नाही. तरीपण ओलसर जमिनीतून वर येणारी गांडुळे, पंखांच्या मुंग्या किंवा वड, पिंपळ, उंबर ह्यांसारख्या झाडांची फळे हे अन्न खाण्यासाठी ह्या पक्ष्यांचे थवेच्या थवे एकत्र येतात. चरणाऱ्या गुरांच्या मागे राहून त्यांच्या हालचालीमुळे गवतातून बाहेर पडणारे टोळ व नाकतोडे पकडण्यासाठी, किंवा शेतकऱ्यांच्या नांगरामागोमाग राहून जमिनीच्या ढिकळातून बाहेर पडणारे किडे व गांडुळे इत्यादी पकडण्यासाठी, हे पक्षी इकडे तिकडे हिंडत किंवा मधूनच उडत अन्न टिपताना दिसतात. पोपट आणि कावळे ह्यांच्या संगतीने ह्या पक्ष्यांचे मोठाले कळप झाडांवर निवारा घेतात. साळुंकी विविध प्रकारचे आवाज काढते. त्यांपैकी 'रेडिओ-रेडिओ-रेडिओ' हा एक परिचित आवाज

आहे. मध्यान्हीच्या उन्हाचे वेळी एखाद्या सावलीत नर पक्षी मादीसमोर विचित्र तऱ्हेने डोके हलवीत व आपली घाणेरडी पिसे पसरवून 'कीक्-कीक्-कीक्', 'कोक्-कोक्-कोक्' 'चरर-चरर' असे आवाज काढतो. भिंतीच्या, छपरांच्या, किंवा झाडांच्या भोकांमधून कागद, वाळलेले गवत आणि इतर वस्तू पसरवून साळुंकी आपले घरटे बांधते. चकाकणाऱ्या सुंदर स्वच्छ निळ्या रंगाची – 4 किंवा 5 – अंडी साळुंकी घालते.

पश्चिम पाकिस्तान, गुजरात, राजस्थान, इत्यादी भागांत विशेषतः रेल्वे स्थानकांच्या आसपास सापडणारा, साळुंकीसारखा पण जरा लहान पक्षी म्हणजे **बँक साळुंकी (Bank Myna)** *(A. ginginianus)*. तिचा रंग तपकिरीऐवजी फिकट निळसर राखी असतो आणि डोळ्यासभोवती असलेली उघडी त्वचा पिवळ्या रंगाऐवजी विटकरी तांबड्या रंगाची असते.

उत्तर आणि पूर्व भारतात प्रामुख्याने सापडणारी आणखी एक साळुंकी म्हणजे **रंगीत साळुंकी (Pied Myna)** *(Sturnus contra)* – चित्रपत्र 14.86 – हिंदी : *अबलक मैना* किंवा *सिरोली मैना*. नेहमीच्या साळुंकीपेक्षा लहान आकाराचा हा पक्षी काळा पांढरा असतो. डोळ्याभोवती शेंदरी रंगाची त्वचा असते व चोच गर्द शेंदरी आणि पिवळ्या रंगाची असते. खेडेगावांच्या व शेतीवाडींच्या आसपास ह्या पक्ष्यांची टोळकी असतात. जमिनीवरचे टोळ आणि भिजलेल्या गवतामधील गांडुळे उकरून काढण्यासाठी किंवा रात्रीच्या निवाऱ्यासाठी हा पक्षी जरी गावातल्या वृक्षांवर बागांमधून येत असला तरी तो साध्या साळुंकीप्रमाणे माणसावर अवलंबून नाही आणि म्हणूनच तो घरांमध्ये आपली घरटी बांधत नाही. साध्या साळुंकीप्रमाणे ही साळुंकी वाटेल ते खात नाही. कीटक आणि फळे हेच तिचे मुख्य अन्न. इतर जातीच्या साळुंक्यांबरोबर हा पक्षी गावाबाहेरील कचऱ्याचे ढीग तपासत किंवा चराऊ जनावरांबरोबर हिंडताना टोळ पकडीत आढळतो. त्याच्या ओरडण्यात तीव्र स्वर आढळतात व ते चंडोल पक्ष्यासारखे वाटतात. कचरा, पाने, गवत व काटक्यांनी बांधलेले गोलसर आकाराचे अव्यवस्थित घरटे हे पक्षी बांधतात. त्यामुळेच ते इतर साळुंक्यांच्या घरट्यांसारखे नसते. शेती-वाडीवर असलेल्या आंब्यांसारख्या झाडांच्या लोंबत्या फांद्यांवर ही घरटी बांधली जातात. एकाच झाडावर 3 किंवा 4 घरटी असणे अपरिचित नाही. स्वच्छ तकतकीत निळ्या रंगाची – 4 किंवा 5 – अंडी घातली जातात.

**गुलाबी सारिका (Rosy Pastor or Rose-coloured Starling)** *(Sturnus roseus)* व रंगीत साळुंकी यांचा ह्यांचा नेहमी घोटाळा होतो. गुलाबी सारिका प्रचंड थव्याने हिवाळ्यात आपल्या देशाला भेट देतात. साळुंकीच्या आकाराचा हा पक्षी काळा आणि गुलबस (पांढरा नव्हे) रंगाचा असतो. पिकलेल्या ज्वारीच्या शेतात व काटेसावर आणि पांगारा वनस्पतींच्या मोठ्या तांबड्या फुलांभोवती हा पक्षी आढळतो.

**काक कुल** (कावळे) (Family CORVIDAE) ह्या कुलाची ओळख करून देण्याची जरुरी नाही. ह्या दुष्ट व सर्वव्यापी पक्ष्याला न ओळखणारा माणूस शहरात वा खेडेगावात सापडणे कठीण आहे.

**कावळा (House crow)** *(Corvus splendens)* – चित्रपत्र 12.68 – हिंदी : *कव्वा* किंवा *देसी कव्वा*, त्याची राखी मान व लहान आकार ह्यांमुळे तो संपूर्ण काळ्या डोमकावळ्यापासून वेगळा ओळखता येतो. कावळा हा सर्व भारतीय पक्ष्यांत अतिपरिचित व सर्वव्यापी पक्षी आहे ह्यात शंकाच नाही. हा शहरात व गावात राहणारा पक्षी मानवी समाजाचा एक घटकच बनून गेला आहे. त्याची बुद्धिमत्ता व धारिष्ट्य, ह्यांच्या बरोबरीनेच संकटांचा वास लागून त्यांतून सुटका करून घेणे, ह्या गुणांमुळे तो आपल्या पापी व दुष्कृत्यांनी भरलेल्या जीवनात यशस्वी होतो. अन्नाच्या बाबतीत त्याच्या नजरेतून काहीही सुटत नाही, मग तो मेलेला उंदीर असो, उघडे अन्न असो, कोळणीची माशांनी भरलेली पाटी असो की तुमच्या ताटामधील पोळीचा तुकडा असो. कावळा ह्या गोष्टी मोठ्या शिताफीने पळवितो. त्याची ही कृत्ये जरी विशेष आवडणारी नसली तरी त्यामुळे तो शहर स्वच्छ ठेवण्याचे काम निश्चित करतो. पण छोट्या छोट्या गोजिरवाण्या व गाणाऱ्या पक्ष्यांना मारण्याच्या सवयीमुळे तो बागेत आलेला आवडत नाही. त्याचप्रमाणे बगळ्यांच्या विणीच्या ठिकाणांना त्याचा फार धोका असतो. त्या जागांभोवती कावळ्यांचे थवेच्या थवे घोटाळत असतात, व माणसाने हाकून दिले म्हणजे त्या घरट्यावर ते उतरतात. पक्ष्यांच्या घरट्यावर हल्ला करून आतल्या पिलांना किंवा अंड्यांना पळवून नेतात व अतिक्रूरपणे खाऊन टाकतात. टोळधाडीच्या वेळी टोळांना खाऊन जरी हे पक्षी मदत करीत असले तरी सुगीच्या गव्हाला, मक्याला व इतर रसाळ फळांना खाऊन फार नुकसान करतात. त्यांचे आर्थिक स्थान म्हणूनच संशयास्पद आहे. काटक्यांचे माचेवजा घरटे कावळा बांधतो. घरट्याला मध्यभागी खोलगट भाग असतो व त्याला चटया, पायपुसण्याचे धागे, इतर प्रकारचे धागे ह्यांचे अस्तर असते. 3 ते 8 मीटर उंचीवर असलेल्या फांद्यांवर हे घरटे बांधले जाते. फिक्या निळसर हिरव्या रंगांच्या – 4 किंवा 5 – अंड्यांवर तपकिरी रेघा व ठिपके असतात. कावळ्याची अंडी कोकिळेच्या अंड्यांसारखीच असतात व म्हणूनच कोकिळा त्याच्याच घरट्यात अंडी घालते.

**डोमकावळा (Jungle Crow)** *(C. macrorhynchos)* हा मोठ्या आकाराचा काळ्या कुळकुळीत रंगाचा पक्षी आहे. त्याची चोच जास्त जाड व आवाजही घोगरा 'क्वाव' असा असतो. साधारणपणे हा पक्षी मनुष्यवस्तीपासून दूर असतो, पण बाजूला पडलेल्या खेड्यांच्या आसपास राहून मानवाने केलेल्या घाणीचा फायदा घेतो.

कावळ्याचा एक सुंदर भाईबंद म्हणजे **टकाचोर (Tree Pie)** *(Dendrocitta vagabunda)* – चित्रपत्र 12.65 – हिंदी : *महालाती*. साळुंकीच्या आकाराच्या ह्या पक्ष्याचे शेपूट मात्र 30 सें.मी. लांब असते. त्याचा रंग चेस्टनट तपकिरी असतो व डोके आणि मान धुरकट काळ्या रंगाची असते. उडताना त्याच्या शेपटीवरील लांब रुंद व काळ्या टोकाची पिसे व पंखांची राखट पिसे स्पष्ट दिसतात. मोकळ्या किंवा विरळ जंगलात ट्री पाय हा पक्षी वास्तव्य करतो. स्वतःचा समाज करून हे पक्षी मोठा, कर्कश व खरखरीत 'के-के-के-के' असा आवाज काढून एकमेकांशी बोलत असतात. वेगाने एका झाडावरून दुसऱ्या झाडावर उडताना आपल्या

संघनायकाच्या मागे झाडावरून ओळीने गेल्यासारखे वाटतात. प्रथम जोराने आवाज करीत पंख हलवून ते हवेत जातात व नंतर पंख आणि शेपटी पसरून तरंगत राहतात. त्यांच्या वर सांगितलेल्या आवाजाखेरीज हे पक्षी नाना प्रकारचे सुस्वर आवाज काढतात. हा आवाज 'बॉब-ओ-लिंक' किंवा 'कोकिळा' असा वाटतो. पाठीची कमान करून, डोके खाली घालून व शेपटी विचित्र पद्धतीने दाबून काढलेले हे आवाज नर विणीच्या हंगामात मादीला उद्देशून काढीत असावा. ट्री पाय हे पक्षी इतर फलाहारी पक्ष्यांसमवेत झुंडीने वड, पिंपळ, उंबर ह्या वृक्षांवर घोटाळत असतात. कावळ्यासारखेच हे पक्षी वाटेल ते खातात. कधी कधी शिळे मांस सुद्धा. कीटक, सरडे, सुरवंट, अळ्या, पक्ष्यांची पिले व उंदरांची पिले हे प्राणीसुद्धा फळांबरोबर हे पक्षी खातात. छोट्या पक्ष्यांची घरटी शोधून काढून त्यांच्या पिलांची शिकार करण्यात हे पक्षी पटाईत आहेत.

ह्यांचे घरटे काटेरी फांद्यांचे पण कावळ्याच्या घरट्यापेक्षा जास्त खोलगट असते. हे घरटे दाट पर्णराजीच्या वृक्षांच्या शेंड्यात लपविलेले असून त्याला मऊ पानांचे व डाहळ्यांचे अस्तर असते. साधारणपणे सालोमन जातीच्या पांढऱ्या रंगावर तांबूस तपकिरी डाग व रेषा असलेली – 4 किंवा 5 – अंडी हे पक्षी घालतात.

**विष्फुलिंग कुलामध्ये** (Family CAMPEPHAGIDAE) ककू-श्राइक आणि मिनिव्हेट ह्या पक्ष्यांचा अंतर्भाव होतो. शेलाट्या चणीचे हे पक्षी आकाराने लहान असून ते मध्यम प्रतीचे असतात व ते झाडावर राहून कीटकांवर निर्वाह करतात. मिनिव्हेट हे भडक रंगाचे पक्षी असून त्यांचे एक उदाहरण म्हणजे **शेंदरी मिनिव्हेट (विष्फुलिंग) (Scarlet Minivet)** *(Pericrocotus flammeus)* – चित्रपत्र 14.84 – हिंदी : पहाडी बुललचष्म. हा पक्षी बुलबुलाच्या आकाराचा असतो. नर वरून तकतकीत काळा कुळकुळीत, खालून शेंदरट-तांबड्यापासून गर्द शेंदरी रंगाचा असतो. मादी व बालक नर वरून राखी आणि ऑलिव्ह-पिवळ्या रंगाचा, खालून पिवळा असा असतो व काळ्या रंगाच्या पंखांवर दोन पिवळे पट्टे असतात. गर्द पर्णराजीच्या वृक्षांच्या शेंड्यांवर ह्या पक्ष्यांची 5 किंवा 6 जणांची टोळकी आढळतात. बहुधा प्रौढ नर व प्रौढ मादी आणि बालक नर एकत्र राहतात. वृक्षांच्या पानांचे छत्र घेत हे पक्षी ह्या झाडावरून त्या झाडावर अस्वस्थपणे उडत असतात व फांद्यांवर किंवा डहाळ्यांवर घिरट्या घालीत उडणाऱ्या कीटकांना पकडण्याच्या उद्योगात असतात. पानांच्या गर्द हिरव्या पार्श्वभूमीवर उडताना नरांचा चकाकता शेंदरी रंग पाहण्यासारखा असतो. उडणारे किडे हवेत पकडून किंवा झाडांच्या पानांवरच्या, कळ्यांवरच्या अळ्या, कोळी व कीटक पकडून हे पक्षी आपला उदर निर्वाह करतात. 'व्ही-ट्वीट' किंवा 'व्हिरिरि' अशा सुस्वर आवाजाचे समूहगीत हे पक्षी गातात. झाडांची मुळे, धागे इत्यादी कोळ्यांच्या जाळ्यांनी एकत्र गुंफून वाटीच्या आकाराची सुबद्ध घरटी हे पक्षी बांधतात. घरट्यांना बाहेरून शेवाळ, लायकेन ह्या वनस्पती आणि कोळ्यांच्या अंड्यांचे कोश लावलेले असतात. 3 ते 15 मीटर उंच

असलेल्या फांद्यांवर घरटी बांधली जातात. फिकट हिरव्या रंगावर गर्द तपकिरी जांभळ्या रंगाचे ठिपके, चट्टे असलेली – 2 ते 4 – अंडी पक्षी घालतात.

**छोटा मिनिव्हेट** *(P. cinnmomeus)* ही मिनिव्हेट पक्ष्यांची लहान जात भारतात व पाकिस्तानात सर्वत्र आढळते. प्रौढ नर प्रामुख्याने काळा, राखी आणि नारिंगी-किरमिजी रंगाचा असतो. मादी व बालक नरांचे डोके काळे नसते आणि खालचा भाग तांबडा नसून पिवळा असतो, फक्त प्रौढ नराप्रमाणे शेपटीच्या बुडाशी तांबडा रंग असतो. शेंदरी मिनिव्हेट दाट जंगलात असतो पण हा छोटा मिनिव्हेट शुष्क, विरळ जंगलात किंवा उद्यानांमधून आढळतो.

**नीलच्छत्र कुल** (Family IRENIDAE) ह्या कुलातील फेअरी ब्ल्यूबर्ड हे पक्षी पश्चिमघाट व पूर्वहिमालय ह्या भागातील सदाहरित जंगलातच मर्यादित आहेत. ह्या पक्ष्यांना हिरवे बुलबुल असेही म्हणतात. हे आयोरा आणि क्लोरोप्सिस किंवा लीफ बर्ड्स बहुधा सर्वत्र आढळतात.

**सुभग (शुकिक) (Common Iora)** *(Aegithina tiphia)* – चित्रपत्र 14.82 - हिंदी : *शौबिगी*. चिमणीच्या आकाराचा नर तुकतुकीत काळाकुट्ट आणि पिवळा पक्षी असून पंखांवर दोन पांढरे पट्टे असतात. विणीच्या हंगामाखेरीज इतर दिवसांत नर मादीसारखाच असतो. फक्त त्याचे शेपूट मात्र काळे असते. गावाजवळच्या रायांमधून किंवा बागांमधून राहणारा हा पक्षी कायम झाडावरच असतो. ह्या पक्ष्यांचे जोडपे उड्या मारीत फांद्यांवर फिरत असताना बाजूने किंवा उलटे वाकून अळ्या, सुरवंट व किडे पकडते. मंजुळ शिट्या व चिवचिव आवाज करून ते एकमेकांशी संपर्क ठेवतात. त्यांचे हिंदी शौबिगी हे नाव त्यांच्या लांबलचक शिटीचे यथार्थ वर्णन करते. नर अतिशय आकर्षक व विलक्षण प्रणयक्रीडा करतो. मादीचा पाठलाग करून, सुस्वर व मंजुळ शिटी वाजवीत किंवा लांबलचक 'छी-ई' असा आवाज काढीत, पंख खाली ओघळून व बुडापासली पिसे पसरून हा नर तिच्यासमोर खेळ करतो. एकदोन मीटर उंच उडून आपले आकर्षक पंख दाखवीत व पॅरशूटप्रमाणे गिरक्या घेत हा खाली येतो. ह्या पक्ष्याचे घरटे सुबक असते. मुळांचे धागे आणि मऊ गवत एकत्र विणून वाटीच्या आकाराच्या ह्या घरट्याला बाहेरून कोळिष्टकांचा लेप दिलेला असतो. घरटे फांद्यांवर बांधलेले असते. फिक्कट गुलबस पांढऱ्या रंगावर जांभळट तपकिरी रंगाचे चट्टे असलेली 2 ते 4 अंडी घातली जातात.

**मार्शल्स आयोरा (Marshal's Iora)** *(Ae. nigrolutea)* हा वरच्या पक्ष्यासारखाच पक्षी कच्छ, राजस्थान, पंजाब, मध्यप्रदेश आणि बंगाल ह्या भागांत सापडतो. त्याच्या शेपटीचे टोक पांढरे असते.

**जेरडोनचा क्लोरॉप्सिस (Jerdon's chloropsis)** *(Chloropsis Cochinchinensis jerdoni)* चित्रपत्र 14.81 – हिंदी : *हरेवा*. गवतासारख्या हिरव्या

रंगाच्या नखरेबाज पक्ष्याचा आकार बुलबुलाएवढा असतो. अंगावर जांभळट निळ्या रंगाच्या मिशीसारख्या रेघा असतात. गाल, हनुवटी, गळा काळ्या रंगाचे असून चोच बारीक पण किंचित बाकदार असते. मादीचा गळा व हनुवटीचा भाग निळसर हिरवा असून अंगावरील रेघा हिरवट निळ्या रंगाच्या असतात. साधारणपणे हे पक्षी जोडीने किंवा लहान टोळक्यात एकत्र वावरताना आढळतात. झाडांच्या फांद्यांवर, डहाळ्यांवर उलटेसुलटे पकडून इकडेतिकडे हालचाल करीत हे पक्षी उद्योगात मग्न असतात. ह्या पक्ष्यांचा रंग सभोवतालच्या पर्णसृष्टीशी इतका बेमालूम मिसळलेला असतो की पक्षी दिसण्याऐवजी नेहमी ऐकूच येतात. त्याचा आवाज ऐकूनसुद्धा हा पुष्कळ वेळा दिसत नाही ह्याचे कारण हा पक्षी शिंपी, बुलबुल, कोतवाल, सुभग, पांढऱ्या छातीचा खंड्या आणि दयाळ ह्या पक्ष्यांच्या आवाजाची सहीसही नक्कल करतो. हा पक्षी वर सांगितलेल्या पक्ष्यांचे आवाज ओळीने न थांबता काढतो त्यामुळे त्या भागात जणू काही निरनिराळ्या पक्ष्यांचे जागतिक संमेलनच भरले असावे असे वाटते. झाडाच्या जवळ जाऊन अधिक निरीक्षण करू लागल्यास क्लोरॉप्सिस झटकन उडून जातो. जाताना "आपण या माणसाला कसे फसविले" ह्या आविर्भावात आनंदोद्गार काढीत तो निघून जातो. त्याचे अन्न कीटक, कोळी, फळे, रसाळ फळे आणि फुलातील मधुरस ह्यांचे बनलेले असते.

तणावे, शेवाळ, मुळ्या ह्यांचे बांधलेले उथळ व सैलसर वाटीच्या आकाराचे घरटे हे पक्षी तयार करतात. घरट्याला आतून मऊ अस्तर असते. लोंबत्या फांदीवर सहसा दिसणार नाही अशा ठिकाणी हे घरटे बांधले जाते. तांबूस क्रीम रंगाची नेहमी - 2 - अंडी घालतात. अंड्यांवर शेंदरी रंगाचे ठिपके असतात.

**सोनेरी छातीचा क्लोरॉप्सिस (Gold-fronted chloropsis)** *(C. aurifrons)* ही जेरडोनच्या जातीशी जुळणारी दुसरी जात. बहुधा ह्या दोन्ही जातींचे पक्षी एकाच परिसरात सापडतात. त्या पक्ष्यांच्या नराचे कपाळ चकाकते सोनेरी असते, गळा व हनुवटी जांभळी आणि काळ्या रंगाची असते. मादीचे हे सर्वच रंग फिके असतात आणि कपाळाचा सोनेरी रंग सुद्धा गडद नसतो.

**अंगारशिख कुल** (Family PYCNONOTIDAE) भारतामधील नैसर्गिक उद्यानात शोभा आणणाऱ्या, आनंदी व खेळकर जातींच्या बुलबुलांचा प्रकार ह्या कुलात अंतर्भूत होतो.

**लालगाल्या बुलबुल (Red-whiskered Bulbul)** *(Pycononous jocosus)* — चित्रपत्र 14.80 – हिंदी : *पहाडी बुलबुल* : छोट्या झुडपांमधून वावरणारा हा पक्षी आहे. साळुंकीपेक्षा लहान आणि बारीक अंगाचा हा पक्षी असून त्याच्या डोक्यावर पुढे झुकलेला तुरा असतो. वरून भुरकट केसांच्या रंगाच्या, खालून पांढरा असलेल्या ह्या पक्ष्याच्या छातीवर काळसर ठिपक्यांची माळ असते. शेपटीच्या बुडाशी किरमिजी रंग असतो व त्याच रंगाच्या पिसांच्या तोंडापाशी मिशा असतात. निवारा आणि अन्न ज्या भागात हमखास मिळेल अशा

बागामधील झाडाझुडपात, काही वेळा गजबजलेल्या शहरांमधील उद्यानात, ह्या पक्ष्यांची वसती असते. हे पक्षी बहुधा जोडीने एकत्र असतात पण फळांनी बहरलेल्या वृक्षांवर त्यांचे थवेही एकत्र होतात. ह्या पक्ष्यांचे वैशिष्ट्यपूर्ण असे गाण्याचे स्वर नाहीत परंतु दिवसभर त्यांचा पिरपिरा स्वर मात्र ऐकू येतो. रसाळ फळे, विशेषतः टंटणीची, हे त्यांचे मुख्य खाद्य आहे. कोळी, कीटक व अळ्या ह्या प्राण्यांवरही हा पक्षी उदरनिर्वाह करतो. लालबुड्या बुलबुलाप्रमाणे हा बुलबुल भांडखोर नसतो. आणि म्हणूनच त्याच्या लहान वयातच पाळावयास नेला तर तो लवकरच पाळीव बनतो. मग आपल्या मालकाच्या पाठोपाठ हा फिरतो आणि मालकाने बोलाविले तर लांब अंतरावरून सुद्धा त्याच्याकडे येतो. इतर बुलबुल पक्ष्यांप्रमाणेच ह्या बुलबुलाचे घरटे मुळ्या, बारीक फांद्या आणि गवताने बांधलेल्या वाटीच्या आकाराचे असते. खुज्या झाडांवर, झुडपांवर किंवा कुंपणांच्या सहज दिसून येणाऱ्या जागी हा पक्षी आपले घरटे बांधतो. शिवाय ह्याच्या चळवळ्या स्वभावामुळे तो आपल्या घरट्याचे स्थान अगदी उघडे पाडून दाखवितो. त्यामुळे ह्याच्या शत्रूपासून अंड्याचे व पिलांचे खूपच नुकसान होते. झोपड्यांमध्ये राहणाऱ्या माणसांच्या सान्निध्यात छपरावर किंवा भिंतीवरही हा प्राणी घरटे बांधतो. गुलबस पांढऱ्या रंगावर शेंदरी किंवा जांभळट तपकिरी रंगाचे मोठे डाग असलेली – 2 ते 4 – अंडी हा पक्षी घालतो.

**श्वेतगाल्या बुलबुल (White-cheecked Bulbul)** *(P. leucogenys)* भारताच्या उत्तर व वायव्य प्रदेशात हा पक्षी लालबुड्या बुलबुलाची जागा घेतो. त्याचे गाल स्वच्छ पांढरे असतात. मिशा नाहीत. शेपटीच्या बुडाशी किरमिजी रंगाऐवजी पिवळ्या रंगाचा भाग असतो. डोक्यावरचा तुरा विविध प्रकारचा असू शकतो. गुजरातमधील बुलबुलांचा तुरा गोलसर पुंजक्यासारखा असतो तर काश्मिरातील बुलबुलांचा तुरा टोकदार आणि पुढे झुकलेला असा असतो.

**लालबुड्या बुलबुल (Red-vented Bulbul)** *(Pyconotus cafer)* – चित्रपत्र 14.79 – हिंदी *बुलबुल* किंवा *गुल्दम.* सर्वांच्या परिचयाच्या ह्या पक्ष्याचा रंग काळसर उदी असतो, काळ्या डोक्यावर झाडणीवजा तुरा असतो, पाठीवर आणि छातीवर खवल्यांसारख्या खुणा असतात आणि शेपटीच्या बुडाशी (गुदद्वाराशी) दाट तांबड्या रंगाचा डाग असतो. शेपटीचे टोक पांढरे असते व उडताना ते स्पष्ट दिसते. गावात अगर आसपासच्या रायांमधून किंवा झुडपांच्या प्रदेशात हा पक्षी नेहमीच आढळतो. परंतु जंगलांच्या भागात ह्याची जागा लालगाल्या बुलबुलाने घेतलेली असते. हा पक्षी गाणारा नाही परंतु त्याच्या आनंदी स्वरांमुळे व उत्साही स्वभावामुळे मनुष्य त्याचे स्वागत करतो. हिरवे वाटाणे आणि तत्सम खाद्याची त्याला विशेष आवड असल्यामुळे काही वेळा मात्र हा पक्षी त्रासदायक वाटतो. रसाळ फळे हा त्याचा मुख्य आहार. परंतु त्याचबरोबर तो फुलपाखरे आणि सुरवंट ह्यांचाही समाचार घेतो. पहिल्या पावसानंतर जमिनीतल्या भोकांमधून बाहेर उडावयास लागणारे पंखांचे कीटक हा पक्षी तत्परतेने टिपतो.

लालगाल्या व लालबुड्या ह्या दोन्ही जातींच्या बुलबुलांचा स्वभाव व राहण्याची पद्धत

जवळ जवळ सारखीच असते. फक्त लालबुड्या हा जास्त भांडखोर असतो. त्यामुळेच पक्षीप्रेमी लोकांमध्ये हा लढाऊ पक्षी म्हणून विशेष लोकप्रिय आहे. सुटीच्या दिवसात ह्या पक्ष्यांची लढाई लावण्याचा खेळ बराच लोकप्रिय आहे. पक्ष्यांच्या मालकांमध्ये तीव्र विरोध आणि ईर्ष्या असते. लढाईत मोठ्या रकमांच्या पैजा लागतात व विजयी पक्ष्याला खूपच भाव मिळतो. बारीक काटक्या, मुळ्या व गवताचे बनविलेले वाटीच्या आकाराचे घरटे हा पक्षी जमिनीपासून थोड्या उंचीवर झुडपांमध्ये अगर धावऱ्या वनस्पतींमध्ये व्हरांड्यात बांधतो. घरट्यापासून जवळच माणसांचा वावरही असतो. लालगाल्या बुलबुलाच्या अंड्यांपासून वेगळी न ओळखता येणारी दोन किंवा तीन अंडी हा पक्षी घालतो.

कुलिंग गणातील (Order PASSERIFORMES) **शलभाश कुलात** (MUSCICAPIDAE) अनेक जातींच्या पक्ष्यांनी गर्दी केली आहे. ह्या कुलात नाचरा (Flycatcher), सातभाई (Babbler), वटवट्या (Warbler) व कस्तूर (Thrush) ह्यांसारखे विविध प्रकारचे भिन्न भिन्न पक्षी अंतर्भूत केले आहेत. ते जरी बाह्यतः भिन्न असले तरी त्यांची अंतर्गत रचना व सवयी पुष्कळच सारख्या आहेत. त्यांच्यामधील सूक्ष्म फरकांची चर्चा ह्या ठिकाणी अप्रस्तुत आहे. ह्या कुलामधील थोडीशी उदाहरणे पुरी होतील.

**पांढऱ्या ठिपक्यांचा नर्तक (नाचरा) (White-spotted Fantail Flycatcher)** *(Rhipidura albogularis)* – चित्रपत्र 15.89 – हिंदी : *नाचन, चक्दिल*. हा पक्षी बहुतेकांच्या परिचयाचा आहे. चिमणीच्या आकाराचा हा पक्षी धुरकट-तपकिरी रंगाचा असतो, भुवया पांढऱ्या असतात, छातीवर आणि बाजूला पांढरे ठिपके असतात, आणि पोट पांढरे असते. हा पक्षी जितका आनंदी तितकाच अस्वस्थ असतो. शेपूट पंख्याप्रमाणे पसरून उभारलेले असते आणि हेच त्याला ओळखण्याचे मुख्य लक्षण होय. जंगलात, बागांमधून, राईत एवढेच नव्हे तर गावातील झाडाझुडपांवरून हा पक्षी दिसून येतो. माणसाची तो फारशी भीती बाळगत नाही, आणि म्हणूनच तो एक सुंदर पाळीव पक्षी झाला आहे. हे पक्षी बहुधा जोडीनेच फिरतात. प्रत्येक जोडीच्या कार्याचे क्षेत्र मात्र ठरलेले असते. ह्या क्षेत्रात ही जोडी झाडाझाडावरून इकडे तिकडे नाचताना व हिंडताना भेटते. उडणाऱ्या कीटकांना हवेतच पकडण्यासाठी हे पक्षी कोलांट्या-वेलांट्या मारीत उडत असतात, व चिपळ्यांप्रमाणे मिटणाऱ्या चोचीत ते किडे पकडतात. चक-चक असा कर्कश आवाज ते करतात. पण त्याचबरोबर इकडे तिकडे हिंडताना स्वरबद्ध व मंजुळ अशी गाणारी शिटी पण हे पक्षी वाजवितात. डास, माश्या आणि इतर उडणारे कीटक हे त्यांचे भक्ष्य. हे पक्षी दारूच्या पेल्याच्या आकाराचे सुरेख घरटे बांधतात. पातळ गवत आणि धागे ह्यांनी तयार केलेल्या घरट्याला आतून व बाहेरून कोळिष्टकांनी विणलेले असते. आयोरा पक्ष्याच्या घरट्यापेक्षा हे घरटे जरा अजागळ वाटते; कारण त्यापासून धागे, गवत इत्यादी गोष्टी लोंबत असतात. आंबा, चिकू ह्यांसारख्या झाडांच्या खालच्या फांद्यांवर ही घरटी बांधलेली असतात. घरटी साधारणपणे जमिनीपासून 3 मीटरच्या

वर नसतात. गुलबस पांढऱ्या रंगावर रुंद टोकावर बारीक तपकिरी ठिपके असलेली 3 अंडी हे पक्षी घालतात.

ह्याच्याचसारखा दिसणारा **पांढऱ्या भुवयांचा नर्तक (White-browed Fantail Flycatcher)** *(R. aureola)* पक्षी पांढऱ्या कपाळाचा व खालून पांढरा असा असतो. हा सर्व भारतात सापडतो.

**स्वर्गीय नर्तक (सुरंगी) (Paradise Flycatcher)** *(Terpsiphone paradisi)* – चित्रपत्र 15.87 – हिंदी : *शाह बुलबुल,* किंवा *दूधराज,* अतिशय सुरेख व परीसारखा दिसणारा हा पक्षी बुलबुलाच्या आकाराचा पण 25 ते 30 सें.मी. लांबीची शेपटी असलेला आहे. प्रौढ नर रुपेरी पांढरा असतो, त्याची शेपटीची पिसे लांब फितीसारखी असतात, डोके काळे चकाकते असून त्याच रंगाचा तुरा असतो. मादी आणि बालक नर वरून चेस्टनट रंगाचे, खालून राखट पांढऱ्या रंगाचे आणि काळ्या डोक्यावर त्याच रंगाचा तुरा असलेले असतात. मादीला शेपटीची लांब पिसे नसल्यामुळे ती बुलबुलासारखीच दिसते पण बालक नराच्या शेपटीला मात्र लांब चेस्टनट रंगाची पिसे असतात. सुरंगी दाट राई, बागा आणि नाल्याभोवतालच्या बांबूंच्या जंगलात राहतो. ह्याला इंग्रजीत रॉकेट बर्ड, विडो बर्ड, आणि रिबन बर्ड अशी नावे प्रचलित आहेत. साधारणपणे हे पक्षी जोडीने असतात पण इतर कीटकभक्षक पक्ष्यांबरोबरही हे सापडतात. उडणाऱ्या कीटकांना पकडण्यासाठी नरपक्षी उंचावर वेलांट्याकोलांट्या घेत उडताना विलक्षण मनोवेधक दिसतो. उडताना त्याच्या शेपटीची लांब पिसे फर्रर् फर्रर् असा आवाज करतात. इतक्या सुंदर पक्ष्याला गाता येत नाही. नेहमी हा पक्षी कर्कश व खरखरीत 'छी' किंवा 'छी-च्वी' असा आवाज काढतो. विणीच्या हंगामात मात्र नर व मादी दोघेही विविध प्रकारचे आवाज काढतात. हेच त्यांचे गाणे. माश्या, डास, फुलपाखरे इत्यादी कीटक हे त्यांचे अन्न. साधारणपणे सुरंगी पक्षी आपली घरटी भारतात सर्वत्रच बांधतात पण हे पक्षी विशेषेकरून काश्मीरच्या खोऱ्यात अधिक प्रमाणात घरटी बांधतात व त्या भागाचे नैसर्गिक सौंदर्य द्विगुणित करतात. कोळिष्टकांनी गुंफलेल्या पातळ गवताच्या पाती व धागे ह्यांचे सुबक वाटीच्या आकाराचे घरटे हे पक्षी बांधतात. घरट्यांना बाहेरून कोळिष्टके आणि कोळ्यांचे अंडीकोष चिकटविलेले असतात. जमिनीपासून 2 ते 5 मीटर उंचीवर असलेल्या फांद्यांवर हे पक्षी घरटी बांधतात. फिकट गुलबस रंगावर तांबूस तपकिरी रंगाचे ठिपके व चट्टे असलेली – 3 ते 5 – अंडी हे पक्षी घालतात.

सातभाई (Babblers) ह्या सर्वसाधारण नावाने ओळखले जाणारे पक्षी मध्यम आकाराचे, तपकिरी किंवा दाट रंगाचे व कळप करून राहणारे आहेत. **मुखर कुलातील** (Family TIMALIINAE) काही पक्षी खालीलप्रमाणे आहेत :

**पिवळ्या डोळ्यांचा सातभाई (Yellow-eyed Babbler)** *(Chrysomma sinensis)* – चित्रपत्र 15.92 – हिंदी : *बुलालचष्म.* गवताळ व लहान झुडपांच्या प्रदेशात राहणारा, लांबसर शेपटीचा हा पक्षी बुलबुल पक्ष्यापेक्षा थोडा लहान असतो. वरून दालचिनी (तांबूस

पिंगट) किंवा चेस्टनट रंगाचा, खालून पांढरा, नारिंगी-पिवळ्या रंगाच्या पापण्या आणि पिवळे डोळे असलेला हा पक्षी आहे. दोन शेतांमधल्या बंधाऱ्यावर किंवा खुरट्या काटेरी झुडुपांच्या प्रदेशांत 5 ते 7 जणांच्या टोळ्या करून हे पक्षी राहतात. झुडपांच्या खोडावर चढून व उलटे होऊन किडे शोधताना हे पक्षी आढळतात. हे पक्षी मोठे अंगचोर असतात आणि त्यांना धोक्याचा इशारा मिळाला म्हणजे झुडपांच्या आश्रयाने उड्या मारीत व कर्कश आवाज करीत ते झुडपांमध्ये लपून बसतात. 'चीप-चीप-चीप' असा मोठा, स्पष्ट व शोकपूर्ण आवाज हे पक्षी काढतात. विणीच्या हंगामात नर धीटपणे मोकळ्या उंच जागेवर येऊन उच्च स्वरात सुरेल गाणे गातात. कोळी, नाकतोडे, कीटक, हे त्यांचे जरी अन्न असले तरी काटेसावरीच्या फुलांसारख्या भडक रंगाच्या फुलांमधील मधुरसही ते गोळा करून खातात. गवताचे वाटीच्या आकाराचे घरटे हा पिवळ्या डोळ्याचा सातभाई बांधतो. घरट्याला आतून मऊसर वस्तूंचे अस्तर व बाहेरून कोळिष्टके लावलेली असतात. जमिनीपासून सुमारे 2 मीटर उंचीवर, फांद्यांच्या दुबेळक्यात किंवा पावसाळी गवतांच्या दांड्यांवर पिशवीसारखी ही घरटी अडकवून ठेवलेली असतात. पिवळसर पांढऱ्या रंगावर जांभळट तपकिरी रंगाचे ठिपके व शिडकावे असलेली – 4 किंवा 5 – अंडी हे पक्षी घालतात.

**बडा सातभाई (बैरागी)** **(Jungle Babbler)** *(Turdoides striatus)* – चित्रपत्र 15.88 – हिंदी : *सातभाई किंवा घोंघई.* साळुंकीपेक्षा जरा लहान असलेला हा पक्षी मातट तपकिरी रंगाचा व गबाळा असतो. त्याचे लांब शेपूट अंगाखाली खेचल्यासारखे दिसते. हा पक्षी नेहमी सहा-सात जणांच्या घोळक्याने राहतो म्हणूनच त्याला 'सातभाई' किंवा 'सेव्हन सिस्टर्स' असे म्हणतात. गावाच्या व शहराच्या आसपासची राई, जंगलांच्या कडेने दाट वृक्षांच्या बागा यांमधून हा पक्षी वावरताना आढळतो. सातभाईची टोळकी जमिनीवरील पालापाचोळा उसकटून किडे शोधीत असतात. हे सातभाई जंगलात कीटकांच्या शोधार्थ हिंडणाऱ्या पक्ष्यांच्या टोळक्यांचे केंद्रस्थान निर्माण करतात. अन्नशोधार्थ हिंडताना ह्यांची एकमेकाशी एकसारखी कर्कश बडबड चालू असते आणि त्यांच्या त्या छोट्या कळपामध्ये ते सहकारी वृत्तीने एकत्र राहतात. काही वेळा मतभेदांचे प्रसंग उद्भवतात आणि मग एकमेकांत स्वैर लढाई होते. लढाईत चोच व नखे ह्यांचा शस्त्र म्हणून वापर केला जातो. ह्यावेळी तर त्यांचे बडबडणे ओरडण्यात रूपांतर पावते व लढाईच्यानंतर त्या जागी पिसांचा खच पडतो. अर्थात ही भांडणे फार वेळ टिकत नाहीत व वारंवार होत नाहीत त्यामुळेच भांडणानंतर लवकरच दिलजमाई होऊन ते टोळके पुन्हा नेहमीप्रमाणे व्यवहार करू लागते. दुसऱ्या एखाद्या पक्ष्याने हल्ला केला तर हे टोळके एकत्र येऊन संयुक्त आघाडी उघडते. त्यांच्यापैकी ज्याच्यावर एखाद्या ससाण्याने हल्ला केला असेल त्याच्या मदतीला व संरक्षणाला सर्वजण धावतात व हल्लेखोराला आरडाओरडा करून धीटपणे व निश्चयाने हाकलून देतात. कोळी, झुरळे, फुलपाखरे, इतर कीटक व अळ्या हे त्यांचे अन्न. वड, पिंपळ, टंटणी ह्यांची फळे व इतर रसाळ फळे, बी, धान्यांचे दाणे हे पदार्थ सुद्धा सातभाई आवडीने खातात. ह्या पक्ष्यांना काटेसावरीच्या फुलांमधील मधुरसाचे विलक्षण आकर्षण असते; त्यामुळे हे पक्षी त्या फुलांचे परागीभवन

करण्यास मदत करतात. मुळ्या आणि फांद्या ह्यांचे सैलसर बांधणीचे वाटीच्या आकाराचे घरटे फांद्यांच्या दुबेळक्यात जमिनीपासून 3 ते 5 मीटर उंचीवर तयार केले जाते. सुरेख फिकट निळ्या रंगाची – 3 किंवा 4 – अंडी हे पक्षी घालतात. सहकारी तत्त्वावर घरटी बांधणे, पिलांना भरविणे ही पद्धत नेहमी आढळते. म्हणजे प्रत्यक्ष माता-पित्यांखेरीज इतर नर-मादी पण त्यांच्या पिलांना खाऊ घालतात. पावशा (Sparrow Hawk) आणि चातक (Pied Crested Cuckoo) हे पक्षी सातभाईच्या घरट्यांमधून आपली त्याच निळ्या रंगाची अंडी घालतात.

**छोटा सातभाई (Common Babbler)** *(Turdoides caudatus)* – चित्रपत्र 15.90 – हिंदी : *डुमरी किंवा चिचिल.* हा सर्वपरिचित पक्षी बुलबुल पक्ष्याएवढा असतो, पण त्याची शेपूट मात्र लांब असते. बड्या सातभाईपेक्षा जरा लहानसर अंगाचा हा पक्षी त्याच्याचप्रमाणे सहा किंवा सातांच्या घोळक्याने जमिनीवर व काटेरी झुडपांच्या प्रदेशात सापडतो; वरून मातकट तपकिरी रंगावर ठळक रेघा असतात व लांब शेपटीवर उभे आडवे पट्टे असतात. अळ्या व कीटकांच्या शोधार्थ हिंडताना हे पक्षी उंदरांप्रमाणे लगबग चालत झुडपांच्या खालून पळत असतात. साधारणपणे त्यांना उडण्याचा कंटाळा असतो व धोक्याचे वेळी ते आपल्या पायांवर अधिक विश्वास ठेवून झुडपाखालून पळत सुटतात. त्यांचे उठणे क्षीण असते. पंखांची त्वरित उघडझाप करून ते उड्डाण करतात व मग पंख आणि शेपटी पसरून काही वेळ तरंगत राहतात. त्यांचा आवाज म्हणजे ओळीने वाजविलेल्या छोट्या शिट्या. एखादा साप किंवा मांजर दिसले म्हणजे ह्यांच्यात घबराट निर्माण होते व त्यावेळी 'विच-विच-विची-री-री-री-री-री-री' अशी सुस्वर शीळ वाजवितात. अशा वेळी ते सर्व सहासात जण एकदम ओरडण्यास लागून त्या हल्लेखोराकडे निंदात्मक आवाज फेकीत राहतात. कोळी, कीटक, रसाळ फळे, बी, धान्ये आणि फुलांमधील रस हे पदार्थ त्यांचे अन्न होय. जमिनीपासून केवळ दोन मीटर उंचीवर काटेरी झुडपांच्या फांद्यांमध्ये गवत आणि मुळ्या ह्यांचे नीट बांधलेले वाटीच्या आकाराचे घरटे हे पक्षी तयार करतात. चकाकत्या फिकट निळ्या रंगाची – 3 किंवा 4 – अंडी हे पक्षी घालतात. त्यांच्या इतर भाईबंदांप्रमाणेच ह्या पक्ष्यांच्या घरट्यात पावशा व चातक पक्षी आपली अंडी घालतात.

छोट्या सातभाईसारखाच दिसणारा दुसरा पक्षी म्हणजे **मोठा राखी सातभाई (Large Grey Babbler)** *(T. malcolmi)* हा पक्षी राखट तपकिरी रंगाचा, राखी कपाळ व शेपटीची (पसरली असताना दिसणारी) बाहेरची पांढरी पिसे ह्यामुळे ओळखू येतो. दक्षिण पठारात हा सर्वत्र आढळतो.

वटवट्या किंवा बडबड्या ह्या नावाने ओळखले जाणारे पक्षी मंद रंगाचे आणि चिमणीहूनही लहान आकाराचे असतात. त्यांचे संघ म्हणून वर्णन करणे कठीण आहे. बऱ्याचशा जाती स्थायिक आहेत तर काही स्थलांतर करणाऱ्या आहेत. **सिल्व्हिनी** (SYLVIINAE) या उप कुलामधील काही परिचित व सर्वत्र सापडणाऱ्या पक्ष्यांचे वर्णन खाली देत आहोत.

**राखी वटवट्या (Ashy Wren-Warbler)** *(Prinia socialis)* – चित्रपत्र 13.70

हिंदी : *फुटकी* (सर्व वटवटे). हा पक्षी वरून राखी रंगाचा, खालून पिंगट पांढऱ्या रंगाचा, शेपटी लांब सैलसर काळ्या व पांढऱ्या टोकांची पिसे असलेली असा असतो. शेपटी नेहमी थोडीशी वर खेचलेली असते आणि कायम वर-खाली केली जाते. हिवाळ्यात पिसांचा रंग तपकिरी (कमी राखट) होतो. भरपूर पाणी असलेल्या बागांमधून हा पक्षी आढळतो. हा पक्षी जरी लाजाळू नसला तरी तो धीट नसतो व म्हणूनच ती नेहमी झुडपांच्या आडोशाने, शेपटी सैल व वर खेचून 'टी-टी-टी' असा कर्कश आवाज करीत कीटक व त्यांच्या अळ्या शोधीत हिंडत असतो. विणीच्या हंगामात तो प्रणयक्रीडेचे वेळी एखाद्या उंचवट्यावर बसून सुरेख लकेऱ्या मारतो. तो इकडे तिकडे भराऱ्या मारतो, शेपटी वरखाली करतो आणि पंख फडफडावितो. त्याच्या वरखाली उडण्यामुळे जणू काही त्याचे शेपूट जड असल्यामुळेच तो ह्या प्रकारचे अंगविक्षेप करतो असे वाटते. त्याला जर घरट्यात डिवचले तर रागारागाने भराऱ्या मारतो. अशा वेळी आपल्या इतर भाईबंदांबरोबर एक विशिष्ट प्रकारचा तीव्र 'किट्-किट्-किट्' असा स्फुलिंगांप्रमाणे उडणारा आवाज काढतो. चोचीची जलद उघडझाप करून हा आवाज निर्माण केला जात असावा अशी कल्पना आहे, पण ही कल्पना अद्याप सिद्ध झालेली नाही. राखी वटवट्याचे घरटे पानांचे — नरसाळ्याच्या आकाराचे — शिंपी पक्ष्यासारखे सुरेख विणलेले असते. खूप मोठी पाने जेव्हा उपलब्ध नसतील त्यावेळी धाग्यांच्या लांबसर पिशवीला कोळिष्टकांनी थोडी पाने बांधून घरटे तयार केले जाते. जमिनीपासून दीड मीटर उंचीवर घरटे असते. रुंद टोकाला काळे वर्तुळ असलेली विटकरी तांबड्या रंगाची – 3 किंवा 4 – अंडी घातली जातात.

**भारतीय वटवट्या (Indian Wren-Warbler)** *(P. subflava)* वरून वटवट्या पक्ष्याच्या हिवाळी रंगासारख्या मातट तांबूस रंगाचा असतो. शेपटीच्या टोकाला ठिपके नसल्यामुळे व तो अधिक शुष्क प्रदेशात राहात असल्यामुळे ओळखता येतो.

**शिंपी (Tailor Bird)** *(Orthotomus sutorius)* – चित्रपत्र 13.69 – हिंदी : *दर्जी*. किपलिंगच्या 'जंगल बुक' ह्या पुस्तकात प्रसिद्धी पावलेला हा पक्षी सर्वांनाच परिचित आहे. हा पक्षी वरून ऑलिव्ह-हिरव्या रंगाचा, खालून पांढरट रंगाचा, डोक्याच्या वरचा भाग गंजासारखा तांबूस, आणि उभारलेल्या शेपटावर लांब निमुळती पिसे असणारा आहे. रानात, बागांमधून किंवा लोकवस्तीमधील दाट झुडपांमधून हा पक्षी एकटा किंवा जोडीने राहतो. हा पक्षी धीट आहे आणि म्हणूनच केव्हा केव्हा घराच्या व्हरांड्यातही तो येतो. माणसांच्या आसपास हा पक्षी उड्या मारीत किडे वेचीत किंवा घरट्यासाठी धागे वेचीत हिंडताना दिसतो. त्याचा 'टोविट् टोविट् टोविट्' किंवा 'प्रिटी-प्रिटी-प्रिटी' असा मोठा आनंदी आवाज उपनगरांतील बागांमधून नेहमी ऐकू येतो. कीटक, त्यांची अंडी, अळ्या व सुरवंट हे त्याचे मुख्य खाद्य पण त्याचबरोबर पांगारा व काटेसावरी ह्या झाडांवरील भडक रंगाच्या फुलांमधील मधुरस गोळा करणे त्याला अधिक आवडते. शिंपी हा पक्षी त्याच्या सुरेख व सुबद्ध घरट्यासाठी प्रसिद्ध आहे. सर्व पक्ष्यांमधील अतिशय कुशल असा हा वास्तु (शिल्पी) आहे. घरटे म्हणजे मऊ धागे, केस, लोकर ह्यांची बांधलेली वाटीच्या आकाराची पिशवी असते. मोठ्या लांब-रुंद

पानांच्या कडा एकावर एक शिवून नरसाळ्याच्या आकाराच्या पिशवीत हे घरटे ठेवण्यात येते. मोठे पान नसेल तर तीनचार लहानलहान पाने एकत्र शिवली जातात. निरनिराळे धागे पिळून व गाठी मारून ताण सहन करण्याइतपत जोरदार केले जातात. क्रोटन, वड, पिंपळ, ह्यांची पाने व्हरांड्यामधील कुंडीतून घेऊन घरटे तयार करतात. घरटे जमिनीपासून एकदोन मीटर उंचीवर असते. तांबूस किंवा निळसर पांढऱ्या रंगावर तपकिरी तांबूस रंगाचे ठिपके असलेली –3 किंवा 4 – अंडी घातली जातात.

**दयाळ (Magpie Robins)** *(Copsychus saularis)* – चित्रपत्र 15.94 – हिंदी : *दैयार* किंवा *दैया*, नेहमी आढळणारा व परिचित असा हा **टर्डिने** (TURDINAE) या उपकुलातील पक्षी आहे. शेपटी उभारलेला काळा-पांढरा नर असतो. मादीमध्ये नरामधील काळ्या जागांवर राखी रंग असतो. मनुष्यवस्तीच्या आसपास किंवा विरळ जंगलात हा पक्षी एकटा किंवा जोडीने आढळतो. विणीचा हंगाम सोडून इतर वेळी नर एकटाच हिंडत असतो. त्यावेळी तो शांत असतो. झुडपांमधून वावरताना तो 'स्वीई' आणि कर्कश 'चरर्, चरर्' असा आवाज मधूनमधून काढतो. उन्हाळ्याचे दिवस आले म्हणजे ह्याचा आवाज सुधारतो व सुस्वर गायक पक्षी म्हणून तो ओळखला जातो. शमा पक्ष्याप्रमाणे जरी विशेष आकर्षक नसले तरी सुंदर व सुरेल गाणे गात हा पक्षी आपले झकपक अंग फडफडावीत व चमकावीत झाडांवरून इकडे तिकडे उडताना जेव्हा दिसतो तेव्हा विलक्षण आकर्षक वाटतो. गाताना शेपूट दबलेले आणि थोडे पसरलेले असले तरी जणू काही ताल धरण्यासाठी ते वरखाली केले जाते. ह्याचे साऱ्या दिवसभर व जवळ जवळ संध्याकाळपर्यंत अखंड गान चालू असते. आपल्या क्षेत्राचे रक्षण करताना किंवा विणीच्या हंगामात नर फार भांडखोर बनतो. मादीला आकर्षित करण्यासाठी आपल्या इतर स्पर्धकांबरोबर हा तिच्या समोर आपला दिमाख प्रदर्शित करतो. त्यावेळी शेपटी पाठीवर उंच करून, पसरून, छाती फुगवून आणि चोच वर आकाशाकडे करून हा नर तिच्या समोर नाचतो व डोलतो. कीटक हे त्याचे मुख्य अन्न असले तरी पांगारा व काटेसावरीच्या भडक फुलांमधील मधुरसाचे आकर्षण त्याला सुटत नाही. मधून रसाळ फळेही हा पक्षी खातो. झाडांच्या खोडावरील भोके, भिंतीमधील भोके, गटाराच्या नळाचे तोंड किंवा रस्त्यावरील निकामी दिव्याचे भोक ह्या ठिकाणी हा पक्षी गवत, मुळ्या, केस ह्यांचे पेंडवजा घरटे बांधतो. खुराड्यांमधूनही हे पक्षी मोकळेपणाने घरटी बांधतात. फिकट निळा व हिरवा ह्यांमधील छटेच्या रंगावर तांबूस तपकिरी ठिपके व चट्टे असलेली – 3 ते 5 – अंडी हे पक्षी घालतात.

**शमा (Shama)** *(Copsychus malabaricus)* – चित्रपत्र 15.91 – दयार जातीच्या पक्ष्यांचा शमा हा जंगलातील प्रतिनिधी. पिंजऱ्यात ठेवून गाणारा पक्षी म्हणून तो लोकांना अधिक परिचित आहे. पाठीकडून तो काळा आहे. त्याच्या टोकाला एक प्रमुख पांढरा ठिपका असतो. हा ठिपका लांबट काळ्या-पांढऱ्या शेपटीच्या बुडाशी असतो. याचा पोटाकडचा भाग

गंजासारखा तपकिरी असतो. माथेरान (मुंबईजवळ) सारख्या थंड हवेच्या ठिकाणी काही वेळा जंगलातून बाहेर पडण्याचे धाडस करतो. त्याच्या दमदार व सुंदर गाण्यामुळे सुटीला आलेले प्रवासी मुग्ध होतात.

**गप्पीदास (Pied Bushchat)** *(Saxicola caprata)* – चित्रपत्र 13.71 – हिंदी : *काला पिड्डा*. दयाळचा चिमणीएवढ्या आकाराचा हा एक जवळचा भाईबंद आहे. नर काळा कुळकुळीत असतो पण शेपटीच्या बुडाशी, पोटाचा खालचा भाग आणि पंख (विशेषत: पसरले असताना) ह्यांवरील पांढरा रंग चकाकता असतो. मादी मातट तपकिरी रंगाची असून शेपटीच्या बुडाशी फिकट गंजासारख्या रंगाचा भाग असतो. मोकळ्या रानात हा पक्षी जोडीने अगर एकटा आढळतो. हा काही दिवस स्थायिक असतो तर काही दिवस स्थलांतर करतो. झुडपांवरून हा पक्षी जमिनीवर झेप घेऊन टोळ, नाकतोडे व इतर कीटक पकडतो. काही वेळा उडणारे कीटकही पकडतो. 'चेक्-चेक्' अशी सुरवात करून 'टवीट' असा शेवट करणारे कर्कश आवाज हा पक्षी काढतो. विणीच्या हंगामात 'चिक् चिक्' असे दोनदा उच्चारून भारतीय चीरक पक्ष्याप्रमाणे सुस्वर गाणे गातो. आपल्या क्षेत्राच्या मर्यादेवर अतिक्रमण करणाऱ्या पक्ष्याला हाकून देण्यासाठी विणीच्या हंगामात हा पक्षी आवाज तर काढतोच पण आपल्या अंगविक्षेपांनी धमकी देतो. भिंतीच्या भोकात किंवा झाडाच्या भोकात अस्तरासारखे गवताचे घरटे हा पक्षी बांधतो. घरट्याला आतून केस, लोकर इत्यादींचे अस्तर असते. फिकट निळसर पांढऱ्या रंगावर तांबूस तपकिरी रंगाचे ठिपके व चट्टे असलेली –3 किंवा 5 – अंडी हे पक्षी घालतात.

**गळोटीवाला गप्पीदास (Collared Bushchat)** *(Saxicola torquata)* – हा पक्षी हिवाळ्यात उंच गवताळ प्रदेशात व शेतांच्या आसपास सापडतो. नराचे डोके काळे, नारिंगी-तपकिरी छाती, कॉलरसारखे मानेवर पांढरे पट्टे व तसेच पांढरे पट्टे पंखांवर आणि शेपटीच्या बुडाशी असतात. मादी गप्पीदासासारखीच दिसते फक्त तिच्या वरच्या अंगावरील रेघा जरा दाट रंगाच्या असतात एवढेच.

**चीरक (Indian Robin)** *(Saxicoloides fulicata)* – चित्रपत्र 15.93 – हिंदी : *कलचुरी*. **कस्तूर कुलामधील** पक्ष्यांच्या समूहापैकी हा अधिक परिचयाचा व खेडेगावांच्या आसपास सापडणारा पक्षी आहे. गावातल्या गवती छपरांवर, कुंपणांवर, दरडीवर हा पक्षी त्याची वर खेचलेली शेपटी इकडेतिकडे फिरवीत, उड्या मारीत व आवाज करीत असताना वरखाली हिंडताना आढळतो. ह्या खेळकर पक्ष्याचा रंग थोडासा तपकिरी आणि चकाकणारा काळा असतो व कायम उभारलेल्या शेपटीच्या बुडाशी चेस्टनट रंगाचा भाग दिसतो. पंखांवर पांढरा भाग असतो पण तो रंग फक्त उडताना पंख पसरले म्हणजे चकाकताना दिसतो. मादी राखट तपकिरी रंगाची असते आणि शेपटीच्या बुडाशी फिकट चेस्टनट रंग असतो. हे पक्षी आपला बहुतेक वेळ उड्या मारीत पळत असतात, किंवा एकदा झुडपावर तर एकदा वारुळावर उभे राहून व तेथून जमिनीवरील कीटक टिपीत असतात. त्यांच्या ह्या शोधनात ते धीटपणे झोपडीच्या अंगणात, बंगल्याच्या व्हरांड्यात येतात. त्यांचे अन्न म्हणजे कीटक व त्यांच्या

अळ्या; पण त्यांना वाळवीचा किडा फार आवडतो व म्हणूनच ते ह्यांच्या वारुळाभोवती घोटाळत असतात. त्यांचे गाणे म्हणजे काही रंगेल व आनंदी स्वर. नराचा स्वर प्रणयक्रीडेच्या वेळी विशेष ऐकू येतो. काही वेळा हल्लेखोर पक्ष्यांना भिवविण्यासाठी तो छाती फुगवून व संपूर्ण ताठ होऊन पाठीवर शेपटी पुढेमागे करतो व आवाज करतो. गवत आणि मुळ्या ह्यांच्या वाटीच्या आकाराच्या घरट्यावर सापाची कात लावलेली असते. घरटी जमिनीच्या कपारीतील भोकात, जुनाट वृक्षांच्या पोकळ खोडात किंवा टिन आणि मातीच्या भांड्यातसुद्धा बांधली जातात. हे पक्षी पांढऱ्या रंगाची पण सायीची किंवा हिरवट रंगाची छटा असलेली व त्यावर तांबूस तपकिरी रंगाचे ठिपके व चट्टे असलेली – 2 किंवा 3 – अंडी घालतात.

**पर्वत कस्तूर** (**Malabar Whistling Thrush**) *(Myiophoneus horsfieldii)* – चित्रपत्र 15.95 – हिंदी : *कस्तूर*. **कस्तूर कुलामधील** एक प्रख्यात गाणारा पक्षी म्हणून हा पर्वत कस्तूर समजला जातो. साळुंकी व पारवा ह्यांच्या दरम्यानच्या आकाराचा हा मनोवेधक पक्षी निळसर काळा असतो. कपाळावर व खांद्यावर गर्द निळ्या रंगाचे भाग असतात, आणि पाय व चोच काळी असतात. पर्वतांमधून खळखळा वाहणारे ओढे, खडकाळ प्रदेशातील नाले ह्यांच्या आसपासच्या दाट जंगलात मनुष्यवस्तीपासून दूर किंवा जवळही हा पक्षी वस्ती करतो. ह्या पक्ष्याची सुरेल शीळ त्याच्या विणीच्या हंगामात उषेचे स्वागत करते. मानवी स्वरांप्रमाणे सुबद्ध व सुस्वर गाण्यामुळे ह्या पक्ष्याला आळशी (Idle) किंवा शिटी वाजविणारा शाळकरी (Whistling Schoolboy) मुलगा अशी नावे पडली आहेत. कस्तूर पक्ष्यांच्या प्रथेनुसार हा पक्षी विणीचा हंगाम सोडून इतर वेळी 'क्री-ई' असा आवाज काढतो. जलकीटक, गोगलगाई व खेकडे हे त्याचे अन्न. खेकड्यांना तर तो पकडून दगडांवर आपटतो व त्यांचे बाहेरचे घट्ट कवच फोडतो. प्रवाहात असणाऱ्या दगडांवर हा उड्या मारीत फिरतो आणि वाहत जाणाऱ्या भक्ष्याला पकडतो. बसला असताना शेपटी पंख्याप्रमाणे पसरवून व वरखाली करून भेगांमध्ये लपून बसलेल्या भक्ष्याला बाहेर काढतो. घरात पाळण्यासाठी ह्या पक्ष्याला फार मागणी असते आणि जर त्याचे पिल्लू घरी आणले तर चांगलेच माणसाळते. मुळ्या, गवत व शेवाळे चिखलांनी एकत्र बांधून अस्तरवजा घरटे हे पक्षी तयार करतात. धबधब्याजवळच्या कपारींत ही घरटी बहुधा बांधली जातात. फिकट बदामी किंवा दगडासारख्या हिरवट रंगाची वर तांबूस तपकिरी व जांभळ्या रंगाचे ठिपके आणि चट्टे असलेली – 3 किंवा 4 – अंडी हे पक्षी घालतात.

**हिमालयी कस्तूर** (**Himalayan Whistling Thrush**) *(M. temminckii)* हा पक्षी हिमालयाच्या पायथ्याशी आसाम व ब्रह्मदेश ह्या प्रांतांत आढळतो. त्याची चोच पिवळी असते व कपाळ आणि खांदे ह्या भागात गर्द निळे ठिपके असतात.

**बल्गुल कुलामधील** (Family PARIDAE) टिट हे पक्षी चिमणीच्या आकाराचे असतात. ह्या आनंदी व उत्साही पक्ष्यांची चोच जाड असते, काही जणांना उभे जाड तुरे असतात आणि

हे पक्षी बहुधा झाडावरच राहतात. ह्या कुलामधील अनेक जाती हिमालयात सापडतात.

पठारावर तीन जाती सापडतात. त्यांपैकी **राखी टिट (Grey Tit)** *(Parus major)* – चित्रपत्र 13.74 – हिंदी : रामगंग्रा, ही जात विशेषेकरून सर्वत्र आढळते. हा चिमणीएवढा नखरेबाज पक्षी आहे. चकाकणारे तुराहीन डोके, चकाकते पांढरे गाल, राखी पाठ, खालच्या पांढरट भागावर मध्यभागी रुंद काळा पट्टा ह्या गुणांनी त्याला ओळखता येतो. तो जंगलात जरी राहात असला तरी दमट सदाहरित जंगलामध्ये राहात नाही. हा पक्षी एकटा, जोडीने, कळपाने किंवा इतर कीटकभक्षक पक्ष्यांसमवेत असतो. जंगलात जरी ते विखुरलेले असले तरी त्यांच्या आनंदी, चिवचिवाटी आवाजाने एकमेकाशी संबंध ठेवतात. कीटक, त्यांच्या अळ्या व अंडी हे त्याचे अन्न. त्यांना शोधण्यासाठी खोडांवर, तणाव्यांवर हा उलटासुलटा लोंबकळतो, फुलांमध्ये शोधतो, झाडांच्या फटींमधून डोकावत असतो. त्याच्या ह्या स्वभावामुळे फळझाडांचे जरी थोडेसे नुकसान होत असले तरी पीकनाशक कीटकांचा ते फार मोठ्या प्रमाणावर संहार करीत असल्यामुळे अंती फायदेशीर ठरतात. पायात फळे पकडून आपल्या जाड चोचीने हातोडीसारखे घण मारून त्यांची बाह्य कठीण कवचे फोडून त्यातील बी हे पक्षी खातात. 'व्हीचिचि, व्हीचिचि, व्हीचिचि' अशा प्रकारचे आवाज काढून विणीच्या हंगामात नर गात असतो. दगडांच्या भिंतीमधील किंवा खोडांमधील भोकांमधून केस, शेवाळे व पिसे ह्यांचे बनविलेले त्यांचे घरटे माच्यासारखे असते. पांढऱ्या किंवा गुलबस पांढऱ्या रंगावर तांबूस तपकिरी ठिपके व डाग असलेली चार ते सहा अंडी हे पक्षी घालतात.

दक्षिण पठारात नेहमी दिसणारा दुसरा टिट पक्षी म्हणजे **पिवळ्या गालाचा टिट (Yellow-cheeked Tit)** *(Parus xanthogenys)*. पिवळ्या व काळ्या रंगाच्या ह्या ऐटबाज पक्ष्याला काळा टोकदार तुरा असतो व खालच्या पिवळ्या भागावर मध्यभागी खाली जाणारा काळा रुंद पट्टा असतो. राखी टिट पक्ष्यांबरोबरच हा वस्ती करतो पण त्याशिवाय दमट सदाहरित जंगलामध्येही तो वास्तव्य करतो.

**शिलींध्री कुलातील** नटॅहचेस (Family SITTIDAE) हे पक्षी झाडांवर किंवा कड्यांवर घिरट्या घालणारे असून झाडांवरून किंवा खडकांवरून उड्या मारीत खालीवर फिरत, फटींमधले कोळी आणि कीटक शोधीत फिरताना दिसतात. त्यांना छोटे चौकोनी शेपूट असते, व सुतार पक्ष्यासारखी लांब चोच असते. भारतात आणि पूर्व पाकिस्तानात बहुधा सर्वत्र सापडणारी ह्या पक्ष्यांची जात म्हणजे **चेस्टनट पोटाचा नटॅहच (Chestnut-bellied Nuthatch)** *(Sitta castanea)* – चित्रपत्र 13.76 – हिंदी : *सिटी* किंवा *कटफोरिया*. हा पक्षी चिमणीहून लहान असतो. वरून राखी निळा, खालून गर्द चेस्टनट रंगाचा व लांब टोकदार चोचीचा हा पक्षी असतो. मादीचा खालचा भाग फिकट रंगाचा असतो. विरळ जंगलामधल्या वृक्षांच्या खोडांवरून उंदराप्रमाणे वर व भोवती चढत जाणाऱ्या ह्या पक्ष्याच्या जोड्या आढळतात किंवा एकटा असा पण तो आढळतो. खेडेगावाभोवतालच्या आमराईत व

बागांमधून हा पक्षी दिसतो. टिट आणि सुतार ह्या पक्ष्यांप्रमाणेच हा आपले अन्नसाधन करतो. टिटप्रमाणे हा पक्षी बुंध्यांवर व फांद्यांवरून उड्या मारीत, फटींत किडे शोधीत भटकतो तर सुताराप्रमाणे तो झाडावर चढून चोचीने टोकून सालात लपलेले किडे बाहेर काढून खातो. ह्यासाठी पुष्कळ वेळा तो एखाद्या फांदीच्या खालच्या अंगाला चिकटून मोठ्या आश्चर्यकारक रीतीने धावतो. त्याचे मुख्य अन्न म्हणजे कोळी, किडे, अळ्या व अंडी; पण टिटप्रमाणे तो कठीण कवचीची फळेही फोडून खातो. त्यासाठी तो ही फळे एखाद्या भेगेत घट्ट बसवितो व आपल्या चोचीने प्रहार करून ती फोडतो. उंदराप्रमाणे तो बारीक आवाज काढतो. 'चिप्-चिप्' अशी सुस्वर, परत परत वाजविलेली शीळ सुद्धा ऐकू येते. विणीच्या हंगामात जरी ह्यांची जोडपी असली तरी इतर हंगामात ह्या पक्ष्यांच्या छोट्या छोट्या टोळ्या टिट आणि इतर कीटकभक्षक पक्ष्यांबरोबर भटकत असतात. झाडांच्या ढोलीत किंवा तांबट पक्ष्यांच्या घरट्यांच्या जागी हा पक्षी घरटे बांधून त्याला आतून पाने, शेवाळे आणि लोकर ह्यांचे अस्तर लावतो. प्रवेशद्वाराभोवती चिखल फासून तो चिखल वाळला म्हणजे घरटयाचे सुंदर गोल दार तयार होते. पांढऱ्या रंगावर तांबडे ठिपके असलेली – 2 ते 6 – अंडी हा पक्षी घालतो.

**खंजरीट कुलात** (Family MOTACILLIDAE) पिपिट आणि धोबी (Wagtails) ह्या पक्ष्यांचा अंतर्भाव होतो. हे पक्षी किरकोळ शरीरयष्टीचे पण सुरेख असतात. गवताळ प्रदेशावर हिंडत किडे टिपत असताना त्यांची लांब शेपटी एकसारखी वरखाली होत असते हिमाचलोत्तरीय प्रदेशातून हे पक्षी हिवाळ्यात आपल्याकडे पाहुणे येतात.

**पांढरा धोबी (White Wagtail)** *(Motacilla alba)* – हिंदी : *धोबन, खंजन* चिमणीच्या आकाराच्या पण बारीक अंगाच्या या पक्ष्याला लांब शेपटी असते. हा पक्षी मुख्यतः वरून राखी व खालून पांढरा असतो. हिवाळ्यात हनुवटी व गळा खालच्या अंगाप्रमाणेच पांढऱ्या रंगांचे असतात. लाळेर्‍यासारखा असणारा भाग खूपच कमी किंवा अजिबात नसतो. गवताळ प्रदेशात हा पक्षी एकटा, दुकटा किंवा छोट्या कळपात असतो. तुरुतुरु चालत, शेपटी वर-खाली करीत, इकडे तिकडे वळत फिरताना हा पक्षी जमिनीवरचे किडे टिपत असतो. काही वेळा किड्यांचा पाठलाग करून त्यांना पकडतो. माळरान, नांगरलेली शेतं, नापीक जमीन, गोल्फची मैदाने ह्या भागात, मनुष्यवस्तीतही हा पक्षी सभोवतालच्या क्रिकेट इत्यादी खेळामधील खेळाडूंकडे दुर्लक्ष करून आपले उदरभरणाचे कार्य करीत असतो. उडताना हा प्रथम पंख भराभर फडफडावून उडतो व मग पंख मिटून गिरक्या घेत तरंगत राहतो. 'चिचिप, चिचिप, चिचिप' असा आवाज एकसारखा काढतो. उसाच्या, वेळूच्या शेतात किंवा दाट पानांच्या वृक्षांमधून ह्या पक्ष्यांचे थवेच्या थवे रात्रीचा निवारा घेतात. ह्या जातीमधील बहुतांश पक्ष्यांची वीण भारतापलीकडे उत्तर दिशेकडील प्रदेशात घातली जाते. त्यांच्यापैकी एका जातीची वीण काश्मिरात होते. मुळ्या, गवत आणि लोकर ह्यांनी वाटीच्या आकाराचे घरटे तयार केले जाते. पाण्याच्या आसपास, दगडाखाली, झुडपाखाली किंवा उन्मळून पडलेल्या

वृक्षाच्या मुळ्यांमध्ये ही घरटी असतात. पांढऱ्या रंगावर तांबूस तपकिरी ठिपके असलेली – 4 ते 6 – अंडी हे पक्षी घालतात.

**करडा धोबी (Grey Wagtail)** *(Motacilla caspica)* – चित्रपत्र 13.77 (वर). – ह्या द्वीपकल्पावर हिवाळ्यात जवळजवळ सर्वत्र सापडणारी धोबी पक्ष्याची ही एक जात आहे. जंगलांमधून खळखळ वाहणाऱ्या झऱ्यांच्या आसपासच्या खडकाळ भागात किंवा पावसाने वाहणाऱ्या ओढ्यांच्या आसपास हे पक्षी आढळतात. हिवाळ्यात जेव्हा ते आपल्या भागात असतात तेव्हा नर-मादीत फरक करता येत नाही. पण विणीच्या हंगामात (उन्हाळ्यात) नराची हनुवटी, गळा व छाती काळ्या रंगाची (चित्रात दर्शविल्याप्रमाणे) होते. त्याचे वर्तन इतर धोबी पक्ष्यांपासून फारसे वेगळे नसते. विणीच्या हंगामात नर सुस्वर गाणे गातो. आपल्या देशातील त्याचा अंडी घालण्याचे नजीकचे प्रदेश म्हणजे काश्मीर आणि पश्चिम हिमालय हे आहेत. पांढऱ्या धोबी पक्ष्याप्रमाणेच ह्याचे घरटे असते. पिवळसर राखी किंवा हिरवट रंगावर तांबूस तपकिरी ठिपके असलेली – 4 ते 6 – अंडी हे पक्षी घालतात.

हिवाळ्यात विविध प्रकारचे राखी आणि पिवळे *(M. flava)* धोबी पक्षी आपल्याकडे येतात. ह्या दिवसांत वेगवेगळ्या जाती ओळखणे कठीण असते, परंतु उन्हाळ्याच्या सुमारास त्यांच्या मायदेशी परतण्याचे वेळी पुष्कळशा जातींच्या नरांचे रंग बदलतात व मग त्यावेळी त्यांना ओळखता येते. द्वीपकल्पात स्थायिक असणारा एकच धोबी आहे आणि तो म्हणजे **मोठा ठिपक्यांचा धोबी (Large Pied Wagtail)** *(M. maderaspatensis)* – चित्रपत्र 13.77 (अ)— हा पक्षी इतर धोबी पक्ष्यांत मोठा म्हणजे बुलबुलाएवढा असतो. हा काळापांढरा पक्षी दयाळ पक्ष्यासारखा दिसतो, पण त्याची भुवई पांढरी असते व शेपूट वर खेचलेले नसते. डोंगराळ भागातील झऱ्यांच्या आसपासचा भाग ह्या पक्ष्यांना विशेष आवडतो. हे जोडीने झरे, तलाव, ओढे ह्यांच्या आसपास आढळतात. हे पक्षी फारसे लाजाळू नाहीत आणि म्हणूनच ते मानवी वस्तीत येतात, घरांच्या आसपास फिरतात किंवा धोबीघाटावरही वावरतात. शिटीच्या स्वरूपात सुस्वर व मोठ्या आवाजात गाणे म्हणतात. विणीच्या हंगामात नर खडकाच्या किंवा घरांच्या टोकांवरून मंजुळ गाणे गातो. दयाळ पक्ष्यासारखेच ह्यांचे गाणे असते. मुळ्या, केस, लोकर, वाळलेली शैवाल वनस्पती ह्यांचे वाटीच्या आकाराचे घरटे हा पक्षी भिंतींमधील भोकात, खडकांच्या पुढे आलेल्या टोकाखाली, पुलांच्या कमानीत किंवा घरांच्या छतांमधून बांधतो. पण नेहमीच हे घरटे पाण्याच्या आसपास हमखास असते. राखट तपकिरी किंवा हिरवट पांढऱ्या रंगावर तपकिरी रंगाच्या नाना छटांचे ठिपके व डाग असलेली –3 किंवा 4 – अंडी हे पक्षी घालतात.

पिपिट व धोबी एकाच कुलाचे पक्षी असल्यामुळे त्यांचा आकार आणि सवयी सारख्याच असतात. पण पिपिट पक्षी साधारणपणे मंद तपकिरी रंगाचे (चातकासारखे) असतात, व त्यांचे अंग अधिक बारीक व निमुळते असून लांब शेपटी असते. ह्यांच्यापैकी काही जाती आकार, रंग आणि वसतिस्थाने ह्यांच्यावरून सहज ओळखता येतात. बाकीचे इतके सारखे असतात

की त्यांच्यात भेदाभेद करणे कठीण असते. बहुतेक जाती हिवाळ्यात आपल्या देशाला भेट देतात. त्याच्यापैकी एक सर्वत्र दिसणारी जात म्हणजे **झाडावरील पिपिट (Tree Pipit)** *(Anthus trivialis)* — चित्रपत्र 13.78 — हिंदी : *रंगेल* किंवा *चर्चरी* (सर्व पिपिट पक्षी). आपल्या परिचयाच्या चिमणीच्या (मादी) रंगाचा हा पक्षी असून जरा किडकिडीत, पातळ चोच व लांब शेपटीचा असतो. शेपटीची बाहेरची पिसे पांढरी असतात व ती विशेषतः पक्षी जेव्हा बसण्यासाठी उतरतो तेव्हा दिसून येतात. वरच्या वाळूसारख्या तपकिरी भागावर काळ्या रेघा असतात व भुवईचा रंग फिका असतो. खालच्या पिंगट पांढऱ्या रंगावर छातीच्या भागात गर्द काळ्या रेघा असतात. सर्व भारतात हिवाळ्यात हा पक्षी पतझड वनात, आंबराईत व गावाभोवतालच्या झाडीत सापडतो. हा पक्षी झाडांच्या सावलीत जास्त करून वावरत असल्यामुळे इतर पिपिट पक्ष्यांपासून वेगळा ओळखता येतो. त्याचा रंग सभोवतालच्या पालापाचोळ्याशी इतका मिळताजुळता असतो की तो जर स्वस्थ असेल तर चटकन दिसून येत नाही. आवाज न करता शांतपणे हा पक्षी फिरतो आणि जमिनीवरचे किडे टिपतो. धोक्याचे वेळी हा चटकन उडून जवळच्या झाडावर बसतो आणि संकट दूर झाल्यावर पुन्हा जमिनीवर येऊन किडे टिपण्याच्या कामाला लागतो. 'ट्सीप ट्सीप' असा आवाज हा पक्षी उडताना काढतो. आपल्या देशापलीकडे हा पक्षी जेव्हा विणीच्या हंगामात जातो त्यावेळी नर प्रणयक्रीडा करताना सुरेल गाणे गातो.

आपल्याकडे स्थायिक असणारा पक्षी म्हणजे **भारतीय पिपिट (Indian Pipit)** *(A. novaeseelandidae)* हा सर्वत्र असतो व मोकळ्या मैदानात विणीचा हंगाम घालवितो. नापीक जमीन, नांगरलेली शेती, माळरान ह्या भागात ह्या पक्ष्यांच्या जोड्या भरभर चालताना व शेपटी वरखाली नाचविताना दिसतात. 'पिपिट, पिपिट' अशा प्रकारचा आवाज हे पक्षी उडताना काढतात. विणीच्या हंगामात नरपक्षी थोड्या उंचीवर उडत जातो, त्यावेळी 'पिपिट् पिपिट्' असे हळू गाणे म्हणतो व नंतर थोड्या वेळाने जमिनीवर उतरतो. घरटे वाटीच्या आकाराचे — कधी कधी घुमटासारखे — असते व ते गवत, मुळ्या आणि केस ह्यांचे तयार करून जमिनीवरच्या खड्ड्यात, किंवा झुडपाच्या आश्रयाने त्याच्या बुंध्याशी, घातलेले असते. पिवळसर किंवा राखट पांढऱ्या रंगावर तपकिरी रंगाचे वेडेवाकडे ठिपके, रुंद टोकाला जास्त दाटीवाटीने असलेली — 3 किंवा 4 — अंडी हे पक्षी घालतात.

**पुष्पान्वेषी** (Family DICAEIDAE) कुलामधील फुलटोचे, (Flowerpeckers) पक्षी झाडावर राहणारे, छोटे, लहान शेपटीचे, एकसारखी गडबड करणारे आहेत. त्यांची चोच फुलांमधील रस खाण्यासाठी म्हणून लांब निमुळती आणि किंचित वाकलेली असते.

भारतीय गणराज्यात आणि पूर्व पाकिस्तानात बहुधा सर्वत्र सापडणारी जात म्हणजे **टिकेलचा फुलटोच्या (Tickell's Flowerpecker)** *(Dicaeum erythrorhynchos)* – चित्रपत्र 13.73 – हिंदी : *फुलचुकी* (ह्या कुलातील सर्व पक्षी). चिमणीपेक्षाही लहान असलेला

हा पक्षी भारतामधल्या सर्व पक्ष्यांत लहान आहे. त्याचा रंग ऑलिव्ह तपकिरी आणि राखी असतो. शिंजीर (Sunbird) पक्ष्याच्या मादीसारखा जरी हा दिसत असला तरी त्याची चोच लहान व मांसल रंगाची असते. रसाळ फळे आणि फुलांमधील मधुरस हेच त्यांचे अन्न. हे पक्षी विशेषतः बांडगुळासारख्या परजीवी वनस्पतींच्या फुलांमधील रस गोळा करतात. बांडगुळाच्या फुलांमधील मधुरस गोळा करीत असताना त्यांच्या चोचीला चिकटलेले पराग ह्याच स्त्रीकेसरांवर पडून प्रथम परागीभवन व बीजफलन होते. ह्याच परजीवी झाडांची फळे हे पक्षी खातात. फळांमधील बिया त्यांच्या चोचीला घट्ट चिकटून बसतात आणि मग त्या काढण्यासाठी हे पक्षी आपल्या चोची दुसऱ्या झाडांच्या खोडांवर घासतात. अशा रीतीने हे पक्षी बांडगुळाचा प्रसार करतात. फुलटोच्या पक्ष्यांचे अन्नक्षेत्र ठरलेले असते. ह्या क्षेत्रामधील बांडगुळाच्या आसपास हे पक्षी नेहमी घिरट्या घालीत असतात. इकडून तिकडे उडताना किंवा उड्या मारताना 'चिक्-चिक्-चिक्' असा आवाज काढतात. कधीकधी 'ट्विट् ट्विट्' असे गाणेही गातात. त्यांचे घरटे म्हणजे लोंबती लांबट गोलसर पिशवी असते. शिंजीर पक्ष्याच्या घरट्यापेक्षा हे घरटे लहान व अधिक नीट आणि आतून स्वच्छ असते. मऊ धागे, वनस्पतींचे मऊ धागे, पिसे ह्यांचे गुलबस तपकिरी रंगाचे हे घरटे जमिनीपासून 3 ते 10 मीटर उंचीवरल्या फांदीवर लोंबकळत असते. साधारणपणे हे पक्षी नेहमी – 2 – पांढरी स्वच्छ अंडी घालतात.

**जाड चोचीचा फुलटोच्या (Thick-billed Flowerpecker)** *(D. agile)* हा असाच वरच्या फुलटोच्या पक्ष्याप्रमाणे सर्वत्र आढळणारा पक्षी आहे. त्याच्या खालच्या भागावर पुसट तपकिरी रेघा असतात व त्याची चोच जाड, निळसर आकडीवाली असते. ह्या गुणांवरून हा पक्षी वेगळा ओळखता येतो.

**शिंजीरिका कुल.** (Family NECTARINIIDAE) शिंजीर (Sunbirds or Honeysuckers) किंवा सूर्यपक्षी असलेल्या ह्या कुलामधील पक्षी छोटे धातूंच्या रंगांचे फुलटोच्यांप्रमाणे पण लांब व बारीक चोच असणारे आहेत. ह्या चोचीमुळे फुलांच्या गाभ्यांतील रस तोंडामधल्या शोषक जिभेने ओढून घेता येतो. **जांभळा शिंजीर (Purple Sunbird)** *(Nectarinia asiatica)* – चित्रपत्र 13.75 – हिंदी : *शकरखोरा* (सर्व सूर्यपक्षी) — हा चिमणीहूनही लहान असलेला परिचित पक्षी आहे. विणीच्या हंगामात नराचा रंग काळा असतो व त्यात हिरव्या व जांभळ्या रंगाच्या झळाळणाऱ्या छटा असतात. 'काखेच्या, भागात असणारी पिसे गर्द शेंदरी तांबड्या (पेटलेल्या) रंगाची असतात. इतर हंगामात नर मादीसारखा दिसतो. मादीचा रंग वरून ऑलिव्ह-तपकिरी, खालून फिकट पिवळा, तिचे पंख काळे व तिच्या छातीवर रुंद काळा उभा पट्टा असतो. ह्या फुलावरून त्या फुलावर असे एकसारखे भिरभिरत हे पक्षी जोडीने जातात. फुलांना ते नाना प्रकारांनी लटकतात व त्यांचा मधुरस पितात. फुलाभोवती भिरभिरत असताना ते तिथले कीटक, कोळी हे प्राणीसुद्धा टिपतात. नव्या जगामधील हमिंग बर्ड्स अशा प्रकारे मधुरस पितात, पण शिंजीर पक्ष्यांची ही पद्धत नाही. फुलांभोवती भ्रमण

करताना हे पक्षी 'विच्-विच्' असा आवाज करतात. विणीच्या हंगामात नर एखाद्या उंचवट्यावर किंवा तारेवर बसून उत्साहाने गात असतात. प्रियाराधनासाठी ते वारंवार पंखाची उघडझाप करून 'काखे' जवळील पिवळ्या व तांबड्या रंगाची पिसे झळकवीत व शेपटीची उघडझाप करीत मादीसमोर प्रणयक्रीडा करतात. ह्यावेळचे त्यांचे गाणे म्हणजे 'चीविट् ची विट्-चीविट्' अशा प्रकारच्या चीत्कारासारखे काढलेले आवाज असतात. मऊ गवत, कचरा, व कोळिष्टके ह्यांनी बांधलेले लांबट पिशवीच्या आकाराचे घरटे फांदीवरून लटकत असते. घरट्याला बाहेरून कागदासारखी झाडाची पातळ साल व अळ्यांची विष्ठा लावलेली असते. जमिनीवर किंवा घराच्या भिंतीवर पसरणाऱ्या वनस्पतींमध्ये, किंवा खुज्या झुडपांवर जमिनीपासून तीन मीटर उंचीवर, ही घरटी असतात. हे पक्षी राखी किंवा हिरवट पांढऱ्या रंगावर तपकिरी व राखी ठिपके असलेली – 2 किंवा 3 – अंडी घालतात.

**जांभळ्या बुडाचा शिंजीर (Purple-rumped Sunbird)** *(N. zeylonica)* हा आपल्याकडे सापडणारा आणखी एक शिंजीर पक्षी. नराचे डोके, वरचा भाग आणि छाती बहुधा चकाकती (धातूसारखी) हिरवा, नारिंगी, किरमिजी आणि जांभळा ह्या रंगाची असते व बूड निळसर जांभळे (धातूसारखे) असते. खालचा भाग गर्द पिवळा असतो. मादी जांभळ्या शिंजीराप्रमाणे दिसते. पण हनुवटी, गळा राखट पांढरा आणि खालचा भाग चकाकित गर्द पिवळा असतो.

फुलटोचे आणि शिंजीर ह्या पक्ष्यांच्या कुलासारखे दुसरे कुल म्हणजे **सितनयन कुल** (Family ZOSTEROPIDAE)व ह्यात **चष्मेवाला (White-eye)** *(Zosterops palperbrosa)* – चित्रपत्र 13.72 – हिंदी : *बबूना*. हा एक सुरेख पक्षी आहे. चौकोनी छोट्या शेपटीचा हिरवट पिवळा व गर्द पिवळा ह्या रंगांचा हा पक्षी असून डोळ्याभोवती ठळक पांढरे वर्तुळ असते (म्हणून चष्मेवाला). चोच पातळ, टोकदार, किंचित बाक असलेली असते. बागा, राया व झाडी ह्यांतून पक्ष्यांच्या 5 ते 20 जणांचे समूह वावरत असतात. काही वेळा अधिक संख्येनेही हे एकत्र येतात. संपूर्णपणे झाडावर राहणारे हे पक्षी फांद्यांवरील पाने व कळ्यांवर नाना प्रकारच्या कसरती करीत हिंडतात व लपून बसलेले कोळी व किडे हे खातात. त्याशिवाय इतर रसाळ फळे व बहर आलेल्या फुलांमधील रस हे सुद्धा त्यांचे आवडते खाद्य आहे. फुलांशी आलेल्या संबंधामुळे ते आपोआपच त्यांचे परागवहन व मीलन करतात. उडताना ते नेहमी चिवचिवाट करीत असतात. विणीच्या हंगामात ह्यांच्या टोळ्या फुटतात व नरमादीच्या जोड्या तयार होतात. हिमालयामधील व्हर्डिटर नाचरा पक्ष्याप्रमाणे नर सुस्वर नादलुब्ध गाणे गातो. सुरवातीला अस्पष्ट असणाऱ्या गाण्याचा आवाज मोठा होत जातो व – 3 किंवा 4 – सेकंदांत परत अस्पष्ट होतो. चष्मेवाला पक्षी फार लवकर पाळीव बनतो व आपल्या बंदिस्त निवासात सुखाने राहतो. फांदीच्या टोकावरच्या दुबेळक्यात खुंटीला टांगलेल्या पिशवीसारखे वाटीच्या आकाराचे घरटे हा पक्षी तयार करतो. धाग्यांची कोळिष्टकांनी गुंफण करून व लिंपून हे घरटे

बांधले जाते. छोट्याशा झाडावर किंवा एखाद्या झुडपावर जमिनीपासून 2 किंवा 3 मीटर उंचीवर हे घरटे असते. स्वच्छ फिकट निळ्या रंगाची – 2 किंवा 3 – सुंदर अंडी हे पक्षी घालतात. काही वेळा अंड्याच्या रुंद टोकावर गर्द निळ्या रंगाची टोपी असते.

**सुगरण आणि चिमणी** (Sparrows and Weavers) ह्यांचा अंतर्भाव करणारे कुल म्हणजे **चिमणी कुल** (Family PLOCEIDAE). हे पक्षी इतके परिचयाचे आहेत की ज्याला पक्ष्यांची आवड नाही त्यालासुद्धा हे सहज ओळखता येतात.

**चिमणी (Home Sparrow)** *(Passer domesticus)* – चित्रपत्र 16.101 – हिंदी: *गौरिया.* हा महत्त्वाचा पक्षी बहुतांशी साऱ्या जगात आढळतो. चिमणी ही (चित्रात दाखविलेल्या) चिमण्यापेक्षा मातट तपकिरी, वरून काळे व पिवळसर रंगाच्या रेघा, आणि खालचा पांढरट भाग अशी असते. कोणत्याही ठिकाणच्या मानववस्तीत राहणारा हा पक्षी आहे. ज्यावेळी मनुष्य नवीन वस्ती करतो त्यावेळी त्याच्या जवळ येणारा हा पहिला पक्षी असतो. हिवाळ्यात ह्या पक्ष्यांचे मोठाले कळप शेतांच्या आसपास गोळा होतात. जमिनीवर पडलेले धान्याचे बी व दाणे हे त्यांचे मुख्य अन्न, पण काढावयास आलेल्या गव्हाच्या लोंब्या हे पक्षी फस्त करून बरेच नुकसान करतात. घोडे आणि इतर दुभती जनावरे ज्या प्रमाणात गावात असतील त्या प्रमाणात ह्यांची संख्या कमीजास्त असते. कारण हे पक्षी जनावरांच्या विष्ठेमधील न पचलेले धान्यांचे दाणे खातात. भाजीपाल्याच्या व फुलांच्या कळ्या हे पक्षी खुडतात व म्हणूनच हे पक्षी घराभोवतालच्या बागांमधून नको असतात. इतके असले तरी ते माणसाला फार उपकारक आहेत. कारण पिकांचा नाश करणारे असंख्य कीटक व अळ्या हे पक्षी खातात. विशेषत: पिलांची वाढ केवळ ह्याच अन्नावर केली जाते. विणीच्या हंगामात चिमणा उच्च स्वरात, कंटाळा येईपर्यंत एका सुरात 'ट्सी, ट्सी, ट्सी' किंवा 'चिरर, चिरर, चिरर' असा ओरडत असतो. पिसे पसरून, बुडाला कमान करून, पंख खाली करून व शेपटी नाचवीत हा पक्षी ओरडत असतो. संध्याकाळचे वेळी त्या चिमण्या प्रचंड संख्येने त्यांच्या आवडत्या झाडावर जमतात व झोपी जाईपर्यंत अखंड कलकलाट करीत असतात. छपरातील किंवा भिंतीमधील भोकात गवत आणि कचरा भरून घरटे तयार केले जाते. फिकट हिरवट पांढऱ्या रंगावर तपकिरी रंगाच्या नाना छटा असलेली – 3 ते 5 – अंडी हे पक्षी घालतात.

**सुगरण (Baya Weaver Bird)** *(Ploceus philippinus)* – चित्रपत्र 16.97 – हिंदी : *बाया.* शेतांच्या आसपास झाडांवर लटकत असलेल्या बकपात्रासारख्या आकाराच्या घरट्यांसाठी हे पक्षी प्रसिद्ध आहेत. विणीच्या हंगामात नराचे विविध रंग चित्रात दर्शविले आहेत. इतर दिवसांत नर व मादी सारखेच दिसतात. चिमणीसारख्या दिसणाऱ्या ह्या पक्ष्यांची चोच जाड आणि शेपूट छोटे असते. माळरानात व शेतांच्या आसपास ह्या पक्ष्यांचे प्रचंड थवे भटकत असतात. लवकर पिकणाऱ्या तृणधान्यांवर हे पक्षी हल्ला करून नुकसान करतात. ते

जवळच्या भागातच स्थलांतर करतात; पण हे स्थलांतर पावसावर व भातशेतीवर अवलंबून असते. चिमण्या आणि साळुंकी ह्यांच्या बरोबरीने सुगरण पक्षी वेळूच्या वनात किंवा उसांच्या मळ्यात निवारा घेतात. चिमणीप्रमाणे सुगरण 'चिट्-चिट्-चिट्' असा आवाज करते. विणीच्या हंगामात घरटे बांधण्याचे वेळी नर वरील आवाजाबरोबर 'चीऽऽईऽऽ' असा लांब स्वर काढून सुरेल गाणे गातात. ह्या दिवसांत मादीला आकर्षित करण्यासाठी गाण्याबरोबरच ते पंख हलवून घरट्यांच्या आसपास येणाऱ्या मादीचे लक्ष आपल्याकडे वेधतात. नर विणीच्या हंगामात ओळीने घरटी बांधत जातो. ही घरटी अर्धवट बांधून झाल्यावर त्यात मादी येते. मादीने ह्या अनेक घरट्यांपैकी एखादे पसंत केल्यावर नर ते घरटे पुरते बांधून टाकतो. त्यामुळे एकाच नराची दोन ते पाच घरटी व तितक्याच बायका असतात. ह्या सर्व घरट्यांमधील संसारांची उभारणी व वाढ बरोबरच होत असते. गवताची पाती व तृणधान्यांची लांब पाती एकत्र विणून बकपात्राच्या आकाराचे घरटे फांदीवरून लोंबकळत राहते व घरट्याला उभ्या नळीच्या आकाराचे प्रवेशद्वार असते. बाभळीच्या झाडांवर ह्या पक्ष्यांची अनेक घरटी लोंबकळत असतात. अंडी ठेवण्याच्या जागेवर आतल्या बाजूने ओल्या चिखलाचे लिंपण केलेले असते. हे लिंपण का केले जाते हे माहीत नाही. – 2 ते 4 – पांढरी शुभ्र अंडी सुगरण पक्षी घालतो.

**रेघांची सुगरण (Striated)** *(P. Manyar)* आणि **काळ्या गळ्याची सुगरण (Black-throated Weaver Bird)** *(P. Benghalensis)* ह्या सुगरण पक्ष्याच्या आणखी दोन पण कमी आढळणाऱ्या जाती आहेत. विणीच्या हंगामातील नरांच्या रंगावरून पक्षी ओळखता येतात. रेघांच्या सुगरण पक्ष्याच्या नराची छाती तांबूस, पाठीवर काळ्या रेघा आणि चकाकणाऱ्या पिवळ्या रंगाचा तुरा या खुणा आहेत. दुसऱ्या जातीच्या नराचा तुरा सोनेरी पिवळ्या रंगाचा व चमकदार असतो. गळा पांढरा असतो व खालच्या पांढऱ्या रंगापासून हा भाग काळ्या छातीमुळे वेगळा दिसतो. जलाशयांच्या आसपास असलेल्या गवतामध्ये किंवा वेतांच्या वनात ह्या दोन्ही पक्ष्यांची घरटी लोंबताना दिसतात.

**लाल मुनिआ (Red Munia)** *(Estrilda Amandava)* – चित्रपत्र 16.98 (अ) – हिंदी : *लाल किंवा लाला मुनिआ.* हा चिमणीहूनही लहान पक्षी आहे. चित्रामध्ये विणीच्या हंगामात दिसणारा नर दर्शविला आहे. इतर वेळी नर व मादी दोघेही सारखेच दिसतात. तपकिरी रंगावर पांढरे ठिपके व किरमिजी रंगाची चोच आणि बूड असे त्यांचे रंग असतात. शेपूट गोलसर असते. ठिपक्याच्या मुनिआमध्ये ती टोकदार असते. जलाशयाजवळच्या ओलसर भागात जे उंच गवत व बांबूची वने असतात, त्या ठिकाणी हा पक्षी कळपाने वास्तव्य करतो. गवताचे बी व किडे हे त्यांचे अन्न. विणीच्या हंगामात नर 'ट्विट् ट्विट्' अशा आवाजाचे मंद क्वचितच दिसतो. गवताचे गोलाकार घरटे असून त्याला बाजूचे प्रवेशद्वार असते. आतून घरटयाला गवत वा पिसे अस्तरासारखी लावलेली असतात. घरटे एखाद्या झुडपात खालवर बांधलेले असते. पांढरीशुभ्र – 4 ते 7 – अंडी घातली जातात.

**ठिपक्यांचा मुनिआ (Spotted Munia)** *(Lonchura Punctulata)* – चित्रपत्र

16.98 – हिंदी : *तेलिआ मुनिआ* किंवा *सिनेवाझ*. लाल मुनिआच्या आकाराचा पण टोकदार शेपटीचा हा पक्षी तपकिरी रंगाचा असतो. नर व मादी विणीच्या हंगामाखेरीज इतर वेळी सारखीच दिसतात. ह्या पक्ष्याचे कळप खूपच मोठे असतात, वेळेला 200 किंवा त्याहून अधिक संख्येचा कळप शेतीवाडीच्या आसपास नेहमी सापडतो. गवताचे बी टिपत हे पक्षी उड्या मारीत लगतच्या झाडावर जातात. मुनिआ पक्ष्यांच्या पद्धतीनुसार हे पक्षी सुबद्ध अशा घोळक्याने उडत असतात. लाल मुनिआसारखेच ह्यांचे घरटे गोलसर आकाराचे असून त्याला बाजूने नळीसारखे छोटे प्रवेशद्वार असते. नेहमी ही घरटी खुज्या झुडपांमध्ये असतात पण जमिनीपासून 10 ते 15 मीटर उंचीवरील पामच्या झाडीतही ही घरटी दिसून येतात. – 4 ते 8 – अशी पांढरीशुभ्र अंडी हे पक्षी एका वेळी घालतात.

**चटक कुलात** (Family FRINGILLIDAE) फिंच किंवा चटक पक्षी अंतर्भूत होतात. हे पक्षी अगदी चिमणीसारखे असतात, फक्त त्यांचे रंग मात्र भडक असतात.

**गुलाबी फिंच (Common Indian or Hodgson's Rosefinch)** *(Carpodacus Erythrinus* – चित्रपत्र 16.96 – हिंदी : *तुती* किंवा *लाल तुती*. हा पक्षी हिवाळ्यात आपल्या भागात येतो. नराचे डोके, छाती, पाठ आणि खांदे गुलाबी गुलबस रंगाचे असतात. मादीचा रंग तपकिरी असून त्यात ऑलिव्ह रंगाची झाक असते. जड तिकोनी फिंच चोच, दुभागलेले शेपूट, आणि पंखावरचे फिकट रंगाचे दोन पट्टे ह्या खुणा नर व मादीत स्पष्टपणे दिसून येतात. हिवाळा संपून उन्हाळ्याच्या सुमारास हे पक्षी जेव्हा परत जाण्याच्या तयारीत असतात तेव्हा नराच्या अंगावरील पिसांचा रंग अधिक दाट तांबडा होतो व आगमनाचे वेळी टोकावर असलेला फिका रंग कमी किंवा नाहीसा होतो. उभ्या पिकात किंवा झुडपांमधून शेतीवाडीच्या आसपास फिरणारे ह्या पक्ष्यांचे 10 ते 20 जणांचे थवे नेहमी आढळून येतात. वड, पिंपळ, उंबर ह्यांची फळे, पुष्पकलिका, वेळूच्या बिया (असतील तेव्हा), व तयार होणारे ज्वारी, फुलांमधील मधुरस हे पक्षी नियमाने पितात. फुलांच्या बुडाशी असलेला रस शोषून दुसऱ्या त्याच जातीच्या फुलांमध्ये हे पक्षी जेव्हा डोके खुपसतात तेव्हा आपोआपच ते पराग नव्या फुलांतील स्त्रीकेसरांवर पडून परपराग मीलन (Cross Pollination) होते. 'टूई ?' किंवा 'चूई ?' अशा प्रकारचा आवाज असलेली मंजुळ शिटी हे पक्षी वाजवितात. विणीच्या हंगामासाठी हा देश सोडण्यापूर्वी कधी कधी नर पक्ष्यांचे मोठे पण सुरेल गाणे ऐकू येते. काश्मिरात व पश्चिम हिमालयातील मध्यम उंचीवरील प्रदेशांत हे पक्षी अंडी घालतात. वाटीच्या आकाराचे गवताचे घरटे असून त्याला आतून मुळ्या आणि केस ह्यांचे अस्तर असते. काटेरी झुडपांमध्ये 1 ते 2 मीटर उंचीवर ही घरटी बांधली जातात. निळ्या रंगावर काळसर व फिकट तांबड्या रंगाचे ठिपके असलेली – 3 किंवा 4 – अंडी हे पक्षी घालतात.

कुलिंग गणामधील शेवटचे कुल म्हणजे **चिरिटीक कुल** (Family EMBERIZIDAE). भारीट (Buntings) पक्ष्यांच्या ह्या कुलातले पक्षी वरवर फिंचसारखे पण साधारण किडकिडीत अंगाचे, लांब शेपूट व शरीराचे पक्षी आहेत. पिपिट पक्ष्यांप्रमाणे सर्वांत शेपटीमधील बाहेरच्या अंगाची पांढरी पिसे उडताना स्पष्ट दिसतात.

ह्या समूहामधील सर्वांत परिचयाचे पक्षी म्हणजे **कालशीर्ष भारीट (Black-headed Bunting)** *(Emberiza Melanocephala)* – चित्रपत्र 16.100 व **रक्तशीर्ष भारीट (Red-headed Bunting)** *(E. Bruniceps)* – चित्रपत्र 16.99 – हिंदी : *गंदम* (दोन्ही पक्षी). पैकी दोन्ही पक्ष्यांचे नर चित्रात दाखविलेले आहेत. दोन्ही पक्षी चिमणीपेक्षा मोठे आणि हिवाळ्यातील पाहुणे आहेत. कालशीर्षाची मादी वरून तांबूस-तपकिरी असते, तर रक्तशीर्षाची मादी राखट तपकिरी. दोन्ही खालच्या बाजूने तांबूस असून त्यात पिवळसर झाक असते. थंडीच्या मोसमात माळरानातील बांबूंच्या किंवा खुज्या झुडपांच्या प्रदेशात दोन्ही पक्ष्यांचे कळप आढळतात. ज्वारी, बाजरी आणि इतर तृणधान्यांच्या शेतांवर हे कळप 'ढगा' सारखे उतरून दाणे खातात व खूप नुकसान करतात. पीक कापून धान्य वेगळे करून नेईपर्यंत हे पक्षी आपले दाणे टिपत असतात. बाभळीच्या हिरवट पानांच्या पार्श्वभूमीवर पिवळ्या रंगाचे हे पक्षी खुलून दिसतात. लांबून तर हे पक्षी म्हणजे भडक रंगाची फुले असावीत इतके सुंदर दिसतात. हिवाळ्यात आपल्याकडे असताना हे पक्षी चिमणीसारखाच चिवचिवाट करतात पण हा आवाज मात्र गाण्यासारखा मंजुळ असतो. कालशीर्ष भारीट विणीच्या हंगामात भारतापलीकडे म्हणजे पश्चिम आशियात व पूर्व युरोप खंडात जातात. रक्तशीर्षाचा विणीचा हंगाम जवळात म्हणजे बलुचिस्तान (पश्चिम पाकिस्तान) येथे होतो. मेंढीच्या लोकरीचे अस्तर लावलेले वाटीच्या आकाराचे वेळूंचे घरटे हे पक्षी झुडपांमध्ये दीड मीटर उंचीवर बांधतात. फिकट हिरवट पांढऱ्या रंगावर गर्द तपकिरी, जांभळे आणि राखी रंगाचे ठिपके असलेली – 5 – अंडी हे पक्षी घालतात.

# पारिभाषिक शब्दसंग्रह

अवाक (शराटी) Ibis
अवाक, पांढरा Ibis, White
अवाक, काळा Ibis, Black
अपोडिडे कुल Apodidae, Family
आयोरा (सुभग) Iora, Common
आयोरा, मार्शल्स Iora, Marshall's
आरडिडी कुल Ardeidae, Family
उलूक कुल Strigidae, Family
उलूक गण Strigiformes, Order
उलूक शृंगी (शिंगवाले घुबड) Owl, Great Horned
अंगारक कुल Diecuridae, Family
अंगारशिख कुल Pycnonitidae, Family

कपोत कुल Columbidae, Family
कपोत गण Columbiformes, order
कबुतर Dove
कबुतर, ठिपक्यांचे Dove, Spotted
करकोचा Stork
करकोचा, उघड्या चोचीचा Stork, Openbilled
करकोचा, रंगीत Stork, Painted
करंडक Coot
कलहंस Greylag
कस्तूर कुल Turdinae, Family
कस्तूर (पद्मपुष्प, नवरंग) Pitta, Indian
कस्तूर, पर्वत Thrush, Malabar Whistling
कस्तूर, हिमालयी Thrush, Himalayan Whistling
काक कुल Corvidae, Family
काणूक Teal Cotton
कावळा, साधा Crow, House
कावळा, डोम Crow, Jungle
काष्ठकूट, कुल Picidae Family
काष्ठकूट (सुतार) गण Piciformes, Order
काष्ठकूट, सोनेरी पाठीचा (सोनपाठी सुतार) Woodpecker, Golden-backed
कांचन कुल Oriolidae, Family
कांचन, कालशीर्ष Oriole, Black-headed
कांचन, हळदी (पीलक) Oriole, Golden
क्वाक कुल Heron, Family
कुक्कुट गण Galliformes, Order
कुरव, तपकिरी डोक्याचा Gull, Brown-headed
कुरव, काळ्या डोक्याचा Gull, Black-headed
कुलिंग गण Passeriformes, Order
कृकल कुल Pteroclididae, Family
कोकिळ Cuckoo or koel

कोकिळ, युरोपियन Cuckoo, European
कोंबडी, तांबडी जंगली Fowl, Red Jungle
कोंबडी, राखी जंगली Fowl, Grey Jungle
क्रौंच कुल Gruidae, Family
क्रौंच गण Gruiformes, Order
क्रौंच, सामान्य Crane, Common
क्रौंच, स्थानिक Crane, Demosielle
क्लोरॉप्सिस, जेरडॉनचा Chloropsis Jerdon's
क्लोरॉप्सिस, सोनेरी छातीचा Chloropsis, Gold-fronted

खाटीक Shrike or Butcher Bird
खाटीक कुल Laniidae, Famliy
खाटीक, तांबूस पाठीचा Shrike, Rufuous-backed
खाटीक, राखी Shrike, Grey
खंजरीट कुल Motacillidae, Family
खंड्या Kingfisher, Small Blue
खंड्या, पांढऱ्या छातीचा Kingfisher, White-breasted

गप्पीदास Bushchat, Pied
गप्पीदास, गलोटीवाला Bushchat, Collared
गिधाड-, पांढऱ्या पाठीचे किंवा बंगाली Vulture, White-backed or Bengal

घार Kite
घार, ब्राह्मणी Kite, Bramhiny
घुबड, तपकिरी मत्स्य Owl, Brown Fish
घुबड, पांढऱ्या तोंडाचे Owl, Barn

चक्रांग Teal
चटक कुल Fringillidae, Family
चटक, गुलाबी Finch, Common Indian or Hodgson's Rose
चष्मेवाला White Eye
चाष (नीलकंठ) Roller, Indian or Blue Jay
चितूर Patridge, Grey
चिमणी, कुल Ploceidae, Family
चिमणी, साधी Sparrow, House
चिरिटीक कुल Emberizidae, Family
चीरक Robin, Indian
चंडोल Lark
चंडोल कुल Alaudidae, Family
चंडोल, तुरेबाज Lark, Crested
चंडोल, मलबार Lark, Malabar crested
चंडोल, राखी डोक्याचा किंवा काळ्या पोटाचा फिंच Ashy Crowned or Blue-bellied Finch
चंडोल, साइकचा Lark, Syke's Crested

छिप्पिका कुल Caprimulgidae, Family
छिप्पिका गण Caprimulgiformes, Order

जलकपोत कुल Jacanidae, Family
जलकपोत, फेझंट टेल्ड Jacana, Pheasant-tailed
जलकपोत, ब्राँझ पंखाचा Jacana, Bronze-winged

जलकाक कुल Phalacrocoracidae, Family

टकाचोर (भेरा) Tree Pie
टिट, पिवळ्या गालाचा Tit, Yellow-cheeked
टिट, राखी Tit, Grey
टिटवी Lapwing, Red-wattled
टिट्टिभ गण Charadiiformes, Order

तांबट Barbet or Coppersmith
तांबट कुल Capitoniidae, Family
तांबट, हिरवा Barbet, Large Green
तित्तर, काळे Patridge, Black
तिरंदाज Darter or Snake bird
तुतवार, ठिपक्यांचा Sandpiper, Wood or Spotted
तुतवार, साधा Sandpiper, Common

दयाळ Robin, Magpie,
दर्वीमुख Spoonbill
दीर्घपाद कुल Ciconiidae, Family
दुर्बल गण Apodiformes, Order
दुर्बल (पांगळी) Swift, House
दुर्लाव, जंगली Quail, Jungle Bush
दुर्लाव, पत्थरी Quail, Rock Bush
दुर्लाव, पावसाळी किंवा काळ्या छातीचा Quail, Rain or Black-breasted

धनेश (शिंगचोचा) Hornbill, Large Pied
धनेश (शिंगचोचा), मलबारी Hornbill, Malabar Pied
धोबी Wagtail
धोबी, करडा Wagtail, Grey
धोबी, पांढरा Wagtail, White
धोबी, पिवळा Wagtail, Yellow
धोबी, मोठा ठिपक्यांचा Wagtail, Large Pied

नटहॅच-चेस्टनट पोटाचा Nuthatch, Chestnut-bellied
नदीसुरय Tern, River
नदीसुरय, भारतीय Tern, Indian Whiskered
नर्तक (नाचरा) Flycatcher
नर्तक, पांढऱ्या ठिपक्यांचा Flycatcher, White-Spotted
नर्तक, पांढऱ्या भुवयांचा Flycatcher, White-browed
नर्तक, स्वर्गीय (सुरंगी) Flycatcher, Paradise
नीलकंठ गण Coraciiformes, Order
नीलकंठ (चाष) Roller, Indian or Blue Jay
नीलकंठ, काश्मिरी Roller, Kashmir
नीलच्छत्र कुल Irenidae, Family

पद्मपुष्प (कस्तूर) Pitta, Indian
पद्मपुष्प कुल Pittidae, Family
पतझड वन Deciduous forest
परजीवी Parasitic
परभृत (कोकिळ) गण Cuculiformes, Order
प्लवर, केन्टिश Plover, kentish
प्लवर, चष्मेवाला Plover, Goggle-eyed or Stone-Curlew
प्लवर, लिटल रिंग्ड Plover, Little Ringed

पाकोळी Martin
पाणकावळा किंवा करढोक Cormorant, Little
पाणकावळा, तुरेबाज Indian, Shag
पाणकावळा, मोठा Cormorant, Large
पाणकोंबडी, जांभळी Moorhen, Purple
पाणकोंबडी, पांढऱ्या छातीची Waterhen, White-breasted
पाणडुबी Little Grebe or Dabchik
पाणलाव Snipe
पारवा Pigeon
पावशा Sparrow Hawk
पाशगल कुल Pelicanidae, Family
पाशगल गण Pelicaniformes, Order
पिप्पल कुल Capitonidae, Family
पिपिट Pipit
पिपिट, झाडावरील Pipit, Tree
पिपिट, भारतीय Pipit, Indian
पिंगळा Owlet, spotted
प्रियात्मज कुल Bucerotidae, Family
पुष्पान्वेशी कुल Dicaeidae Family
पेलिकन, (पाणकोळी) राखी किंवा ठिपक्यांच्या चोचीचा Pelican, Grey or Spotted-billed
पोपट Parakeet, Rose-ringed
पोपट (करण) अलेक्झांड्रिन Parakeet Large Indian or Alexandrine

फॅसिअनिडे कुल Phasianidae, Family
फुलटोच्या Flowerpecker
फुलटोच्या, जाड चोचीचा Thick-billed
फुलटोच्या टिकेलचा Flowerpecker, Tickell's

बक गण Ciconiiformes, Order
बगळा, गाय Egret, Cattle
बगळा, जांभळा Heron, Purple
बगळा, मध्यम Egret, Median
बगळा, मोठा Egret, Large
बगळा, लहान Egret, Small
बगळा, रात्र Heron, Night
बदक, ठिपक्यांचे किंवा राखी Duck, Grey or Spot-billed
बदक, रानटी Duck, Wild
बलाक कुल Phoenicopteridae, Family
बैरागी, बडा सातभाई Babbler, Jungle
बुलबुल, लालगाल्या Bulbul, Red whiskered
बुलबुल, लालबुड्या Bulbul, Red vented
बुलबुल, श्वेतकपोल (श्वेतगाल्या) Bulbul, White-cheeked

भाटतीतर Sandgrouse, Common
भांडिक, लालबुड्या Swallow, Red-rumped
भांडिक, साधा Swallow, Common
भारद्वाज Pheasant, Crow or coucal
भारीट Bunting
भारीट, कालशीर्ष Bunting, Black-headed
भारीट, रक्तशीर्ष Bunting, Red-headed

मराल, छोटा Teal, Whistling Lesser
मराल, मोठा Teal, Whistling Large
मीनरंक कुल Alcedinidae, Family

मीनरंक शबल Kingfisher, Pied
मीनरंक शबल, हिमालयातील Kingfisher, Pied Himalayan
मुखर कुल Timaliinae, Family
मुनिआ, ठिपक्यांचा Munia, Spotted
मुनिआ, लाल Munia, Red
मोर Peafowl, Common
मंजूक Divers

रात्रिंचर (रातवा) Nightjar
रात्रिंचर (भारतीय) Nightjar, Indian
रेल Rail
रोहित Flamingo
रोहित, छोटा Flamingo, Lesser
रॅलिडे कुल Rallidae, Family

वटवट्या, भारतीय Wren Warbler, Indian
वटवट्या, राखी Wren Warbler, Ashy
वल्गुल कुल Paridae, Family
वाजी गण Accipitridae, Family
विष्फुलिंग कुल Campephagidae, Family
विष्फुलिंग Minivet
विष्फुलिंग, छोटा Minivet, Scarlet
वीचीकाक कुल Laridae, Family
वेडा राघू, छोटा हिरवा Bee-eater, Blue tailed
वंचक Heron, Pond or Paddy Bird
वंजुल गण Podicipediformes, Order

शमा Shama
शराटी कुल Threskiornithidae, Family
शराटी काळा Ibis, black
शराटी (अवाक) पांढरा (अवाक) Ibis, White
शलभाश कुल Muscicapidae, Family
शार्ङ्ग कुल Meropidae, Family
शिंगचोचा (धनेश) Hornbill
शिंजीर (सूर्यपक्षी) Sunbird or Honeysucker
शिंजीर, जांभळा Sunbird, Purple
शिंजीर, जांभळ्या बुडाचा Sunbird, Purple-rumped
शिंजिरिका कुल Nectariinidae, Family
शिंपी (विणकर) पक्षी Tailor Bird
शिलंध्री Sittidae, Family
शुक कुल Psittacidae, Family
शुक गण Psittaciformes, Order
शुकिक (सुभग) Iora, Common
शुकिक (मार्शल्स) Iora, Marshall's
श्वेतोलुक कुल Tytonidae, Family

सदाहरित वन Evergreen forest
ससाणा Falcon, Shaheen
ससाणा कुल Falconidae, Family
ससाणा तुरुमती Merlin, Red-headed
सातभाई, छोटा Babbler, Common
सातभाई, पिवळ्या डोळ्याचा Babbler, Yellow-eyed
सातभाई, मोठा राखी Babbler, Large Grey
सारस Crane, Saras
सारिका कुल Sturnidae, Family
सारिका, गुलाबी (भोरडा Starling, Rose coloured or Rose pastor

सारंग कुल Otididae, Family
सारंग, मोठा भारतीय (माळढोक) Bustard, Great Indian
साळुंकी, बँक Myna, Bank
साळुंकी, रंगीत Myna, Pied
सितनयन कुल Zosteropidae, Family
सिल्व्हिनी कुल Sylviinae, Family
सुगरण (बाया) Weaver, Black-throated
सुगरण, रेघांची Weaver, striated
सुतार (हुप्पो) Hoopoe
सुतार (काष्ठकूट) मराठा Woodpecker, Maharatta
सुभग (शुकिक) Iora
सुरय, आर्क्टिक Tern, Arctic
सुरंगी (स्वर्गीय नर्तक) Flycatcher, Paradise

हरितालक (हरोळी) Pigeon, Common Green
हुप्पो (सुतार) काष्ठकूट Hoopoe
होला, तांबडा Dove, Red Turtle
होला, रान Dove, Ring
हंस गण Anseriformes, Order
हंस, पट्टयांचा Goose, Bar-headed

क्षत्रबलाक Stork, Adjutant
क्षत्रबलाक, छोटा Stork, Lesser Adjutant

Printed at Tarang Printers, Delhi